# लेखकाची मनोभावना

चांगलें किंवा सुमार कसें का होईना, कै दे भ गोविंदराव याळगी यांचें चरित्र मी लिहू शकलो यातच माझ्या मनाला समाधान आहे. माझ्यापेक्षां अधिक चागला, खदा, व भावनाप्रधान लेखक या चरित्राला लाभावयास पाहिजे होता एखादा 'महादेवभाई देसाई' या चरित्रग्रथाला लेखक म्हणून लाभला असता, तर त्यानें अनेक अमोल गुणसभाराच्या या मूक चित्रपटाचा उत्तम, प्रभावी घोलपट करून दाखविला असता

गोविंदरावाची उभी हयात किंवा जीवन धनाधरीन्या मामल्यात गेलें! त्यानीं आपल्या जीवनांत जे विचार आपल्या उराशीं बाळगून ठेवले होते, ज्या भावनाची जपणूक केली होती, आपला जीव इतराच्या सुखासाठीं वा देशकार्यासाठीं धोक्यात घालण्याची जी हौस शेवटपर्यंत टिकवून धरली होती, प्रसिद्धिपराङ्मुखतेची जी साधना केली होती, जीं धोरणें साभाळलीं होतीं, धन व मान यापासून दूर रहाण्याची जी तपश्चर्या केली होती, या सर्व व इतर अमोलिक व दुर्मिळ प्रवृत्तींच्या पार्श्वभूमीस असलेलें त्याचें आतरमन उकलून दाखविण्यास पानेच्या पाने लिहीत बसावें लागेल, महाभारत लिहावें लागेल असला सच्चा, हाडाचा देशभक्त बधु म्हणून, स्नेही म्हणून, अथवा शिष्य म्हणून लाभण्यास त्या बधूचे, त्या स्नेह्याचें आणि त्या गुरुजींचें अहोभाग्य किंवा पूर्वपुण्याईच असावी लागते असल्या गुरु-शिष्याची सेवा करण्याची सधि मिळण्यासहि तसेंच काहीं पूर्वपुण्याईचें सचित गाठीशीं असावें लागतें हीच भावना, कै दे भ गोविंदरावाच्या विषयीं, गगाधरराव देशपांडे यानीं आपल्या 'माझी जीवनकथा' आत्मचरित्रात नमूद करून ठेविलेली आहे थोराचें थोरपण आकलन होण्यासहि आपल्या स्वत चें मन-बुद्धि अत करण थोर असावें लागते, असें जें म्हणतात ते अगदीं यथार्थ आहे अशाच्या जीवनाचें शब्दचित्र मीं कितीहि शाई व रग खर्ची घातला तरी तें तोकडेंच ठरणार आहे. गोविंदरावाविषयीं गगाधररावाना किती आत्मीयता वाटत होती याचें प्रत्यतर गोविंदरावाच्या अकालीं निधनानिमित्त भरलेल्या जाहीर शोकसभेंत सर्व लोकाना आलें गगाधररावाना त्या प्रसगीं बोलताच येईना, म्हणून ते एकदा गादीवरून खालींच बसले. पण पुन्हा शोक आवरून धैर्य करून ते बोलावयास उभे राहिले आणि पहिलेंच वाक्य त्यानीं

उच्चारलें की, 'गोविंदराव नसते तर माझें आज तेराव श्राद्ध झालें असतें.' एवढेंच वाक्य उच्चारून ते पुन्हा खालीं बसले आणि त्यानंतर लगेचच उठून केलेल्या भाषणात ते म्हणाले होते की, प्रतिपक्षाचे बाण आपल्या शरसंधानाने ते मध्यामध्येंच तोडून टाकीत असत. राजकारणात असें शरसंधान अगदीं अचूक असावें लागतें ही त्यांना ईश्वरी देणगीच होती!

गोविंदरावाची स्वातंत्र्यनिष्ठा एवढी जबरदस्त होती की, काहीहि करून आपल्या देशाची ही गुलामगिरी नष्ट झालीच पाहिजे अशी तीव्र सभृति त्याना वाटत होती. निधनापूर्वी आपल्या बंधूना गोविंदरावांनी सागून ठेविलें की, 'गंगाधरराव ज्या कोणत्या स्वातंत्र्याच्या चळवळी करतील त्यांत आपल्या हातून होईल तितकी आर्थिक झीज सोशीत जा, मदत करीत जा' असा प्रयत्न करणारी देशामध्यें जी शक्ति असेल त्याला आपण तन-मन-धनानें मदत करावी व त्या धडधडींत आवश्यकच झाल्यास आपलें सर्वस्व व वेळीं प्रसगीं आपलें जीवितहि खर्ची घालावें अशी उत्कट इच्छा गोविंदरावांना होती आपल्या देशाला स्वातंत्र्य, स्वराज्य, केव्हा मिळेल, कसें मिळेल, कोणाच्या हातीं ते जाईल याची कल्पनाहि करता येण्यासारखें ज्या वेळीं नव्हतें, अशा काळीं आपल्या ध्येयाच्या मृगजळाच्या मागें एका अर्थी धावत धापा टाकण्यातच त्याना सुख व समाधान होतें अक्षरश अनामिक राहून, ज्वलत निष्ठेनें आपलें जीवित व सर्वस्वहि सतत धोक्यात घालून काम करीत राहण्याची वृत्ति, त्या काळीं गोविंदरावाच्यासारख्या कित्येक कार्यकर्त्यांमध्ये होती आणि त्या काळच्या समाजनेत्याची तीच खरी शक्ति होती आजच्या समाजात तीच गोष्ट अत्यत दुर्मिळ होऊन बसलेली आहे, एवढच नव्हे, ती आपल्यातून अगदीं नष्टच झालेली आहे. आपल्या त्यागाचे मोजमाप त्या काळचे कार्यकर्ते व पुढारी करीत नसत, तर हातीं घेतलेल्या कार्याला किती त्यागाची आवश्यकता आहे याचें मोजमाप घालीत असत आपल्या त्यागाचा मोबदला त्या काळची पिढी कधींच इच्छीत नव्हती, आणि याच्या उलट आज मोबदल्यावाचून कोणी काही करू जाईल तर त्याला मूर्खांत काढण्यात येतें. राष्ट्रसवर्धनास अत्यत आवश्यक असलेली भावना पुन आपल्या समाजात दाखल होण्यास गोविंदरावाच्या चरित्राचा उपयोग होईल किंवा व्हावा असें मला वाटतें या चरित्राच्या नायकाविषयी माझी हीच मनोभावना आहे

लोकशाहीच्या मार्गाने भारतासारख्या सनातन समाजाचें सपूर्ण परिवर्तन घडवून आणण्याचें कंकण आपण आपल्या हातीं बाधलेलें आहे गोविंदरावाच्या ध्येयाचीं, गोविंदरावांच्या चारित्र्याचीं व उत्कृष्ट भावनेचीं माणसें आपल्या समाजाच्या सर्व थरात मोठ्या सख्येनें निर्माण झाल्याशिवाय ही सामाजिक क्रांति घडून येणें अशक्य आहे आणि म्हणूनच कोणत्याहि थोर राष्ट्रीय नेत्यापेक्षा या सर्वसाधारण गृहस्थ सेवकाची कथा उद्बोधक व मार्गदर्शक होईल, या भावनेनेंच या आमच्या शूर लढवय्या निष्ठावताचें चरित्र मी सादर करीत आहे

लेखकाची मनोभावना

एखादा सामाजिक व राजकीय गंभीर दोष स्पष्ट दिसून आला, आणि त्यापासून होणारें सामाजिक व राष्ट्रीय नुकसान अथवा हानि सर्वांनीं बौद्धिक पातळीवर मान्य केला, तरीहि तो दोष दूर करण्याचा इलाज वा उपाय लोकमानसाला किंवा आपल्या नेत्यांना सुचू नये, ही एक कीव अथवा दया येण्यासारखी स्थिति आहे, असेंच गोविंदरावांना वाटत होतें, आणि तमाच एखादा उपाय किंवा इलाज सुदैवान सुचला तरी, आपल्या समाजाला तो पेलता येऊ नये, झेपू नये, ही लाजिरवाणी गोष्ट आहे अशीच त्याची भावना होती आणि म्हणून आपण हातीं घेतलेल्या समाजसुधारणाच्या किंवा राजकारणाच्या कोणत्याहि आंदोलनावर एखाद्या सिंहाप्रमाणें ते आपल्या साथी अथवा सहकाऱ्यासह झडप घालीत असत, तुटून पडत असत हाच त्याच्या मनातील क्रांतिवृत्तीचा निर्मळ झरा होता केवळ त्याच्यापुरतेंच नव्हे, खरोखर खोल विचार केल्यास, 'क्रान्तिवृत्तीचा हाच खरा झरा असतो, नव्हे असावयास पाहिजे' असें दिसून येईल त्याच्या सहवासात आलेला कोणताहि कार्यकर्ता किंवा सहकारी शेवटपर्यंत टिकला, त्यांनी कोणालाहि आपला शत्रु होऊ दिलें नाही, याच खरें रहस्य या क्रांतिनिर्झरातच आहे

इंग्रजी भाषेत असें म्हणतात कीं, Truth is stranger than fiction, सत्य हें कल्पनापेक्षा अधिक अद्भुत असतें. गोविंदरावाचें प्रस्तुत चरित्र वाचून कोणासहि या म्हणीचे स्मरण होण्यासारख्या घटना त्यात घडून आलेल्या आहेत म्हणून मला येथ आवर्जून सांगावयाचे आहे का, यातील प्रत्येक घटना गोविंदरावाच्या नातलग व हयात परिचिताकडून तावूनसुलाखून व पारखूनजाइन मीं घेतलेली आहे

## आभार

या चरित्रग्रथाची माझी हस्तलिखित प्रत पाहून, त्यात अनेक सुधारणा सुचवून, याळगी घराण्यातील सर्वच आबालवृद्ध स्त्री पुरुषानीं, विशेषत गोविंदरावाचे बंधुद्वय श्री कृष्णराव आणि श्री जीवनराव आणि गोविंदरावाचे चिरंजीव डॉ अनंतराव यानीं मला मन पूर्वक मदत केलेली आहे गोविंदरावाचे अनेक सहकारी व परिचित, विशेषत श्री हणमंतराव देशपांडे याचीहि मदत मला या कामीं झालेली आहे या चरित्रग्रथाची सुवाच्य प्रत प्रेस कॉपी वेळेवर लिहून काढण्याच काम माझे स्नेही श्री कृष्णाजी बाबूराव मराठे यानीं केलेलं आहे या ग्रथावरील जॅकेट अर्थात् मलपृष्ठ तयार करून देण्याच काम माझे एक स्नेही श्री दत्तकुमार पै यांनी केलें आहे, पू सेनापति श्री पांडुरंग महादेव बापट तथा तात्यासाहेब यानीं समग्र ग्रथ काळजीपूर्वक वाचून व आपल्या एका समानधर्माचें हें चरित्र आहे हे ध्यानात घेऊन, सुदर व जिव्हाळ्याची प्रस्तावना लिहून गोविंदरावाचा गौरव केला आणि या ग्रथाला आशीर्वाद दिला आहे श्री श्रीपाद शंकर नवर व श्री बाळकृष्ण रंगराव मुळगुरकर या मित्रद्वयाना 'वाङ् पुष्प' मी या

उद्गार ली, 'गोविंदराव नसते तर माझे आज तेराव श्राद्ध झाले असत ' एवढच वाक्य उच्चारून ते पुन्हा खाली बसले आणि त्यानतर लागलाच उठून केलेल्या भाषणात ते म्हणाले होते की, प्रतिपक्षाचे धाण आपल्या शरसधानान ते मध्यामध्येच तोडून टाकात असत रानकारणात असे शरसधान अगदी अचूक असाव लागते ही त्यांना ईश्वरी देणगीच होती!

गोविंदरावाची स्वातत्र्यनिष्ठा एवढी जबरदस्त होती की, काहींहि करून आपल्या देशाची ही गुलामगिरी नष्ट झालीच पाहिजे अशी तीव्र सभूति त्याना वाटत होती निधनापूर्वी आपल्या बधूना गोविंदरावानी सागून ठविल की, 'गगाधरराव ज्या कोणत्या स्वातत्र्याच्या चळवळी करतील त्यात आपल्या हातून होईल तितकी आर्थिक झीज सोशीत जा, मदत करीत जा ' असा प्रयत्न करणारी देशामध्यें जी शक्ति असेल त्याला आपण तन-मन-धनान मदत करावी व त्या धडपडींत आवश्यकच झाल्यास आपल सर्वस्व व वेळीं प्रसगीं आपलें जीवितहि खर्ची घालाव अशी उत्कट इच्छा गोविंदरावाना होती आपल्या देशाला स्वातत्र्य, स्वराज्य, केव्हा मिळेल, कसें मिळेल, कोणाच्या हातीं ते जाईल याची कल्पनाहि करता येण्यासारखें ज्या वेळीं नव्हत, अशा काळी आपल्या ध्येयाच्या मृगजळाच्या माग एका अर्थी धावत धापा टाकण्यातच त्याना सुख व समाधान होतें अक्षरश अनामिक राहून, ज्वलत निष्ठेन आपल जीवित व सर्वस्वहि सतत धोक्यात घालून काम करीत राहण्याची वृत्ति, त्या काळीं गोविंदरावांच्यासारख्या कित्येक कार्यकर्त्यांमध्ये होती आणि त्या काळच्या समाजनेत्याची तीच खरी शक्ति होती आजच्या समाजात तीच गोष्ट अत्यत दुर्मिळ होऊन बसलेली आहे, एवढच नव्हे, ती आपल्यातून अगदीं नष्टच झालेली आहे आपल्या त्यागाचें मोजमाप त्या काळचे कार्यकर्ते व पुढारी करीत नसत, तर हातीं घेतलेल्या कार्याला किती त्यागाची आवश्यकता आहे याचें मोज माप घालीत असत आपल्या त्यागाचा मोबदला त्या काळची पिढी कधींच इच्छीत नव्हती, आणि याच्या उलट त्याग मोबदल्यावाचून कोणी काही करू जाईल तर त्याला मूर्खांत काढण्यात येते राष्ट्रसवर्धनास अत्यत आवश्यक असलेली भावना पुन आपल्या समाजात दाखल होण्यास गोविंदरावाच्या चरित्राचा उपयोग होईल किंवा व्हावा असें मला वाटत *या चरित्राच्या नायकाविषयी माझी हीच मनोभावना आहे*

लोकशाहीच्या मार्गान भारतासारख्या सनातन समाजाच सपूर्ण परिवर्तन घडवून आणण्याचें कंकण आपण आपल्या हातीं बांधलेलें आहे गोविंदरावाच्या ध्येयार्थी, गोविंदरावाच्या चारित्र्याचीं व उत्कृष्ट भावनेचीं माणसें आपल्या समाजाच्या सर्व थरात मोठ्या सख्येन निर्माण झाल्याशिवाय ही सामाजिक क्राति घडून येणें अशक्य आहे आणि म्हणूनच कोणत्याहि थोर राष्ट्रीय नेत्यापेक्षा या सर्वसाधारण गृहस्थ सेवकाची कथा उद्बोधक व मार्गदर्शक होईल, या भावनेनच या आमच्या शूर लढवय्या निष्ठावताचें चरित्र मी सादर करीत आह

एखादा सामाजिक व राजकीय गभीर दोष स्पष्ट दिसून आला, आणि त्यापासून होणारें सामाजिक व राष्ट्रीय नुकसान अथवा हानि सर्वांनीं बौद्धिक पातळीवर मान्य केली, तरीहि तो दोष दूर करण्याचा प्लान वा उपाय लोकमानसाला किंवा आपल्या नेत्याना सुचू नये, ही एक कीव अथवा दया येण्यासारखी स्थिति आहे, असेंच गोविंदरावाना वाटत होतें, आणि तसाच एखादा उपाय किंवा इलाज सुदैवानें सुचला तरी, आपल्या समाजाला तो पेलता येऊ नये, झेपू नये, ही लाजिरवाणी गोष्ट आहे अशीच त्याची भावना होती. आणि म्हणून आपण हातीं घेतलेल्या समाजकारणाच्या किंवा राजकारणाच्या कोणत्याहि आदोलनावर एखाद्या सिंहाप्रमाणें ते आपल्या साथी अथवा सहकाऱ्यासह झडप घालीत असत, तुटून पडत असत हाच त्याच्या मनांतील क्रातिवृत्तीचा निर्मळ झरा होता. केवळ त्याच्यापुरतेंच नव्हे, खरोखर खोल विचार केल्यास, 'क्रान्तिवृत्तीचा हाच खरा झरा असतो, नव्हे असावयास पाहिजे' असें दिसून येईल त्याच्या सबधात आलेला कोणताहि कार्यकर्ता किंवा सहकारी शेवटपर्यंत टिकला, त्यानीं कोणालाहि आपला शत्रु होऊ दिलें नाही, याचें खरें रहस्य या क्रातिनिर्झरातच आहे

इग्रजी भाषत असें म्हणतात कीं, Truth is stranger than fiction, सत्य हे कल्पितापेक्षा अधिक अद्भुत असतें. गोविंदरावाचे प्रस्तुत चरित्र वाचून कोणासहि या म्हणीचें स्मरण होण्यासारख्या घटना त्यात घडून आलेल्या आहेत. म्हणून मला येथें आवर्जून सांगावयाचें आहे कीं, यातील प्रत्येक घटना गोविंदरावाच्या नातलग व हयात परिचिताकडून तावूनसुलाखून व पारखूनताडून मीं घेतलेली आहे

## आभार

या चरित्रग्रथाची माझी हस्तलिखित प्रत पाहून, त्यात अनेक सुधारणा सुचवून, याळगी घराण्यातील सर्वच आबालवृद्ध स्त्री पुरुषानीं, विशेषत गोविंदरावाचे धाकुटे बधु श्री कृष्णराव आणि श्री जीवनराव आणि गोविंदरावाचे चिरंजीव डॉ अनतराव यानीं मला मन पूर्वक मदत केलेली आहे गोविंदरावाचे अनेक सहकारी व परिचित, विशेषत श्री हणमनराव देशपाडे याचीहि मदत मला या कामीं झालेली आहे या चरित्रग्रथाची सुवाच्य प्रत प्रेस कॉपी वेळेवर लिहून काढण्याचें काम माझे स्नेही श्री. कृष्णाजी बापूराव मराठे यानीं केलेलें अ हे या ग्रथावरील जॅकेट अर्थात् मलपृष्ठ तयार करून देण्याचें काम माझे एक स्नेही श्री दत्तकुमार पै यानीं केलें आहे, पू सेनापति श्री पांडुरग महादेव बापट तथा तात्यासाहेब याना समग्र ग्रथ काळजीपूर्वक वाचून व आपल्या एका समानधर्मीचें हे चरित्र आहे हें ध्यानात घेऊन, सुदर व जिव्हाळ्याची प्रस्तावना लिहून गोविंदरावाचा गौरव केला आणि या ग्रथाला आशीर्वाद दिला आहे श्री श्रीपाद शकर नवरे व श्री बाळकृष्ण रगराव सुठणकर या मित्रद्वयाना 'वाट पुसत' मी या

चरित्रग्रंथाचें लिखाण केलें आहे, आणि 'मीज प्रिंटिंग ब्युरो'चे मालक श्री. भागवत यांनीं केवळ बारा दिवसांच्या अवधींत या ग्रंथाची उत्तम छपाई वगैरे करून दिलेली आहे. या सर्वांच्या मदतीवांचून हा ग्रंथ इतक्या लवकर प्रकाशित होऊच शकला नसता व त्यात अपूर्णता राहिली असती, म्हणून या सर्वांचा मी अत्यंत आभारी व ऋणी आहें

रामनवमी
ता २४ फेब्रुवारी १९६५

पुंडलीकजी कातगडे

## हार्दिक आभार

"कै. दे भ. गोविंदराव याळगी यांचें चरित्र"
या ग्रंथाचें यथार्थ मूल्यमापन करून
'महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळा'ने
तो ग्रंथ पुरस्कृत केला
याबद्दल मंडळाचा
मी
अत्यंत आभारी व ऋणी आहें

पुंडलीकजी कातगडे

ॐ

# 'नमस्तुभ्यं नमस्तुभ्यं नमस्तुभ्यं'

बेळगावचे कै. दे. भ. गोविंदराव याळगी याच्या या चरित्राला प्रस्तावना लिहिण्याची विनति मला का करण्यात आली तें मला समजत नाहीं. कारण पुस्तकांना प्रस्तावना किंवा उपोद्घात लिहिण्याचा मला सराव नाहीं. मी लेखक नाहीं, आणि साहित्यिक तर नाहींच नाहीं. माझ्या आयुष्यात मीं प्रसंगोपात्त थोडेंबहुत लिहिलें असेल–काही स्वत:ला वाटलें म्हणून, दुसऱ्यानीं काहीं लिहावयास सांगितलें म्हणून—पण लेखक व्हावें म्हणून नव्हे

दुसरी अडचण म्हणजे वयोमानानें माझी स्मृति बरीच शिथिल झाली आहे. वाचलेलें सर्वच्या सर्व लक्षात रहातेंच असें नाही, आणि दुसरें म्हणजे कै. गोविंदराव याळगी याचा आणि माझा जवळून दीर्घ परिचय होण्याचा कधीं योगच आला नाहीं. त्याचे व माझे उद्योग काहीं काळपर्यंत एकाच दिशेनें चालले होते असें या त्यांच्या चरित्र–ग्रंथावरून दिसते. या पुस्तकात पृष्ठ ७८ वर माझा एक ओझरता उल्लेख आलेला आहे. तो असा कीं, "मॅझिनी क्लब'नें 'बॉंब कसे तयार करावेत' या विषयावर सेनापति बापटानीं एक पुस्तक लिहिलें होतें, त्याची प्रत मिळविली आणि त्याच्याच मार्गदर्शनाखालीं हालचालीला सुरुवात केली सेनापति बापटाकडून ती विद्या शिकून घेण्यासाठीं बेळगावहून १।२ तरुण त्यांच्याकडे पाठविण्यात आले होते "

या वाक्यापैकीं पूर्वार्ध मला चागला स्मरतो, उत्तरार्ध तितकासा स्मरत नाहीं. माझ्या त्या वेळच्या उद्योगात पुष्कळच तरुण माझ्या सहवासात आलेले होते, त्या मध्यें बेळगांवचेहि काहीं असतील. कै. गोविंदरावापेक्षा कै. गंगाधरराव देशपांडे याचा व माझा संबध अधिक आलेला. लोकमान्य टिळकांच्याकडे त्याचें जाणें–येणें फार असे मी टिळकांच्या अगदीं निकटवर्तियापैकीं कधींच नव्हतों. तथापि त्याच्या परिसरात कधीं कधीं हिंडत होतो, आणि सुचेल त्याप्रमाणें माझे उद्योग मी स्वतन्त्रपणें करीत होतो, इतकें मात्र खरें माझे उद्योग टिळकाना किंवा त्याच्या निकटवर्तियाना आवडतात कीं नाहीं याचा विचार

मी कधींच करीत नसे. हिंदुस्थानला मी परत आल्यानंतर एकदां लोकमान्याना भेटलो, व म्हटलें कीं, "आता मी आपली रजा घेतो आणि माझ्या 'उद्योगा'ला मी लागतो." तेव्हां ते म्हणाले की, "तसें करू नका, मी लवकरच सिंहगडावर काहीं दिवस राहावयास जाणार आहे तेथें आपण मिळून काहीं दिवस राहू व बोलू नतरच तुम्ही आपल्या 'उद्योगा'ला लागा" पण ईश्वरी योगायोग असा की, दुसऱ्या दिवशींच लोकमान्यांना अटक झाली.

*गोविंदरावाच्याकडे गेलेल्या पुस्तकाविषयींची हकीकत अशी आहे.* बेळगावहून बॉंब करण्याची कला शिकण्यास माझ्याकडे कोणी आल्याचें मला स्मरत नाहीं. 'बापटानीं एक पुस्तक लिहिलें होतें' या वाक्यानें भलतेंच श्रेय माझ्याकडे येतें. खरी हकीकत अशी – एक हस्तलिखित पुस्तक आम्हाला (पॅरिसमध्ये हेमचंद्रदास, मिर्झा अब्बास, व मी असे तिघे जण, बॉंबविद्या शिकण्यासाठीं सन १९०७ साली राहिलो होतों) एका रशियन उद्धानें दिलें. त्या मूळ्या रशियन हस्तलिखित कागदाची छायाचित्रे हेमचंद्रानें घेतलीं आणि मूळ कागद आम्ही परत केले माझी एक रशियन भगिनी होती, तिनें त्या रशियन हस्त लिखिताचें इंग्रजी भाषांतर करून दिलें त्या भाषांतराच्या प्रती सायक्लोस्टाइलसारख्या विशिष्ट मसाल्याच्या कागदाच्या मदतीनें मीं केल्या काहीं प्रती हेमचंद्रास व मिर्झा अब्बास यांच्याजवळ देऊन त्याना मीं भारतात पाठविलें. त्या प्रतींच्या प्रती झाल्या व त्यापैकीं एक प्रत बेळगावात 'मॅझिनी क्लबा'कडे गेलेली होती त्याची एक प्रत माझ्याकडून होतीलाल वर्मा यानें 'टिळकाना पाहिजे आहे,' असें सांगून मागून नेली. मीं त्याला एक प्रत दिली होती भारतात परत आल्यानतर 'होतीलाल वर्माकडून' 'अशा *अशा पुस्तकाची एक प्रत आपल्याला मिळाली काय ?' असें मीं टिळकाना भेटताच पहिला* प्रश्न विचारला होता आणि मला टिळकानी होकारार्थी उत्तर दिलें होतें

गोविंदराव याळगी याचे काहीं 'उद्योग' माझ्या कानावर आलेले होते, पण या चरित्र ग्रथानें त्याच्या सर्व खटाटोपाची चागली कल्पना येते गगाधरराव देशपाडे याना त्याचा फारच मोठा आधार होता. त्याच्या साहाय्यामुळे गगाधररावाना बेळगावात आणि कर्नाटकात कितीतरी राजकीय गोष्टी करता आल्या आणि टिळकाच्या पुढारीपणाखाली देशात—विशेषत महाराष्ट्रांत—चाललेल्या कितीतरी नवीन नवीन गोष्टी करता आल्या विशेष म्हणजे या चरित्र ग्रथाचे लेखक श्री. पुडलीकजी याना आपल्या सार्वजनिक आयु *ष्याच्या अगदीं सुरुवातीलाच गगाधररावाच्या आणि गोविंदरावाच्या कुटुंबातील एखाद्या* माणसाप्रमाणे अगदीं घरोब्याचा सबध आलेला होता या दोघाचा विश्वास सपादन करून, दोघाना त्यानेंवर विश्वासान वेळोवेळी टाकलेली जबाबदारी त्यानीं निष्ठेनें पार पाडलेली आहे. पुडलीकजींना दोघाविषयीं सारखाच आदर होता. अगदीं गुलदस्तातील गोष्टी त्याना समजण्याची शक्यता होती. बहुतेक घटना लेखकाला ज्ञात आहेत गगाधर राव-गोविंदराव याचे बहुतेक सहकारी आता कालोदरात गडप झालेले असले तरी,

सुदैवानें काहीं हयात आहेत. विशेषत गोविंदरावाचे दोन धाकटे बंधु–कृष्णराव आणि जीवनराव–साक्षीभूत आहेत. त्यामुळें काहीं घटनांच्या तपशिलाची सत्यता पटवून घेणें शक्य झालें. पुंडलिकजींनीं आपलें सगळें हस्तलिखित त्यांना वाचून दाखवून योग्य त्या दुरुस्त्या केल्या, हे बरें झालें. अशा सर्वच घटनांचा कागदोपत्रीं पुरावा ठेविणें त्या काळीं फार जोखमीचें होतें, आणि या घटनांचा पुढेमागें तपशीलवार इतिहास लिहावा लागेल अशी त्या वेळीं कोणाला कल्पना येणार? हातात घेतलेलें काम तडीस नेलें म्हणजे झालें. त्यातून इतिहास आपोआप घडत जातो. इतिहास घडविण्यासाठीं कांहीं कोणी अशा गोष्टी मुद्दाम करीत नसतो आणि भावी इतिहासकाराची अडचण भागविण्यासाठीं त्या घटणींचीं साधनें जपून ठेवीत नसतो! ही साधनें जपून ठेविल्यानेंच कदाचित् त्या घटना सिद्धीस जाण्याच्या मार्गांत अडचणी उत्पन्न झाल्या असत्या, नव्हे तशीं अनेक उदाहरणें आहेत.

कै. गोविंदराव याळगी फारच अल्पायुषी झाले असें म्हटलें पाहिजे त्यांची सारी हयात फक्त ३९ वर्षांची म्हणजे सन १८८५ पसून १९२३ पर्यंतची. त्यांचे शिक्षण जेमतेमच झालेलें होतें, त्यांचें वाचन फार नव्हतें, ते व्यासंगी नव्हते, लेखक नव्हते, आणि वक्ते तर नव्हतेच नव्हते. एखाद्या सभेत दोन वाक्यांचे आभार मानणेंहि त्यांना जमत नसे. सार्वजनिक कार्ये करणाऱ्यांना या सर्व गोष्टींची आवश्यकता आहे, असें मला वाटत नाहीं. इच्छा पाहिजे, कळकळ पाहिजे, अन्यायाची चीड पाहिजे, त्याग पाहिजे, धाडस पाहिजे. गोविंदरावाच्याजवळ हीं सर्व भरपूर प्रमाणात होतीं. चार सहकारी एकत्र आले म्हणजे एकाची कमतरता दुसरा भरून काढतो. आपले कधी पडेल तेथें गोविंदराव, गंगाधररावाचा उपयोग करून घेत आणि गोविंदरावाच्या हेतूविषयीं निःशंक असल्यामुळें गंगाधरराव आपला तसा उपयोग करू देत. गोविंदरावाच्या गुणाची चांगली पारख त्यांना असल्यामुळें आणि त्यांच्या साहाय्याची ते किंमत ओळखून असल्यामुळें, गंगाधररावांना त्यांची भीड मोडवत नसे. आपल्या कृत्याचे बरेवाईट परिणाम भोगण्याची दोघांची सारखीच तयारी असे चुकलें तर कोणीं कोणाला कधी दोष दिला नाहीं.

गोविंदराव आणि गंगाधरराव एकमेकांचे पूरक होते असें म्हणणें चूक होणार नाहीं. एक शस्त्री तर दुसरा शास्त्री अशी पुंडलिकजींनीं त्यांची पहिल्याच प्रकरणांत ओळख देऊन टाकली आहे. सभांच्या, उत्सवाच्या, दौऱ्यांच्या योजना गोविंदरावांनीं ठरवाव्या आणि त्या पार पाडण्याची कामगिरी गंगाधररावांवर सोपवावी! उलट, गोविंदरावाचें हार्दिक सहकार्य गृहीत धरून गंगाधररावांनीं एक एक नवें व्याप शिरावर घ्यावे, असें काम चालत असे. आपली गुप्त व धाडसी योजना पार पाडताना—विशेषत जोखमीच्या राजकीय खटल्यातील साक्षीदार पळवून नेताना—गोविंदरावांनीं गंगाधररावांची आगाऊ संमति घेताना, किंवा त्यांना त्याचा सुगावा लागू देताना—कधींच दिसलें नाहीं. कार्यसिद्धि झाल्यावरच गंगाधररावांना त्या कळाव्या आणि त्यांनीं गोविंदरावाच्या हिंमती बुद्धीचें

कोणतेंहि उजाडलें तरी जुन्या युगातील या घटना आणि त्या प्रत्यक्ष घडवून दाखविणाऱ्या व्यक्ति विसरतां येत नाहींत. गोविंदरावाचें कार्यक्षेत्र फार मोठें नव्हतें. बेळगाव शहर आणि जिल्हा त्याच्याबाहेर ते क्वचितच पडले असतील. पण या ल्हानशा क्षेत्रात आपल्या कुवतीप्रमाणे त्यांनीं केलेले राजकीय उद्योग फार मोलाचे व महत् होते. या चरित्रग्रथावरून हें ध्यानात येईल कीं, कार्यक्षेत्र लहान घेऊनहि त्यात मनुष्य किती मोठा होऊ शकतो याचें डोळ्यात भरण्यासारखें उदाहरण म्हणजे गोविंदराव याळगी होत त्या उद्योगात स्वार्थाचा लवलेश नव्हता, सर्वस्वी देशाच्या भाग्याचा विचार होता, परराज्याची मनापासून चीड होती. गोविंदरावासारख्या कितीतरी अज्ञात व्यक्ति आणि कितीतरी अज्ञात घटना आपल्या या भागामध्ये होऊन गेलेल्या आहेत त्या सर्वांचा परामर्ष नवीन पिढीला स्फूर्तिकारक आणि बोधदायक झाल्यावाचून राहाणार नाहीं अग्रभागीं असलेल्या चारदोन पुढाऱ्याचींच नावे इतिहासामध्ये नमूद केलीं जातात. पण पाठीमागच्या शेकडों अज्ञात कार्यकर्त्यांच्या साहाय्यावाचून हे पुढारी कार्य करू शकले नसते. लोक गगाधररावाना पुढारी समजतात, पण ते स्वत ला गांधींचे आणि टिळकांचे अनुयायीच समजत त्यांनीं सोडलेले आदेश प्रामाणिकपणें शेवटास नेणे, कार्यान्वित करणें एवढेच कर्तव्य ते समजत. याळगींनीं आपल्या अनुयायित्वाचा बाणा केव्हाहि सोडलेला नाहीं. हरिकृपेनें ते आणखी जगले असते, तर देशकार्याला त्याचा फार उपयोग झाला असता, यात मला तिळमात्र शका नाहीं

श्री. पुडलीकजींच्या सराईत लेखणीमुळें, ते व्यक्ति किंवा घटना याचें लेखन फार परिणामकारक रीतीनें करू शकतात. बहुतेक घटना त्यांनीं प्रत्यक्ष डोळ्यानीं पाहिलेल्या आणि काहीं घटनामध्यें स्वतः प्रत्यक्ष भाग घेतलेला असल्यामुळें, एकदर पुस्तक फारच मनोरजक आणि उद्बोधक झालेलें आहे. पुडलीकजींनीं त्याच्या परिचयात आलेल्या अशाच आणखी व्यक्ति आणि घटना उजेडात आणाव्यात असें माझें त्याना आग्रहाचें मागणें आहे.

ता १४-२-१९६५
रविवार, मुबई

पां. म. बापट

# विषयानुक्रमणिका



सरकारी पुराव्याला सुरुंग लावणारे तपस्वी बाबासाहेब परांजपे



सौ. शांताबाई आणि श्री कृष्णराव याळगी



प्रकरण पहिलें

# शास्त्री आणि शस्त्री

मुंबई इलाख्यांतील म्हणजे नागपूर ते गदगपर्यंतच्या भागांतील असा एकहि सार्वजनिक क्षेत्रांतील कार्यकर्ता मिळणार नाहीं कीं, ज्याला कै. दे. भ. गंगाधरराव देशपांडे व कै. गोविंदराव याळगी यांची माहिती नसेल. कर्नाटकांतील जागृतीचे जनक म्हणून कै. गंगाधरराव देशपांडे यांची माहिती महाराष्ट्र–कर्नाटकच्या भागांत सर्वांना आहे. राजकीय क्षेत्रांतील आपल्या धडाडीच्या सेवेमुळें गंगाधरराव देशपांडे यांना 'कर्नाटकसिंह' ही सार्थ उपाधि जनतेनें दिलेली होती. अखिल महाराष्ट्रामध्यें परिणामकारक वक्ता म्हणून जीं जीं माणसें लौकिकास चढलीं त्यांत गंगाधररावांचें स्थान फारच वरच्या दर्जाचें होतें. आपल्या राजकीय जीवनाच्या प्रारंभीं, लोकमान्य टिळकांचें प्रस्थ कर्नाटकांत वाढूं नये, असा जरी त्यांनीं प्रयत्न केला असला तरी पुढें थोड्याच अवधींत त्यांच्या प्रभावळींत ते मिरवूं लागले. लोकमान्यांचा शब्द म्हणजे त्यांना वेदवाक्य वाटूं लागला. लोकमान्यांच्या विश्वासांतील वर्तुळांत त्यांना स्थान लाभलें. म्हणूनच लोकमान्यांना एखादी यशस्वी परिषद भरवावयाची असेल तर ते ती एक पुण्यामध्यें तरी भरवीत किंवा बेळगांवात तरी भरवीत. लोकमान्य मंडालेहून सुटून आल्यानंतर चळवळीचीं सूत्रें हातीं घेऊन त्यांना 'पुनश्च हरिः ॐ' करावयाचें होतें. त्या वेळीं लोकमान्यांनीं पहिली तार गंगाधररावांना पाठविली होती, ही गोष्ट मशहूर आहे. चिरोल खटल्यासाठीं विलायतेंत जाण्यापूर्वी 'आपल्या गादीवर गंगाधररावांनीं बसावें' अशा आशयाचे उद्गार लोकमान्यांनीं काढले होते. लोकमान्यांच्यानंतर म. गांधींनीं भारताचें पुढारीपण घेतलें. त्यांच्याहि पंचायतनामध्यें गंगाधरराव यांना जागा मिळालेली होती. ही जनतेच्या नजरेपुढचीच गोष्ट आहे.

गु. गंगाधरराव यांनीं आपलीं पांच तपें म्हणजे सरासरी तीन पिढ्यांचा काळ जी राष्ट्रसेवा केली, जी कामगिरी बजावली, ज्या अनेक चळवळींचें नेतृत्व पत्करून स्वातंत्र्याच्या लढ्यामध्यें लो. टिळक आणि म. गांधी यांना साथ दिली व

त्यांच्या मनांतील स्वराज्याचें स्वप्न साकार झालेलें 'याचि देहीं याचि डोळा' ते पाहू शकले, त्यांतील रहस्य काय आहे, हें गंगाधरराव देशपांडे आणि गोविंदराव याळगी यांच्या चरित्राची व चारित्र्याची माहिती करून घेतल्यावाचून ध्यानांत येणार नाहीं. आपल्या स्वतःच्या प्रांतामध्यें अनेक क्षेत्रांत जो स्वतःला प्रांताचें स्फूर्तिस्थान बनवून घेतो आणि आपल्या प्रांतांतील जनतेची खरी व स्वार्थत्यागपूर्वक धडाडीनें सेवा करून लोकमानसांत स्वतःच्या कर्तृत्वाची मूर्ति प्रस्थापित करूं शकतो तोच अखिल भारतीय क्षेत्रामध्येंहि आपलें वजन पाडूं शकतो. याच न्यायानें आपल्या स्वतःच्या जिल्ह्यामध्यें आणि विशेषतः आपल्या राहत्या भागांत आपल्या सेवेनें, त्यागानें व बलिदानानें जनतेच्या अंतःकरणापर्यंत ज्याचा प्रवेश झाला असेल अशा थोर पुरुषालाच प्रांतीय मोल येतें. जनता त्याची प्राणप्रतिष्ठा करते. गंगाधरराव व गोविंदराव दोघेहि असल्या दिव्यांतून मुळापासून निघाले आहेत. ही गोष्ट या दोघांना कशी साध्य झाली ? त्याकरतां त्यांनीं कोणती साधना केली ? साध्य गांठीत असतां त्यांना कोणत्या अडचणी आल्या ? त्यांतून ते कसे निभावून गेले ? या सर्वांचा इतिहास म्हणजेच या दोन देशभक्तांचें चरित्र होय.

लो. टिळकांनीं केलेल्या प्रत्येक चळवळीची धुरा आणि महात्मा गांधींनीं त्याचेंच निशाण आपल्या हातीं घेऊन स्वातंत्र्याचा लढा देण्यासाठीं जीं जीं आंदोलनें केलीं त्या प्रत्येक प्रसंगीं, आपल्या विभागाची जबाबदारी या दोघा नरवीरांनीं आपल्या शिरावर घेतली व ती यशस्वीपणें तडीला नेऊन दाखविली. त्यासाठीं त्यांनीं आपलें अंतःकरण उदार व व्यापक करून घेतलें होतें, व कार्याविषयीं आत्यंतिक निष्ठा बाळगली होती. काम करीत असतां कधीं कंटाळा केला नाहीं कीं कामचुकारपणाहि केला नाहीं. आपण कितीहि प्रामाणिक, धाडसी व कल्पक असलों तरी तेवढ्यानें भागत नाहीं. त्याची खात्री जनतेला पटवून दिली पाहिजे, व ती तिला पटली पाहिजे तरच अंगीकृत कार्यांत यश येणें शक्य होतें. जनतेच्या विश्वासाची अशी पावती असल्यावाचून लोकसंग्रह होत नाहीं, अनुयायी मिळत नाहींत व निष्ठावान सहकारीहि लाभत नाहींत. गंगाधरराव व गोविंदराव यांना अशी बैठक व सामग्री प्राप्त झालेली होती. या सर्व शक्तीचा उपयोग त्यांनीं देशसेवेसाठींच करून दाखविलेला आहे. लोकमान्य टिळक आणि म. गांधी यांनीं उभारलेल्या सर्व चळवळींमध्यें या दोघांनीं कर्नाटक प्रांत—विशेषतः मुंबई कर्नाटक म्हटला जाणारा भाग—मागं पडूं दिला नाहीं. या सर्व गोष्टी गंगाधररावांच्याकडून करवून घेण्याचें बरेंचसें श्रेय गोविंदराव याळगी यांना द्यावें लागतें. गोविंदरावांच्यामुळें गंगाधरराव घडविले गेले कीं गंगाधररावांच्या सहवासांत सतत राहिल्यामुळें गोविंदरावांची मूर्ति निर्माण झाली, हें ठरविणें तितकेसें सोपें नाहीं. या दोघांचीं व्यक्तिजीवनें एकमेकांत इतकीं ओतप्रोत होऊन गेलीं आहेत कीं, इ. स. १९०५ पासून तों इ. स. १९२२ पर्यंत तरी सार्वजनिक कार्यक्षेत्रांत एकाला सोडून दुसऱ्याला त्याचें स्वतंत्र

जीवनच उरलें नव्हतें, असें म्हणावें लागेल. या काळातील धडपडीमध्यें जी एक पिढी तयार झाली तिचा उपयोग गगाधररावानी राष्ट्रसेवेंत करून घेतला. या पिढींतील उमदा तरुण म्हणजे गोविंदराव होत. लोकमान्यांनीं गोविंदराव याळगी याची माहिती मिळविली होती, पण म. गांधींना गोविंदरावाची विशेष माहिती नव्हती. त्यांच्या परिचयात येण्याइतकी सवडहि कालगतीनें गोविंदरावाना मिळाली नाहीं. तसा दैवयोगच नव्हता ! काळलिखित काहीं वेगळेंच होतें !

गु गगाधरराव देशपाडे याना गोविंदराव चळवळीशिवाय स्वस्थ बसू देत नव्हते. ही गोष्ट प्रस्तुत लेखकानें आपल्या डोळ्यानीं पाहिलेली आहे. काहीं वर्षें गोविंदराव याळगी याच्याबरोबर सेवाकार्य करण्याची रुचि व भाग्य त्याला लाभलेलें आहे. व्याख्यानाचा विषय आपणच ठरवून जाहीर सभा बोलवावी, त्याच्या जाहिराती छापाव्या व गावात वाटाव्या आणि अगर्दी ऐनवेळीं तें छापील आवेदन गगाधररावाना दाखवून सभेला येण्याविषयीं गोविंदरावानीं विनती करावी. गगाधररावहि कधीं नाइलाजानें तर कधीं मुखसमाधानानें त्या सभेला जात. व्याख्यानें देत व गोविंदरावानीं योजलेली सभा निर्विघ्न पार पडे. गोविंदरावानीं करविलेलीं अशीं कितीतरी व्याख्यानें व प्रसग प्रस्तुत लेखकाला ऐकावयाला व अनुभवावयाला मिळालेले आहेत. गोविंदरावाचे असले हट्ट गगाधरराव कधीं खुषीनें तर कधीं नाखुषीनें, कधीं लोभानें तर कधीं रागानें पुरवीत असत. गगच्या प्रवाहाप्रमाणें आणि सिंहगर्जनेच्या आवाजात गगाधररावाचें वक्तृत्व एकदा सुरू झालें आणि रगलें कीं श्रोतृसमाज भावनावश होऊन हेलावून जात असे. गगाधररावाचीं असलीं घनगर्जित भाषणें गोविंदराव व्याख्यात्याच्या समोर बसून एकाग्र चित्तानें ऐकत असत. बोलण्याच्या ओघात गगाधररावाच्या तोंडून आदोलनाची जी दिशा प्रतिपादली जात असे त्याला दुसऱ्या दिवसापासूनच मूर्त स्वरूप देण्याच्या उद्योगाला गोविंदराव लागत असत. त्यात दिरगाई अगर कुचराई बिल्कूल होत नसे. आखाडे, राष्ट्रीय शाळा, गणपति-उत्सव, शिवाजी उत्सव, शिमग्याचा सण, स्वदेशीचीं दुकानें, मद्यपाननिरोधन (पिकेटिंग), बहिष्काराचीं आदोलनें, क्रातिकारक जहाल पुढाऱ्याना आणवून त्याचीं व्याख्यानें करविणें, तालुका परिषदा, जिल्हा परिषद अगर इलाखा परिषद अशा या ना त्या नावाखालीं अनेकविध सभा घेणें, संमेलनें भरविणें अशा अनेक कामाच्या आधीं आणि नतर पाठपुरावा करीत राहणें व बेळगाव शहर, तालुका आणि जिल्हा यातील चळवळ जागती ठेवणें आणि प्रत्येक चळवळींत बेळगावचें स्थान आघाडीवर ठेवणें अशीं कामें गगाधरराव-गोविंदराव या शास्त्री आणि शास्त्रीच्या जोडीनें आपल्या अगावर घेऊन यशस्वी रीतीनें पार पाडून दाखविली आहेत.

हीं कामे करीत असताना ज्या तरुणाच्या अत करणात समाजामध्यें कार्य करण्याचा व देशसेवेचा स्फुल्लिंग दिसून येई, त्याला हाताशीं धरून सत्कार देण्याचें

काम गोविंदराव करीत असत. लोकांना मदत करण्याची संधि ते कधींच दवडीत नसत. आपल्या हातीं येईल तो पैसा वरीलसारख्या कामात आणि नवीन नवीन कार्यकर्त्यांकरता खर्च करण्यात गोविंदरावांनीं आपला हात कधींहि आखडता घेतला नाहीं. ज्याला एकदा आपला म्हटलें त्याच्यासाटीं आपलें सर्वस्व वेचण्याची दानत गोविंदरावांनीं एवढेंच नव्हे तर त्यांच्या कुटुंबातील सर्वच आबालवृद्धांनीं आपल्या रक्तात भिनवून घेतली होती. त्यांच्या कुटुंबातील कोणासहि 'थोडे' हा शब्दच माहीत नव्हता. कुटुंबातील आश्रित स्वत: कुटुंबवत्सल झाल्यानंतरहि आपल्या वाढलेल्या वेलासह याळगींच्याच कुटुंबात राहात असत व वाढत असत. यात घरच्या कोणाला काहीं अनैसर्गिक अगर परकेपण जाणवत नसे, हें त्यातील वैशिष्ट्य आहे. त्यांच्या घराण्यांतील ही प्रथा आजतागायत तशीच चालू आहे. ही गोष्ट या भागात किती मशहूर झाली होती, याचें प्रत्यंतर प्रस्तुत लेखकाला एकदा सहज पाहावयास मिळालें.

मी व गंगाधरराव देशपांडे एकदा त्यांच्या खेड्यांतून बेळगाव शहराला रेल्वेनें येत असता, ज्या डब्यामध्यें आम्ही चढलों त्याच डब्यात सातआठ भीक मागणारे साधू निनतिम्टिानें प्रवास करीत होते. वेळ जाण्यासाटीं गंगाधररावांनीं त्या साधूंना बोलतें केलें, विचारलें कीं, आता बारा वाजून गेले, यानंतर गावात तुम्हाला कोण भिक्षा घालणार? आणि मिळाली भिक्षा तरी ती चावल–आटा अशी कोरडीच असणार. मग इतक्या उशीरा जाऊन व्हायचें कसे? त्यावर त्या साधूंनीं (आपल्या हिंदी भाषत) अगदीं सहज सांगितलें कीं, "आपल्याला माहीत नाहीं काय? या शहरात याळगींचें एक घर आहे त्यांच्या दरवाजावर केव्हाहि गेले तरी घरचीं माणसें भोजन दिल्याशिवाय राहात नाहींत. मालक बडा सरदार है।" त्यांचें हें उत्तर ऐकून गंगाधररावांना आनंद झाला. 'माझी जीवन-कथा' या पुस्तकात गंगाधररावांनीं गोविंदरावांच्या स्वभावाची शब्दरेखा पुढीलप्रमाणें काढली आहे.

"त्यांनीं (गोविंदरावांनीं) बेळगावात केलेली सार्वजनिक कामगिरी अगदीं अमूल्य होती. त्यांचें शिक्षण फार झालं नव्हतं. तरी त्यांचें अंत:करण इतकें उदार व भावना इतक्या तीव्र होत्या कीं, शिक्षणाची उणीव त्यांच्या सार्वजनिक आयुष्यात कधींच भासली नाहीं. सन १९०५–६ सालापासून त्यांच्या मरणापर्यंत म्हणजे १९२३ पर्यंत बेळगावातील सर्व सार्वजनिक चळवळींचे ते प्राण होते. माझ्या तर सर्व प्रवृत्ती त्यांच्यावरच अवलंबून असत. त्यांची मदत मला नसती तर माझ्या हातून जी अल्पस्वल्प देशसेवा घडली आहे ती घडली असती असें मला वाटत नाहीं. सार्वजनिक कामें करीत असता किंवा माझ्या खाजगी आयुष्यात माझ्यावर जे प्रसंग आले त्या सर्व प्रसंगीं गोविंदरावांचें मला अत्यंत साह्य झालें आहे. गोविंदरावांचा व माझा संबंध नित्यैक वर्षांचा

असल्यानें व त्याचा उल्लेख पुढें अनेक ठिकाणीं येत असल्यानें त्याचा व माझा प्रथम परिचय कसा झाला हें सांगणें प्राप्त झालें. त्याच्या पश्चात् त्याच्या बंधूनीं त्याचें मत चालविलें आहे. याळगींचें घर म्हणजे बेळगांवातील एक सार्वजनिक संस्था म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. असो."

—*माझी जीवनकथा* पृ १०८

रोजचीं वर्तमानपत्रें वाचताना गोविंदराव हें पाहत असत कीं, लोकमान्यांनीं किंवा महात्माजींनीं आणखी नवीन कांहीं चळवळ आरंभिली आहे काय? आमच्याकडून कांहीं नवीन अपेक्षा ते करतात काय? चालत्या चळवळी कोणत्या प्रांतात काय वळणानें चालतात? चळवळीचें धोरण कोण किती पाळतो? नवीन कार्यकर्ते कोण पुढें येत आहेत? असल्या गोष्टी पहाण्यातच त्याचें सारें लक्ष असे. आपल्या आजूबाजूच्या समाजात कोणी दुःखी आहेत काय? कोणाला कांहीं अडचण आली आहे काय? सरकारी ब्रिटिश अधिकान्यांची कोणावर वक्रदृष्टि झाली आहे का? याकडे गोविंदरावाचें बारीक लक्ष असे. गोविंदरावाचा हा मनोधर्म माहीत झाल्यामुळें तसे नडलेले लोक त्याच्याकडे येत असत व आपलीं कामें करवून घेत असत. सामान्य जनतेचा संबंध अशा रीतीनें गोविंदरावाशीं येत असल्यामुळें त्यांना मदत करण्याची संधि किंवा सेवेचा प्रसंग गोविंदराव कधींच वाया जाऊ देत नसत. बाहेरच्या म्हणजे अन्य प्रांतातील कोणत्या जहाल पुढान्याचे दौरे कोठे चालले आहेत त्यावर बारीक नजर ठेवून त्यांना आपल्या जिल्ह्यामध्यें व पुढें प्रांतामध्यें फिरवून त्यांचीं व्याख्यानें करविण्याची संधीहि ते व्यर्थ जाऊ देत नसत. एक स्थानिक जबाबदार नेता या नात्यानें अशा जहाल नेत्यांशीं, त्याच्या दौन्यांशीं किंवा त्याच्या स्थानिक व्याख्यानांशीं गंगाधररावांना संबंध राखावाच लागत असे. अशा धडपडीमधून आणखी कांहीं नवीं नवीं आंदोलनें, प्रसंग, घटना उभ्या राहत असत त्याला ही शास्त्रीशस्त्रींची दुक्कल तोंड देत असे. या सर्व गोष्टींचे परिणाम त्याच्यावरच नव्हे तर त्याच्या संपर्कामध्यें येणान्या ल्हानथोर कार्यकर्त्यांवरहि सहजच होत असत. त्यामुळें भिन्न भिन्न चळवळींत त्यांना कार्यकर्त्यांची कधीं वाण पडली नाहीं. कार्यकर्ते विपुल मिळत राहिल्यामुळें नवनवीन चळवळींचा व संस्थांचा पाया घालण्यास अनुकूल वातावरण उत्पन्न होत गेलें. *चळवळ आणि कार्यकर्ता या दोन्ही गोष्टी एकमेकावर अवलंबून आहेत.*

प्रथम प्रथम ही जोडी क्रांतिकारक चळवळीचें जाळे या भागात पसरविण्याच्या नादाला लागली होती. लोकमान्यांनीं त्याचा भरपूर उपयोग करून घेतला. लोक जागृतीच्या कामीं आणि इंग्रजाविरुद्ध द्वेष व गुलामगिरीविषयीं रात पसरविण्याच्या कामीं त्यांना लावलें. या जोडीनें तो मार्ग निधड्या छातीनें चोखाळून पाहिला. क्रांतिकारक विचारानून एखादा सच्चा देशसेवक बाजूला सरकत आहे, असें

दिसल्यास त्यांना अत्यंत दुःख होत असे. पू. काकासाहेब कालेलकर यांनीं गांधीजी-प्रणीत अहिंसेची विचारसरणी आत्मसात् करून घेतल्याचें कळताच गोविंदराव ढळढळा रडले होते. एक क्रांतिकारक कमी झाल्याचें तें दुःख होतें. पण पुढें गंगाधरराव व गोविंदराव या दोघांनींहि गांधीजींचें अनुयायित्व पत्करलें. क्रांतिकारक मार्गानें हिंसा करण्याची व करविण्याची साधनसामुग्री जुळवणारे व ती वापरण्याची संधि पहात बसलेले व त्या दृष्टीनें आपला जीव अहर्निश संकटात घालणारे—अशांनीं अहिंसा स्वीकारणें आणि एखाद्या नवीन होतकरू कार्यकर्त्यानें अहिंसा स्वीकारणें यात जमीनअस्मानाएवढें अंतर आहे. हिंसेचा मार्ग चोखाळण्यास जे गुण लागतात त्या गुणांचा उपयोग अहिंसेचा मार्ग चोखाळताना होत नाहीं, असे नाहीं. किंबहुना असले कार्यकर्तेच त्या दिशेनेंहि धाडसी प्रयत्न व प्रयोग करू शकतात. येरागबाळाचें तें काम नव्हे. गंगाधररावांच्या पावलावर पाऊल ठेवून गोविंदराव यांनीं आपल्या आचारविचारांत आमूलाग्र बदल करून घेतलेला होता. आपल्या आयुष्यातील शेवटचीं दहा वर्षे गोविंदरावांनीं त्या मार्गानें लोकसेवा करून दाखविलेली आहे. इ. स. १९४२ सालीं गोविंदराव हयात असते तर त्यांनीं काय करून दाखविलें असतें याची कल्पना आज करावी तेवढी थोडीच आहे.

आपल्या जीवनानें आणि तनमनधनानें गोविंदरावांनीं आपल्या छोट्याशा जीवनात किती व कसे काम करून दाखविलें आहे, याचा ठाव घेण्याचा प्रयत्न मी या छोट्याशा पुस्तकामध्यें करणार आहें. सन १९०५ पासून १९२३ पर्यंतचा इतिहास पाहिल्यास या जोडीपैकी केवळ एकाचेच चरित्र, दुसऱ्याचा उल्लेख न करता, लिहिता येणें अशक्यच आहे. त्यापैकीं गोविंदरावाची थोडी अधिक कौटुंबिक व खाजगी जीवनाची माहिती वाचकापुढें ठेविल्यास त्या पार्श्वभूमीवर गोविंदरावाच्या खऱ्या दर्शनास मदत होण्यासारखी आहे. गोविंदरावाचें चरित्र गंगाधररावाच्या चरित्राला पूरक भाग म्हणून आवश्यकहि आहे. अनेक लहानसहान चळवळी उभारून, अडीअडचणीच्या वेळीं गरजू लोकांच्या उपयोगी पडून, जी तपस्या गोविंदरावांनीं केली, त्यातून जें वातावरण उत्पन्न होत होतें व जो मसाला हातीं येत होता त्या सर्व सामग्रीचा उपयोग गंगाधरराव व गोविंदराव यांच्या जोडीनें आपल्या जिल्ह्यात व प्रांतात राजकीय जागृति उत्पन्न करण्यामध्यें व देशातील श्रेष्ठ पुढाऱ्यांनीं चालविलेल्या स्वातंत्र्यलढ्याला तेज चढविण्याच्या कामीं केलेला आहे. याचें दर्शन घडविण्यास मुख्यतः गोविंदरावाचें चरित्र उपयोगी ठरणारें आहे. म्हणून आता त्याकडेच दृष्टिक्षेप करू.



प्रकरण दुसरें

# याळगी कुटुंब

गोविंदरावाचे वडील बेळगाव जिल्ह्यातील सौंदत्ती तालुका कचेरींत एक कारकून होते, मध्यम स्थितींतील एक सद्गृहस्थ होते. आणि मातोश्री शिरहट्टी संस्थानातील एका सत्त्वशील ब्राह्मणाची कन्या होती. तिचे मामा त्या भागातील अति प्रसिद्ध असे बडे जमीनदार होते. त्यांना तम्माण्णा नाईक नरगुदे म्हणत. गोविंदरावाचे वडील वेंकटराव हे विलक्षण करारी, बाणेदार व तापट स्वभावाचे होते. त्यांची बदली होऊन ते तालुका कचेरीमध्यें शिरस्तेदार झाले. आणि शेवटीं अबकारी खात्यामध्यें इन्स्पेक्टर म्हणून हुद्द्याची जागा त्यांनीं मिळवली. त्यांच्या मातोश्री सत्त्वशील, शांत व प्रेमळ स्वभावाच्या होत्या. अशा दांपत्याच्या पोटीं गोविंदरावाचा जन्म १८८४च्या नोव्हेंबर महिन्यात आजोळीं म्हणजे शिरहट्टी गावीं झाला. श्री. व्यंकटरावाचे धाकटे बंधु श्री. आप्पाराव हे बेळगावीं आरोग्यखात्यात (सॅनिटरी डिपार्टमेंटमध्यें) अव्वल कारकून असल्यामुळें, दोघा भावांनीं मिळून बेळगाव येथें एक घर घेतलें. त्यामुळें वडिलांच्या पश्चात् याळगी कुटुंब बेळगाव येथें येऊन स्थिर झालें.

याळगी कुटुंबात गोविंदरावासह चार भावंडें; गोविंदराव, तारु, कृष्णराव आणि जीवनराव. गोविंदरावाच्या पाठची बहीण तारु हिचें लग्न तिच्या वयाच्या नवव्या वर्षी झालें व पुढे दोन वर्षांचे आतच तिला वैधव्य प्राप्त झालें. तो सर्व इतिहास बुद्धीला थक्क करून सोडणारा व अनेक कौटुंबिक घटनांवर प्रकाश टाकणारा आहे. *तारूचें लग्न स. १८९६ चे सुरुवातीस सोंडूर मुक्कामीं झालें. त्याच्या वेळीं ती अवघी* नऊ वर्षांची बाला होती. त्यानंतर दोन वर्षांनीं म्हणजे ती वयात येण्यापूर्वीच तिच्या पतीचें देहावसान झालें. संसार म्हणजे काय हें समजू लागण्यापूर्वीच तिला आपलें *अभागी मुख अंधारात ठेवण्याची पाळी आली.* पतिनिधनानंतर एकदोन वेळा ती सासरीं जाऊन राहून आली. स. १८९८ पर्यंत पुन: सासरीं जाण्याचा प्रसंग तिला आला नाहीं.

तारूचें लग्न गोंडर संस्थानातील व्यंकटराव सराफ यांच्याशीं झालें होतें. तिचें सासरचें घराणें सुसंस्कृत आणि त्या घराण्यातील एकुलता एक दौलतीचा राव असा व्यंकटराव तिला पति लाभला होता. तारूला चांगलें स्थळ मिळालें या आनंदात सर्वजण होते. पण दैवाला हें सुख लाभू द्यावयाचें नव्हतें. लग्नानंतर दोन वर्षांत व्यंकटरावाला क्षयानें ग्रासलें. सर्व लोक तसेंच मानत आले. त्या लहान वयात आपल्यावर केवढा मोठा आघात झाला आहे याची त्या बिचाऱ्या बालिकेला काय कल्पना असणार! तिलाच काय, पण तिच्या भावंडानाहि काय घडतें आहे हें कळण्याइतकें त्यांचें वयच नव्हतें. परंतु मुलगी कायमची घरीं परतली याचें तिच्या आईला जें अपार दुःख झालें, पोटात जी कालवाकालव झाली, डोळ्यांतून जीं आसवें ओघळत याची कल्पना त्या लहान जीवांना कशी येणार! या सर्व भावंडात जीवनराव सर्वांत लहान असल्यामुळें सदासर्वकाळ तो आपल्या आईजवळ असावयाचा. तारूला तिची आई एक घटकाभरहि विसंबत नसे. त्यामुळें लहान मुलगा जीवन, तारू आणि तिची आई हीं तिघंहि नेहमीं एकत्र असत. साहजिकच त्यांच्यामध्यें प्रेमभाव, एकात्मता आणि एकजीवपणा अधिक उत्पन्न झाला होता. तारूचें शिक्षण तेव्हा पाचव्या इयत्तेपर्यंत झालें होतें. दुपारचे वेळीं घरकामातून मोकळें झाल्यावर आईला पांडवप्रताप, हरिविजय, वगैरे सारखीं पुस्तकें वाचून दाखविण्याचें काम तारू करीत असे. लहान भाऊ जीवन त्या वेळीं तिथेंच कुठें तरी आसपासच खेळत असावयाचा. त्यालाहि तें सर्व एकावयास मिळत असे.

त्यांच्या घरीं घोंडभटजी सदलगे या नांवाचे एक भटजी पूजेसाठीं व कांहीं नैमित्तिक कामासाठीं येत असत. त्यांना तीन मुलगे होते. त्यांपैकीं पहिले दोन चिरंजीव संथा न घेता, भिक्षुकीचा मंत्राभ्यास न करता, कांहींहि न शिकतासवरता तसेच वाढत होते, लहानाचे मोठे होत होते. लहान वयात आपण आपलें आयुष्य कसें घालवितों हें स्वतःला तर समजत नसतेंच पण दुसऱ्या कोणी तें समजून सांगितलें तरी तें मुलाच्या डोक्यात कित्येक वेळा शिरतहि नाहीं. आपल्या चुका मनुष्याच्या ध्यानात लवकर येणें यालाहि पूर्वपुण्याई गाठीं असावी लागते. या दोन भिक्षुक मुलाचा धाकटा भाऊ विष्णु थोडेंफार शिकला. त्याला लहानपणीं शिकण्याचें प्रोत्साहन मिळालें नसतें तर ताहि आपल्या दोघा वडील भावाप्रमाणेंच कोठें तरी पराळाच्या दुकानात कांहीं चाळण्यालिहिण्याच्या कामावर नोकर राहिला असता. हा विष्णु अधूनमधून याळगी याच्या घरीं येत जात असे. त्याला निरनिराळ्या पोथ्या वगैरे आणून देऊन त्याच्याकडून वैदिकीचे व भिक्षुकीचे मंत्र पाठ करवून घेतले आणि त्याला आपल्या घरींच पूजेला ठेवून घेतलें होतें त्या योगानें विष्णूच्या वडिलांना मनस्वी आनंद झाला. हा मुलगा आपल्या वडिलांच्या पश्चात् भिक्षुकी चालवील, आपल्या घराण्याची परंपरा व नाव राखील असेंच सर्वांना वाटत होतें. विष्णूच्या

या शिक्षणाचें सारें श्रेय भगिनी तारूलाच आहे. तिनेंच त्याच्यामागें लागून त्याच्याकडून हे सारे मन्त्र पाठ करवून घेतले होते.

यानंतर धर्माच्या रूढीप्रमाणें तारूनें 'सोवळें' व्हावें यासाठीं तिच्या मावशीचा फारसा तगादा होता. त्या काळीं असल्या धार्मिक रूढी टाळणें किंवा तोडणें सोपं नव्हतें. इतर गोष्टी कांहींहि असोत मावशीला त्यात कितपत कळत होतें कोण जाणे! तारू सोवळी झाल्यानंतर तिच्या हातचा स्वयंपाकाचा नैवेद्य देवाला चालणार होता आणि आई मावशींना सोवळ्यातओवळ्यात तिच्याकडून कामाधामात थोडा हातभार लाभणार होता. रूढीच्या विरुद्ध तोंडातून शब्द काढण्यापूर्वी त्या काळीं कोणालाहि दहा वेळां विचार करावा लागत असे. त्यामुळें थोड्याच दिवसात तारूच्या सोवळ्याचा तो विधीहि पुढें नरसोबाच्या वाडीला जाऊन उरकून घेण्यात आला! आता तारूला प्रौढपणा आला. घरच्या सर्व कामधंद्यात आई मावशींना मदत करणें, आपल्या लहान भावंडाच्या शिक्षणाकडे लक्ष देणें, देवपूजा, पोथी पुराण, या सर्व गोष्टीहि पूर्वीप्रमाणेंच चालू होत्या. त्यानंतर तारूनें असा विषय काढला की, 'उद्या वहिनीला मुलें झाल्यावर तीं मुलेंहि आपल्याप्रमाणेंच सर्वांना एकवचनी किंवा एकेरी संबोधतील, वडिलांना 'गोविंद' म्हणतील, आत्याला 'तारू' म्हणून हाक मारतील किंवा काकांना 'कृष्णु, कृष्णु' करतील तेव्हा असे एकेरी बोलणें टाळावें. याळगींच्या घरात सर्व भावंडें आपसात एकमेकांना एकवचनीच संबोधीत असत. त्याच्या घरीं लक्ष्मणराव देशपांडे नामक एक शिक्षक लहानपणापासून राहात असत. त्यानांदेखील घरचीं सर्व मुलेंमाणसे अरेतुरे संबोधीत. अशा एकेरी बोलण्यामध्यें एकप्रकारचें खेळीमेळीचें व निकटच्या प्रेमाचें वातावरण घरात नांदत असे, हेंहि तितकेंच खरें आहे. परंतु घरच्या लहान मुलांवर एक प्रकारचे सुसंस्कार होऊ देण्याच्या दृष्टीनें तारूनें ती एकवचनी बोलण्याची प्रथा बंद पाडून, घरीं लहान मुलें जन्मण्यापूर्वीच दादा, अक्का अशासारख्या नावानें हाक मारण्याची कल्पना प्रत्यक्षात आणिली. अर्थात् हा प्रश्न आपोआपच सुटला. परंतु भाचा पाहण्याचें भाग्य लाभण्यापूर्वीच तारूला इहलोकाची यात्रा संपवावी लागली.

१९०३ च्या सुरुवातीलाच तारूच्या अंगात येऊ लागलें. जगात भूतयोनी आहे किंवा नाहीं हा एक वादग्रस्त प्रश्न आहे. त्याला दोन्ही बाजूंनीं साधकबाधक कारणें व उलटसुलट अनुभव लोकांनीं सांगितले आहेत. डॉक्टराचें औषध लागू न पडणारा हा एक रोग आहे, असें चिकित्सक वृत्तीचे लोक म्हणत असतात. तसाच एखादा लोकविलक्षण अनुभव भुताखेताच्या बाबतींत आला व ते निरुत्तर झाले तरी ते म्हणत राहतील कीं, 'हें कसें झाल किंवा कसें होतें तें आम्हाला सांगतां आलें नाहीं तरी आमची चिकित्सक बुद्धि भूतयोनीचें अस्तित्व कबूल करण्यास तयार होत नाहीं.' असो तारूच्या अंगात येऊ लागल्यामुळें तिला नरसोबाच्या वाडीला नेऊन ठेवावें लागलें आणि कोणास तरी तिच्याबरोबर राहणेंहि क्रमप्राप्तच होऊन बसलें. तिच्याबरोबर

तिची आई वाडीस गेली होती. तारूच्या अंगांत आल्यावेळीं तिनें एकदा नदीच्या पाण्यांत उडी घेतली. कृष्णा नदीला त्या वेळीं पूर आलेला होता. वाडीचे पुजारी पोहण्यात चांगलेच पटाईत असतात. त्याना असले प्रसंग वारवार येतात. ते नदीच्या काठीं राहतात आणि लहानपणापासूनच त्यांचें जीवन पाण्याशीं निगडित झालेलें असतें. कृष्णामाईच्या पाण्यांतच ते लहानाचे मोठे झालेले असतात. त्यांना तिच्या प्रवाहाची, पुराच्या पाण्याची भीति मुळींच नसते. त्यामुळें तारूनें पाण्यात उडी घेतांच पुजारी मंडळींनीं लागलीच पाण्यात झेप टाकून तारूला पाण्याबाहेर काढलें व वाचविलें. अजूनहि तारूच्या अंगातलें भूत उतरलें नव्हतें. तिनें पुनः लागलीच नदींत उडी टाकली. त्यातून तिला पुजाऱ्यानीं पुनः वर काढली. तिचा देह ताठ झाला. दातखीळ बसली. तारूची ती दशा पाहून आई व दादा म्हणजे गोविंदराव याना काय वाटलें असेल याची कल्पना कोणासहि सहज करता येईल. तिचे कपडे बदलल्यानंतर तारू हळूहळू शुद्धीवर येऊं लागली. त्या वेळीं तिला कमालीची अशक्तता आली. यानंतर मात्र पूर्वीप्रमाणें तिच्या अंगांत कधीं आलें नाहीं. तशी तिची प्रकृतीहि पूर्वीप्रमाणें सुधारूं शकली नाहीं. पुढें दोनतीन महिन्यांत म्हणजे भाद्रपदमासांत प्लेगानें तिच्यावर झडप घातली. त्यातून तिच्या वाचण्याचें चिन्ह दिसेना. त्या वेळीं तिच्या धाकट्या दोघा भावाना म्हणजे कृष्णराव व जीवनराव याना शिरहट्टीस आजोळीं पाठविण्यात आलें. यानतर एका आठवड्यातच प्लेगने तिचा बळी घेतला. आणि तिचा पवित्र देह बेळगावात पंचत्वाला मिळाला. भगिनी तारूची स्मृति तिच्या भावाना सदैव ताजीच राहिली आहे. तिच्या बालवयांतील ती मोठेपणाची जाणीव कदापि बुजणें शक्य नाहीं. तिची विस्मृति होणें अशक्य आहे.

## तारूच्या भुताचें कोडें

तारूचें लग्न झालें त्या वेळीं ती नऊ वर्षांची होती. पुढें दोन वर्षांतच तिच्या पतीचें निधन ओढवलें हें पूर्वीं आलेंच आहे. तारू आपल्या आईला पुराणकथा वाचून दाखविण्यात व घरगुती कामात मदत करीत असता सन १९०३ चे प्रारंभीं एका एकादशीचे दिवशीं दोनप्रहरीं तारू चुलीपुढें स्वयंपाक करीत बसली असताना तिनें एकाएकीं मोठ्यानें किंकाळी फोडली. ती तेथें चुलीजवळच बेशुद्ध पडली. चुलीवर तव्यात भाकरीसाठीं ठेविलेलें आधण उकळत होतें. तिची किंकाळी ऐकून आई, भावंडें व इतर मंडळी तिच्याजवळ धावत गेली. कदाचित् कोठेंतरी भाजलें असावें, अशा कल्पनेनें आईनें तिला तपासून पाहिलें. तिच्या डोक्यावर गार पाणी मारून पाहिलें. शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न केला. ती अर्धवट शुद्धीवर येते न येते तोंच समोरचीं माणसे पाहून तिनें पुनः एक किंकाळी फोडली आणि ती एकदम उठून बसली. एकप्रकारचें विकट हास्य केलें. तिला अंथरुणावर नेऊन झोपविलें

तरी तिचें मधूनमधून किंकाळणें नि हंसणें चालूच होतें. याच अवस्थेंत तिचे एकदोन दिवस गेले. ही भूतबाधा असावी अशा समजुतीनें तसेहि उपचार-तोडगे सुरू झाले. त्या पहिल्याच आठवड्यात एका मांत्रिकाला बोलावून आणिलें. सध्याकाळच्या वेळेस त्यानें आपले उपचार चालू केले. भूताखेतावर उपचार करण्याचा योग्य समय म्हणजे संध्यासमयच मानला जातो. अंगात आलेल्या माणसाला अनेक प्रश्न विचारणें, जमिनीवर छडी मारणें वगैरे त्या उपचारांतील तऱ्हे आहेत. अंगात सचार झालेल्याना 'झाड' म्हणतात. झाड खट्टर असेल तर तें असल्या साध्या मंत्रतंत्रांना दाद देत नाहीं. झाड भिन्न लिंगी असलें म्हणजे पुरुषाला स्त्रीनें झपाटणें अगर पुरुषाचें भूत लागणें असा प्रकार असला तर तो समंध आपला आधार सोडीत नाहीं व प्राथमिक छाछूला बधत नाही अशी लोकांत बोलवा आहे. काहीं वेळ्या तारूचें झाड उत्तर देईना. म्हणून त्या मांत्रिकानें तिच्या नाकाशीं मिरचीचा धूर देण्याचा उपक्रम केला. सौम्य उपचारांतून आतां कठोर प्रयोग सुरू होणार असा रंग दिसू लागला. पण त्याला तसें करूं देण्यात आलें नाहीं. त्यानंतर त्या कुटुंबाशीं समरस झालेले 'मास्तर', मावशी व घरातील इतर वडीलधारी मंडळी या सर्वांनी हळूहळू सामोपचारानें, लाडीगोडीनें तारूला अनेक प्रश्न विचारीत राहणें चालूच ठेविलें. युक्तिप्रयुक्तीनें तिच्या किंकाळीचें मूळ कशात आहे तें शोधून काढण्याचा हा मानसोपचार होता. एके दिवशीं तारूच्या अंगातील समंध भुताखेताच्या भाषेतच बोलू लागलें. 'मी तुगवा जरीमळी आहें. '*झाडा'च्या नवऱ्याची मी मावशी आहें. पैशाच्या लोभाने मीच झाडाच्या* नवऱ्याला पालीचें विष घालून मारलें आहे. पतीच्या मरणानंतर झाड एकटेंच सोडूरला आलें. ती ओढ्याचें पाणी नेत असता माझी नजर त्या झाडावर गेली. तेव्हापासूनच मीं तो आधार घेतलेला आहे. मी आता हें झाड सोडणार नाहीं. झाडाच्या डोक्याला खाज सुटणें वगैरे प्रकार माझ्याच कृती आहेत."

झाडानें सांगितलेली ही हकीगत विलक्षण तर खरीच, पण तिनें घरातील सर्व जाणत्या माणसांचीं मनें विचलित केलीं यात संशय नाहीं. ती ऐकून कोणी चडफडले असेल तर कोणी डोळ्याला पदर लावला असेल. आणि स्वतः तारूला ती हकीगत कळली असेल तेव्हा तिच्या मनाचा बांध फुटून गेला असेल. ती खजळली असेल आणि रडलीहि असेल. तिचें मन खरोखरीच थोर. तिनें या कृत्याची मनात अढी धरली नाहीं. तिचा रोजचा कार्यक्रम पूर्ववत् चालू झाला. पण आपल्या भोंवतालचें दुःखद वातावरण बदलून टाकण्यासाठीं तिनेंहि तपाचरण स्वीकारलें. घरांतील मडळींचीं नांवें बदलून त्यांना ती टोपणनावांनीं बोलावू लागली. नियमितपणें धार्मिक ग्रंथाचें श्रवण-पठण आरंभलें. एकादशीचें व्रत अंगीकारलें. आणि मन शांत राहील अशी वृत्ति ठेवली. पण तारूच्या अंगांत येताच सारी उलथापालथ होऊन जाई. जीवनातील नियमितपणा सुटून जाई. जेवणेंहि वेळीं अवेळीं होत त्यामुळें सचार उतरतांच ती

थकून जाई. रात्र असो की दिवस असो तिची बडबड, किंकाळी आणि हसणें चालूच असे. तिला त्यामुळें त्रास होई आणि ते पाहाणारालाहि संकट होई. अधून मधून असा प्रकार होत असे. त्यावर त्या झाडाशीं तडजोड करण्याचाहि प्रयत्न झाला.

एकदा असेंच तिच्या अंगात आलें असता घरच्या मंडळींनीं त्या झाडाशीं बोलणें केलें. आणि भुताशीं तह केला. त्यात मुख्य अट अशी होती कीं, रात्रीं ९ ते सकाळीं ६ पर्यंत तुगव्वानें–भुतानें–झाडाला मुळींच त्रास देऊ नये. ती अट या समधानें अगदीं काटेकोरपणें पाळली होती. गमत अशी झाली कीं, एका पहाटे तारूनें मोठ्यानें किंकाळी फोडली. ती सर्वांनीं ऐकली. 'झाडा'ला विचारलें 'हें काय! अजून सहा वाजायचेच आहेत! काहीं चूक घडली का?' झाड पुन किंकाळलें. घरच्या लोकानीं पुन विचारलें, 'आपला शब्द, आपली अट मोडण्यासारखें काय घडलें?' झाडानें उत्तर दिलें, 'अट मोडली नाहीं आणि अट मोडण्यासारखेंहि काहीं झालेलें नाहीं. बाहेर सोप्यात जा नि घड्याळ पाहून या.' घरच्या लोकानीं त्वरीतच सोप्यात जाऊन घड्याळ पाहिलें तों काय आश्चर्य! सहाचे ठोके पडून त्या घड्याळाचा मिनिटकाटा किंचित् पुढे सरकलेला होता!

तारूचे पति व्यकंराव क्षयानें वारले असे सर्वत्र बोललें जाई. घरच्या आणि बाहेरच्या लोकाचीहि तशीच प्रामाणिक समजूत होती. परतु झाडानें सागितलेली गोष्ट ऐकून सर्वांनाच धक्का बसला. श्रीमत घराण्यातील तो एकुलता एक मुलगा नाहीसा झाल्यावर त्याची सारी धनदौलत तुगव्वाच्या मुलालाच मिळेल या वेड्या आशेनें प्रत्यक्ष मावशीनेंच आपल्या भाच्यावर विषप्रयोग केला, हें उघड झालें. पुढें स्वत हि लौकर ती मावशी मृत्युमुखीं पडली. पण तिची धनाची आशा सुटली नव्हती. तिच्या मुलाला सपत्ति मिळाली नव्हती. ती अतृप्त होती. ती तुगव्वा जरीमळ्यांतील आता मुनेच्या म्हणजे तारूच्या बोकांडीं भूत होऊन बसली. या दुष्ट भयानक कृत्यानें तिच्या वशाचा फायदा तर झाला नाहींच, पण तरुण पतिपत्नीला नाहींसे करून तें घराणें धुळीला मिळविण्याचें जादा पाप मात्र पदरीं घेतलें. भूतयोनी ही असल्या असतुष्ट आत्म्याची पापी पैदासच आहे का? भूतयोनींत पुनर्जन्माच मूळ शोधता येईल का? पुण्यचरिताना भूतयोनी ही धोक्याचें स्थान दाखविणारी एक पाटी म्हणून उपयोगी पडेल का? असे अनेक प्रश्न असल्या उदाहरणानें येतात. त्याचीं उत्तरें शोधून काढणें हें समाजधुरीणाचें, परमात्मचिंतकाचें काम आहे. मृतजीवाच्या आत्म्याशीं संवाद करू इच्छिणाराचें तें क्षेत्र आहे.



प्रकरण तिसरें

# याळगी भावंडें

याळगी भावंडें शिरहट्टीमध्यें असतांना तेथील समवयस्क मित्रमंडळीबरोबर वागता वागतां समरस होऊन गेलीं होतीं. या ठिकाणीं याळगी बंधूंच्या आईच्या मामांच्या घराण्याची थोडी माहिती देणें आवश्यक आहे; कारण त्या घराण्याचेहि संस्कार याळगी बंधूंवर चांगले झालेले आहेत.

आईच्या मामांच्या घराण्यातील कै. तम्माण्णा नाईक नरगुंदे हे कर्ते पुरुष व त्यांचे दोघे बंधु चिदंबर नाईक आणि धोंडू नाईक असे तिघेजण त्या काळीं हयात होते. तम्माण्णा नाइकांचें नांव धारवाडपासून दक्षिणेस बल्लारी कडाप्यापर्यंत व मोंगलाईपैकीं रायचूर व कोप्पळ जिल्ह्यांतील सर्वसाधारण मुलखवस्तु लोकांना माहीत होतें. शिरहट्टी तालुक्यात नाइकांच्या जमिनीमुळें किंवा दुसऱ्या कोणत्या तरी रीतीनें प्रत्येक खेड्याशीं त्यांचा संबंध आलेला होता. त्यांच्या मालकीचीं जनावरें-गाई म्हशी व बैल, घोडी, मेंढरें-निरनिराळ्या खेड्यामर पुष्कळ होतीं. तेथील अधिकारी, आप्त किंवा मित्रमंडळी, कोणीहि गरजू असो, नाइकाच्याकडे बैलगाडी, घोडा, गाय याची मागणी करण्याचा अवकाश कीं त्यांची नड दूर केली जात असे. नाइकांच्या तोंडून नकार कधींहि येत नसे. त्या त्या जनावराला लागणारा चारा, दाणा, गडीमाणूस जें लागेल तें, त्या गरजूच्या स्वाधीन होत असे. किती तरी लोक आपलीं भाकड जनावरें नाइकाच्याकडे पाठवून, दुभतीं जनावरें त्यांच्याकडून नेत असत. बहुतेक जकातपट्टे लिलावांत नाइकांनींच घ्यावे. त्यांचें नांव सांगून जकात न देतां अनेक लोक आपल्या गाड्या वगैरे जकातनाक्यावरून नेत असत. स्वतःचा वाडा व आजूबाजूलीं नातलगांचीं घरें असा हा विशाल कुटुंबाचा पसारा मिळून ७०।७५ मंडळींचा नाईक मेळावा होता. त्यांचें वय होत चाललें, व्याप मोठा, व्यवहारामध्यें फसवणारे लोक व नाइकांच्या चांगुलपणाचा फायदा घेणारे मतलबी लोक, त्यांतच दुष्काळ वगैरेची भर यामुळें अलीकडे त्यांना बराच त्रास होऊं लागला होता. त्याचे एक पुतणे श्री. श्रीनिवासराव हे त्या वेळीं

त्याना मदत करीत असत घरचे सर्व हिशोबठिशोब पाहून त्यानीं नाइकाना एकातात सागावें, 'आपण असा ढिला कारभार चालू ठेवल्यास एवढें मोठें कुटुंब सध्याच्या या पद्धतीनें चालविणें कठीण आहे. आपण जरा कडक वागणें जरूर आहे." तम्माण्णा नाइकाना या सर्व गोष्टी उघड दिसत होत्या, पटत होत्या, अनेक लोक आपल्या भले-पणाचा गैरफायदा घेतात हेंहि समजत होतें परंतु त्याची सर्व हयात मोठ्या खानदानी पद्धतींत आणि याचकाला कधींहि नकार न देता गेलेली असल्यामुळें त्यांना या सर्व गोष्टी कळत असूनसुद्धा, आपल्या वर्तनात बदल घडवून आणणें आणि हात आखडता घेणें जड वाटत होतें, जमत नव्हतें. त्याची मूर्ति पाहिल्याबरोबर पाहणाराच्या मनात आदर आणि एकप्रकारचा वचक अशी दुहेरी भावना उत्पन्न होत असे. भव्य पिप्पाड काया, कल्लेदार मिशा, चेहऱ्यावर एक प्रकारचें सात्त्विक तेज त्याची काति व रुबाब वाढवीत असे. ते जातील त्या ठिकाणीं 'तम्माण्णा नाईक आले! शिरहट्टीचे तम्माण्णा नाईक आले!' ही बातमी सर्वतोमुखीं होत असे. आणि एखाद्या थोर पुरुषास किंवा राजेरजवाड्यास पाहण्यासाठीं लोक जमतात तसे तम्माण्णा नाइकाना पाहण्यासाठीं लोकाची गर्दी होत असे. त्याचे आजोबा १८५७च्या बडाच्या वेळीं नरगुंदहून शिरहट्टीस आले व नतर तेथेंच स्थाईक झाले. त्याच्या म्हातारपणीं त्याना बराच त्रास सहन करावा लागला, अनेक अडचणींना व आपत्तींना तोंड द्यावें लागलें, यात शका नाहीं. स्वत चा एकुलता एक मुलगा वयाच्या चौदाव्या वर्षीच वारला, मुलगी विधवा होऊन घरीं आली. काल बदलत चालल्यामुळें एवढा मोठा व्याप सभाळणें कठीण, अतिशय जड होऊ लागलं. परतु अशाहि परिस्थितींत त्यानीं आपलें शील आपल्या हयातींत कायम ठेवलें होतें. कुटुबातील लहानमोठ्या मडळींचा व बायकाचाहि चिमटे घेत राहण्याचा उपद्व्याप कितीहि चाललेला असला तरी त्यानीं आपला शातपणा यत्किंचितहि ढळू दिला नाहीं. त्याचे समोर कोणाचीहि तोंडातून ब्र काढण्याची छाती नव्हती. अशा महान् पुरुषाची भगिनी म्हणजे गोविंदरावाची आजी गुडाबाई होय.

हीं सर्व भावडें शिरहट्टीस जाऊन तेथील वातावरणाशीं समरस होतात न होतात तोंच त्या गावीं प्लेग सुरू झाला. त्यामुळे त्या सर्वांना नाइकाबरोबर तेथून पाचसहा मैल अतरावर असलेल्या 'छब्बी' या खेडेगावीं रहाण्यास जावें लागलें. 'छब्बी' हें खेडें अगदींच लहान होतें. तेथें शाळा वगैरे नव्हतीच. जेवावें, प्यावें, आसपास बागेत फिरावें, डोंगरदऱ्यात आणि जगलात जगली जनावराच्या माग धावावें, हाच कार्यक्रम या याळगी भावडाचा सुरू असावयाचा. त्या वेळीं गोविंदराव यानीं आपलें समवयस्काचें 'स्नेही मण्डळ' स्थापन केलें होते. त्यात प्रमुख भागहि तेच घेत असत त्या 'स्नेही मडळा'मधील व्यकटराव हुल्गरी, हणमतराव देशपाडे (छब्बी), बाळाचार्य मण्णूर, वासुदेवशास्त्री, गणपतराव मच्छे, जीवनराव नरगुंदे वगैरे नावें प्रामुख्यानें सागता येण्यासारखीं आहेत.

याप्रमाणें छब्बी खेडयामध्यें ३ ४ महिने गेल्यानंतर नाइकाच्या घरची सर्व मंडळी आणि त्याच्याबरोबरच हीं याळगी भावडें शिरहट्टीस परत आलीं. शिरहट्टी सांगली संस्थानात असल्यामुळें त्या ठिकाणीं मराठी शाळा होतीच, परंतु सामान्य जनता कानडी बोलणारी असल्यामुळें कानडी शाळेमध्येंच मुलाचा भरणा अधिक असावयाचा हें क्रमप्राप्तच आहे. गोविंदरावाचें शिक्षण इंग्रजी चौथ्या इयत्तेपर्यंत त्या वेळीं झालेलें नसल्यामुळें, त्याच्या पुढील शिक्षणाची सोय शिरहट्टी गावीं होण्या सारखी नव्हती. अर्थात् फार दिवस तेथें राहणें शक्य नव्हतें. पुढील शिक्षणासाठीं बेळगावला परत येणें आवश्यक होतें. हीं सर्व भावडें जवळजवळ दीड वर्षपर्यंत तेथें होतीं. त्या अवधींत गोविंदरावाच लग्न व कृष्णरावाची मुंज हीं कार्यें होऊन गलीं. याळगी मंडळी बेळगावला परत आल्यानंतर त्याच्या आजोळीं वृद्ध आजी आणि मावशी, त्याची एकुलती एक मुलगी गंगू इतकीच मंडळी शिरहट्टीस राहिली. त्याचे मामा व आजोबा वारल्यानंतर आजीच्या मनात याळगी भावडापैकीं सर्वांत ल्हान मुलगा जीवनराव याला दत्तक घ्यावा असें आलें. कारण त्याच्या तीन मुलींपैकीं एका मुलीला म्हणजे गोविंदरावाच्या आईला तीन मुलगे हीच काय ती पुरुष संतति होती. त्यात जीवनराव सर्वांत लहान मुलगा असल्यामुळें त्याला शिरहट्टीस बोलावून घरीं ठेवून घ्यावयाचें व नंतर मुहूर्त वगैरे पाहून दत्तविधान उरकून टाकावयाचें, असें त्यानीं योजिलं होतें. त्याप्रमाणे त्याला बेळगावहून आजीनें शिरहट्टीस बोलावूनहि घेतलें. तो शिरहट्टीस येऊन राहिला व शाळेंतहि जाऊ लागला. पूर्वीप्रमाणें आपल्या समवयस्क मित्रमंडळीबरोबर खेळणें, भटकणें वगैरे त्याचे कार्यक्रमहि सुरू झाले. याप्रमाणें महिना दोन महिने उडून गेले. आजीनें बेळगावला पत्र लिहून दत्तविधानाविषयीं नक्की निर्णय करण्याबद्दल कळविलें.

**भगिनी तारूचे उपकार :** जीवनरावाच्या दत्तविधानाचा प्रश्न त्याच्या आईनें आपल्या सर्व मुलापुढे ठेवला. आजीचें मन मोडणेंहि तिला जड वाटत होतें. परंतु हा प्रश्न जेव्हा त्या भावडामध्यें चर्चेला निघाला त्या वेळीं भगिनी तारु हिनें या दत्तकाच्या कल्पनेला जोराचा विरोध केला नुसता विरोध करून ती स्वस्थ बसली नाहीं तर त्या मुलाला म्हणजे आपल्या लहान भावाला शिरहट्टीहून बेळगावला तावडतोब बोलावून आणण्याचा तिनें हट्टच धरला. सर्व भावडानीं एकत्र व आपल्या आईजवळच राहावें, अशी तिची उत्कट इच्छा असल्यामुळें जीवनरावाना शिरहट्टीहून बेळगावला परत जावें लागलें. 'माझ्या भगिनीचें माझ्यावर किती अलोट प्रेम होतें याचें हें द्योतक आहे, आणि माझ्यावर तिचें हें फार मोठें ऋण आहे,' असे उद्गार जीवनरावानीं अनेकदा काढलेले आहेत. आपल्या ल्हानपणीं जीवनरावाना या गोष्टीची जाणीव फिरा कल्पना नसली तरी जसजसें त्याचें वय वाढू लागलें, तसतशी तारूच्या या ऋणाची जाणीव त्याना अधिकाधिक होत गेली. जीवनराव शिरहट्टीहून बेळगावास

## दे. भ. गोविंद व्यंकटेश याळगी

परत आल्यानंतर, जणुं काय आपला एक हरवलेला बंधु आपल्याला लाभला अशा आनंद भगिनी तारूला झाला. हा दत्तकविधि खरोखरच झाला असता तर जीवनरावाच्या राहणी-करणींत आणि विचारसरणींत जो आमूलाग्र बदल झाला असता त्याची कल्पनाहि करतां येणार नाहीं. या बाबतींत तारूनें करून ठेवलेले उपकार याळगी भावंडें जन्मोजन्मीं विसरणार नाहींत. तारूच्या मरणापर्यंत जीवनरावाना तिचा सहवास लाभल्यामुळें त्याच्या मनावर झालेले सुसंस्कार आजहि त्याना जाणवतात.



प्रकरण चौथें

# याळगी भावंडांतील बंधुप्रेम

के. गोविंदरावाना तीन बंधु व एक भगिनी अशीं चार भावडें होतीं याचा उल्लेख यापूर्वी केलेलाच आहे. या भावंडांची एकमेकांविषयींची आत्मीयता मशहूर आहे त्यांचें सर्व कुटुंबच राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीचा एक आधार होऊन बसलेलें आहे. ही गोष्ट प्रत्यक्ष अनुभवलेले कार्यकर्ते सबंध कर्नाटकात व महाराष्ट्रात पसरलेले आहेत. सन १९०३ च्या सुरुवातीस त्यांची भगिनी ताई हिच्या अंगात येऊ लागल्याचे परिणाम तिला व याळगी घराण्याला कसे भोगावे लागले याची सर्व हकीगत यापूर्वीच येऊन गेलेली आहे. तिला बरोबर घेऊन त्यांची आई उपचारासाठीं नरसोबाच्या वाडीस रहावयास गेल्या होत्या. त्याना भेटण्यासाठीं म्हणून गोविंदरावाचे लहान बंधु कृष्णराव व जीवनराव वाडीस गेले होते. ते दिवस पावसाळ्याचे होते. ज्येष्ठ महिन्यात कृष्णेला पूर येऊन गढूळलेलें नवें पाणी हळूहळू ओसरू लागलें होत. कृष्णराव आणि जीवनराव आपलें भोजन आटोपून, कृष्णेच्या पुराचें पाणी पाहण्यासाठीं सहज गमतीनें नदीवर गेले होते. पुराचें पाणी चढून ओसरत किंवा उतरत असल्यामुळें मोकळ्या झालेल्या पायऱ्यावर राड साचलेली होती. त्यावरून लहान बंधु जीवन याचा पाय घसरून तो कृष्णा नदीच्या प्रवाहात पडला व बुडून वाहात जाऊ लागला. आपला बंधु वाहात जात असलेला पाहून त्याच्या वडील बंधूनें म्हणजे कृष्णरावानें कांहींहि विचार न करता केवळ भावाला वाचवण्यासाठीं प्रवाहात अंग झोकून दिलें. अंगावरचे कपडे—कोट टोपी वगैरे—काढण्याचें भानहि न राहून त्यानें कृष्णेच्या प्रवाहात उडी घेतली. त्यांतील विशेष गोष्ट ही कीं, या दोघांनाहि पोहता येत नव्हतें. अर्थात् ते प्रवाहात बुडून प्रवाहाबरोबर जोरात वाहात चालले. पूर आला असताना वाडीमध्यें दत्तमंदिराच्या समोर कृष्णेच्या प्रवाहाला विशेष ओढ असते. हीं दोन्ही मुले प्रवाहात धारेला लागलेलीं पाहून, तेथेंच माडीं पाहत बसलेल्या घायकानीं

आरडाओरडा केला. बायकाची ती ओरड ऐकून दत्तमंदिरातील पुजारी धावतच बाहेर आले.

वाडींतील दत्तमंदिराच्या खालच्याच बाजूला अगदीं जवळच कृष्णेच्या पाण्याला मोठा भोवरा आहे. या भोवऱ्यातून पोहून पार होणारे पट्टीचे पोहणारे लोकहि वाडीमध्ये, विशेषत वाडीच्या दत्तमंदिराच्या भटजींमध्यें काहीं थोडेथोडके लोक नाहींत. नदीकाठचे लोक या कलेंत आपोआपच तयार होतात. कृष्णेला महापूर आल्यानतर ही कृष्णा तरून पलीकडे जाऊन येणारे लोक वाडीमध्यें होऊन गेलेले आहेत. मिरजेला कृष्णेमध्यें पोहण्यास उडी घेऊन कुरुदवाडपर्यंत पोहत येणारे लोक परवा परवापर्यंत होते असे सागतात. पण त्यातहि वेळप्रसगीं अपघातहि होतात, नाहीं असे नाहीं. अशा महापुरामध्यें पट्टीचे पोहणारे बुडून मरण्याचा संभव असतो. महापुरात पोहण्याचें धाडस करणार नाहीं तो बुडेलच कोठें आणि कशासाठीं? परीक्षेलाच न बसणारा विद्यार्थी कधींतरी नापास होईल काय?

पुजारी देवळातून बाहेर येताच त्याना पाण्यावर तरगणाऱ्या त्या दोन मुलांच्या टोप्या प्रवाहाबरोबरच जात असलेल्या दिसल्या. त्यांच्या अनुरोधानें भटजींनीं पुरात उडी घेतली व पोहत निघाले. चारदोन मिनिटाच्या आतच त्यानीं त्या दोन्ही मुलाना पाण्यातून बाहेर घाटावर आणलें. तीं मुलें आणखी ८–१० हात तशींच वाहात गेलीं असतीं तर भोवऱ्यात सापडलीं असतीं व त्याना जलसमाधि मिळालीच असती. कारण भोवऱ्यात सापडलेला खरा पट्टीचा पोहणाराहि त्यातून बाहेर पडून जिवत राहणें अत्यत दुरापास्त असतें. भोवऱ्याच्या पाण्यामध्ये पाय मारताना ते पायच एकमेकात अडकतात व पोहणेंच अशक्य होऊन बसतें. नदीचे पाणी अगदीं कमी असताना त्या भोवऱ्यामध्यें मुद्दाम जाऊन भोवऱ्याचा थोडासा अनुभव घेण्याची गमत प्रस्तुत लेखकानें अनुभवून पाहिलेली आहे. भोवरा अगदीं लहान असताना त्यात चागल्या पोहणाराला त्याची भीति नसेल तर भोवऱ्याची करामत व प्रभाव अनुभवावयास मिळतो. ती मौज किंवा आनद प्रत्यक्ष अनुभवानेंच कळण्यासारखा असतो. नुसतें वर्णन वाचून मजा येणार नाहीं. असो. त्या दोन्ही मुलाना अजीबात पोहता येत नव्हतें म्हणूनच त्याना वाचविणें पुजारी लोकाना सोपें गेलें. अजीबात पोहावयास न येणारापेक्षा अर्धवट पोहावयाला येणाऱ्या बुडत्या मनुष्याला वाचविणें अधिक कठीण असतें. कारण त्याला आपल्याला वाचवावयास आलेल्या मनुष्याच्या गळ्याला मिठी मारून, दुसऱ्याला आपल्याबरोबर घेऊन कायमची समाधि घेण्याची कला चागली साधत असते—साधलेली असते.

आपल्याला पोहावयास येत असो किंवा नसो आपल्या बुडत्या बधूला वाचविण्याची आपल्याकडून होईल तेवढी खटपट आपण केली पाहिजे या मोठ्या बंधुप्रेमानेंच कृष्णरावानीं कृष्णेमध्यें उडी घेतली होती. याळगीच्या घरच्या सर्वच

बंधुभगिनींमधील हें उत्कट प्रेम आजहि दिसून आल्याशिवाय राहात नाहीं. त्या कृष्णेच्या पुरामध्येंच त्या दोन मुलांची कायमची जलसमाधि झाली असती तर त्यांच्या हातून व त्यांच्या घराण्याकडून आज कित्येक वर्षे राजकीय व सामाजिक क्षेत्रांत व स्वातंत्र्याच्या लढ्यामध्यें जी राष्ट्रसेवा झाली आहे व आजहि होत आहे त्याला आपला देश आंचवला असता.



प्रकरण पाचवें

# वडील निवर्तल्यानंतर

गोविंदरावाचा स्वभाव धाडसी असून आपल्या वर्तनानें इतरांचे मन आपल्याकडे आकर्षून घेणें हा त्याचा उपजत स्वभावच बनलेला होता. त्याच्या आयुष्यात भीतीनें त्याना कधीं स्पर्शहि केला नाहीं. त्याचे वडील व्यंकटराव सन १८९९ मध्यें निवर्तले. त्या वेळीं गोविंदरावाचें वय अवघें १५ वर्षांचे होत व शिक्षण इंग्रजी सहावी इयत्ता एवढें झालेलें होतें.

व्यंकटरावाच्या अकालीं निधनामुळें त्याच्या कुटुंबावर केवढी मोठी आपत्ति येऊन पडली आहे किंवा कसा डोंगर कोसळला आहे याची कल्पना त्याच्या मातोश्रींनाच फक्त होती घरचीं सर्व मुलें अल्पवयस्क असल्यामुळें त्याना या संकटाची जाणीव येण्याची शक्यताहि नव्हती. घरीं आलेली बालविधवा मुलगी आणि ल्हान मुलं याचे चालायचें कसें? आता यापुढे आपलें कस निभावणार हा मोठाच प्रश्न होता. ही समस्या सोडवणें सोपें नव्हतें. खेड्यात हे कुटुंबीय होते तोंपर्यंत या प्रश्नाची तीव्रता त्याना फारशी जाणवली नाहीं. खावें व बागाजंगलात फिरावें, हाच मुलाचा कार्यक्रम असे. बरता बघता दोन वर्षांचा अवधि केव्हा निघून गेला, हें मुलाच्या घ्यानातहि आलें नाहीं. याच सुमारास त्याचे एकटेच असलेले मामाहि वारले. त्या दु:खामुळें वृद्ध आजोबानींहि अंथरुण धरलें व त्यातच त्याचाहि शेवट झाला. या प्रसंगीं या मुलाच्या आईचे मामा श्री तम्माण्णा नाईक याचा आधार व सल्ला त्याना अत्यंत उपयोगी पडला. त्या काळच्या पद्धतीप्रमाणें नाइकानीं गोविंदरावाचें लग्न करावयाचें ठरवलें व बल्लारीचे निंगराव कडप्पा याची कन्या गोदूताई इच्याशीं स. १९०१ मध्यें त्याचें लग्न करूनहि ते मोकळे झाले.

यानंतर याळगी कुटुंबीय मंडळी म्हणजे सर्व मुलेंबाळें व त्याची आई बेळगावीं रहावयास आली. मुलाचा शाळेचा अभ्यास सुरू झाला. गोविंदराव त्या वेळीं बेळगांवच्या 'सरदार्स हायस्कूल'मध्यें शिकू लागले. त्या वेळच्या शाळेतील स्नेह्यामध्यें

होत्या. सध्याकाळीं गोकाकहून निघून रात्रीं सुमारें दहा वाजण्याचे वेळीं त्याच्या बैलगाड्या स्टेशनवर येऊन पोहोंचल्या. त्याच्या कुटुंबाची वसति धर्मशाळेमध्यें होती. तेवढ्यात रात्रीं एकोनच्या सुमारास काहीं दरवडेखोरानीं त्याना गाठलें. गोकाकला परत येण्याची काहींच शक्यता नसल्यामुळें जी काहीं चीजवस्त, मालमत्ता त्याच्याकडे होती ती सर्व त्यानीं बरोबरच घेतलेली होती. बरोबर जाणते कोणी नव्हते. ल्हान ल्हान मावडें, बायकामडळी अशा प्रसगीं अधिक अडचणीची पण जोखमीची असतात याळगी कुटुबात या वेळीं त्याचाच भरणा जास्त ही सर्व वित्तबातमी दरवडेखोरास कोणींतरी हितशत्रूनीं कळविली असावी असेंच त्या वेळीं सर्वांना वाटलें. पुढें असें कळून आलें कीं, ही बातमी गोविंदरावाच्या वडिलाच्या एका मित्रानेंच म्हणजे अण्णाराव महाजन यानेंच दरवडेखोरास देऊन त्या कुटुबावर हल्ला करण्यास पाठविलें होतें, डाका घालून लुटालूट करण्याचा घाट घातला होता. पण सुदैव असे कीं, गोविंदराव याचे स्नेही नारायणराव यानीं त्याच्या संरक्षणार्थ ते गोकाकबाहेर पडेपर्यंत तरी काहीं बेरड दिले होते. ते या दरवडेखोराच्या ओळखीचे निघाले. त्यामुळें त्याचा बेत फसला व सर्वच व्यूह ढासळून गेला. नाहींतर त्या प्रसगीं त्याच्यावर मोठीच आपत्ति ओढवली असती. जवळची असेल नसेल ती मिळकत गमावून बसण्याची वेळ आली असती. असो. ती सर्व मडळी गोकाक रोड स्टेशनवरून पहाटे मेलनें निघाली व सध्याकाळीं येल्वगी स्टेशनवर उतरली. चिरहट्टीहून आईच्या मामानीं तेथें गाडी पाठवलीच होती. फराळ वगैरे आटोपून त्या मडळींनीं रात्रीं चादण्यामध्येंच पुन प्रवासाला सुरवात केली आणि दुसरे दिवशीं पहाटे ते सर्वजण गोविंदराव याच्या आजोळीं सुखरूपपणें जाऊन पोहोंचले.



प्रकरण सहावें

# राजकारणांत प्रवेश

याळगी बंधु—गोविंदराव, कृष्णराव व जीवनराव—इतक्या लहान वयांत राजकारणांत कसे ओढले गेले याचें थोडें नवल वाटतें. हे तीनहि बंधु विशीच्या आंतलेच. मानसशास्त्र आणि देशांतील त्या काळचें वातावरण या दृष्टीनें विचार करतां यांनीं राजकारणांत पडावें हा केवळ ईश्वरी योगायोग होता असेंच म्हणावें लागेल. मनुष्य मोठा झाला, आयुष्यातील अनेक घटनामुळें अगर स्वाभाविक गुणप्रभावामुळें तो देशांतील कर्ता पुरुष ठरला म्हणजे त्याच्या बालपणच्या वागणुकीला व विचारांना लोक तात्त्विक बैठक देऊं लागतात. प्रथमारंभी त्यांचें निदान असें कीं, मुलाचे पाय पाळण्यांतच दिसून येतात! पण गोविंदरावांचें जीवन मी एका शास्त्रीय दृष्टिकोनातून पाहात आहें. जीवनाची गाडी सुदैवानें योग्य रस्त्याला लागली म्हणजे पुढील सर्व गोष्टी यथाक्रम होत जातात, असा माझा तरी अनुभव आहे. आकस्मिक घटना अगर अपघात हे अपवादच होत.

गोविंदरावांना प्रथम घरीं आणि पुढें पुढें समाजांतहि 'दादा' या नांवानें संबोधलें जाई. दादा अवघे एकोणीस वर्षांचे होते. गृहस्थिति व अनेक समस्या यामुळें त्यांचे शालेय शिक्षण संपुष्टात आलें होतें. त्यांना आपलें शिक्षण पूर्ण करतां आलें असतें तर त्यांच्या जीवनाला निराळेंच वळण लागलें असतें व गु. गंगाधररावांच्या जीवनाचा इतिहासहि वेगळा झाला असता, आणि बेळगांव जिल्ह्यांतील सामाजिक, शैक्षणिक व राजकीय इतिहासानें वेगळा आकार घेतला असता, असें मला वाटतें. गु. गंगाधरराव यांच्याशीं गोविंदरावांचा संपर्क आला नसता, एकमेकांचा सहवास घडला नसता तर गोविंदरावांचें मित्रमंडळ अगदींच वेगळें बनलें असतें, आणि गंगाधररावां-मधील अत्यंत उत्कट व लोकोत्तर गुण म्हणजे वक्तृत्व व राजकीय दूरदृष्टि यांना पुरेसें क्षेत्र सांपडलें असतें किंवा नाहीं याची शंका आहे. राष्ट्रसेवा करतांना व प्रत्यक्ष अनेक चळवळींमध्यें ते दोघे एक दुसऱ्याना पूरक होते. गोविंदरावांचें संघटनाचातुर्य, साहस व लोकसंग्रह आणि गंगाधररावांचें सूक्ष्म निरीक्षण, राजकीय दूरदृष्टि, बुद्धिमत्ता

होत्या. संध्याकाळीं गोकाकहून निघून रात्रीं सुमारें दहा वाजण्याचे वेळीं त्याच्या बैलगाड्या स्टेशनवर येऊन पोहोंचल्या. त्याच्या कुटुंबाची वसति धर्मशाळेमध्यें होती. तेवढ्यात रात्रीं एकटोनच्या सुमारास कांहीं दरवडेखोरांनीं त्यांना गांठलें. गोकाकला परत येण्याची कांहींच शक्यता नसल्यामुळें जी कांहीं चीजवस्त, मालमत्ता त्याच्याकडे होती ती सर्व त्यांनीं बरोबरच घेतलेली होती. बरोबर जाणते कोणी नव्हते. लहान लहान भावंडें, बायकामंडळी अशा प्रसंगीं अधिक अडचणीची पण जोखमीची असतात. याळगी कुटुंबात या वेळीं त्याचाच भरणा जास्त. ही सर्व वित्तंबातमी दरवडेखोरास कोणींतरी हितशत्रूनें कळविली असावी असेंच त्या वेळीं सर्वांना वाटलें. पुढें असें कळून आलें कीं, ही बातमी गोविंदरावांच्या वडिलांच्या एका मित्रानेंच म्हणजे अण्णाराव महाजन यानेंच दरवडेखोरांस देऊन त्या कुटुंबावर हल्ला करण्यास पाठविलें होतें, डाका घालून लुटालूट करण्याचा घाट घातला होता. पण सुदैव असें कीं, गोविंदराव याचे स्नेही नारायणराव यानीं त्यांच्या संरक्षणार्थ ते गोकाकबाहेर पडेपर्यंत सरी कांहीं बेरड दिले होते. ते या दरवडेखोरांच्या ओळखीचे निघाले. त्यामुळें त्याचा बेत फसला व सर्वच व्यूह ढासळून गेला. नाहींतर त्या प्रसगीं त्याच्यावर मोठीच आपत्ति ओढवली असती. जवळची असेल नसेल ती मिळकत गमावून बसण्याची वेळ आली असती. असो. ती सर्व मंडळी गोकाक रोड स्टेशनवरून पहाटे मेलनें निघाली व संध्याकाळीं येळवगी स्टेशनवर उतरली. शिरहट्टीहून आईच्या मामांनीं तेथें गाडी पाठवलीच होती. फराळ वगैरे आटोपून त्या मंडळींनीं रात्रीं चादण्यामध्येंच पुनः प्रवासाला सुरवात केली आणि दुसरे दिवशीं पहाटे ते सर्वजण गोविंदराव याच्या आजोळीं सुखरूपपणें जाऊन पोहोंचले.



प्रकरण सहावें

# राजकारणांत प्रवेश

शाळगी बंधु—गोविंदराव, कृष्णराव व जीवनराव—इतक्या लहान वयांत राजकारणांत कसे ओढले गेले याचें कोडें पडतें. हे तीनहि बंधु विशाच्या आंतलेच. मानसशास्त्र आणि देशांतील त्या काळचें वातावरण या दृष्टीनें विचार करतां यांनीं राजकारणांत पडावें हा केवळ ईश्वरी योगायोग होता असेंच म्हणावें लागेल. मनुष्य मोठा झाला, आयुष्यांतील अनेक घटनांमुळें अगर स्वाभाविक गुणप्रभावामुळें तो देशांतील कर्ता पुरुष ठरला म्हणजे त्याच्या बालपणच्या वागणुकीला व विचारांना लोक तात्त्विक बैठक देऊं लागतात. प्रथमारंभीं त्यांचें निदान असें कीं, मुलाचे पाय पाळण्यांतच दिसून येतात! पण गोविंदरावांचें जीवन मी एका शास्त्रीय दृष्टिकोनांतून पाहात आहें. जीवनाची गाडी सुदैवानें योग्य रस्त्याला लागली म्हणजे पुढील सर्व गोष्टी यथाक्रम होत जातात, असा माझा तरी अनुभव आहे. आकस्मिक घटना अगर अपघात हे अपवादच होत.

गोविंदरावाना प्रथम घरीं आणि पुढें पुढें समाजांतहि 'दादा' या नांवानें संबोधलें जाई. दादा अवघे एकोणीस वर्षांचे होते. गृहस्थिति व अनेक समस्या यामुळें त्यांचें शालेय शिक्षण संपुष्टांत आलें होतें. त्यांना आपलें शिक्षण पूर्ण करतां आलें असतें तर त्यांच्या जीवनाला निराळेंच वळण लागलें असतें व गु. गंगाधररावांच्या जीवनाचा इतिहासहि वेगळा झाला असता, आणि बेळगांव जिल्ह्यांतील सामाजिक, शैक्षणिक व राजकीय इतिहासानें वेगळा आकार घेतला असता, असें मला वाटतें. गु. गंगाधरराव यांच्याशीं गोविंदरावांचा संपर्क आला नसता, एकमेकांचा सहवास घडला नसता तर गोविंदरावांचें मित्रमंडळ अगदींच वेगळें बनलें असतें, आणि गंगाधररावां-मधील अत्यंत उत्कट व लोकोत्तर गुण म्हणजे वक्तृत्व व राजकीय दूरदृष्टि यांना पुरेसें क्षेत्र सांपडलें असतें किंवा नाहीं याची शंका आहे. राष्ट्रसेवा करतांना व प्रत्यक्ष अनेक चळवळींमध्यें ते दोघे एक दुसऱ्याना पूरकच होते. गोविंदरावांचें संघटनाचातुर्य, साहस व लोकसंग्रह आणि गंगाधररावांचें सूक्ष्म निरीक्षण, राजकीय दूरदृष्टि, बुद्धिमत्ता

होत्या. सध्याकाळीं गोकाकहून निघून रात्रीं सुमारें दहा वाजण्याचे वेळीं त्याच्या बैलगाड्या स्टेशनवर येऊन पोहोंचल्या. त्याच्या कुटुंबाची वसति धर्मशाळेमध्यें होती. तेवढ्यात रात्रीं एकदोनच्या सुमारास काहीं दरवडेखोरानीं त्याना गाठलें. गोकाकला परत येण्याची काहींच शक्यता नसल्यामुळें जी काहीं चीजवस्त, मालमत्ता त्याच्याकडे होती ती सर्व त्यानीं बरोबरच घेतलेली होती. बरोबर जाणते कोणी नव्हते. ल्हान ल्हान भावंडें, बायकामंडळी अशा प्रसगीं अधिक अडचणीची पण जोखमीची असतात. याळगी कुटुंबात या वेळीं त्याचाच भरणा जास्त. ही सर्व बित्तबातमी दरवडेखोरास कोणींतरी हितशत्रूनीं कळविली असावी असेच त्या वेळीं सर्वांना वाटलें. पुढें असें कळून आलें कीं, ही बातमी गोविंदरावाच्या वडिलाच्या एका मित्रानेंच म्हणजे अण्णाराव महाजन यानेंच दरवडेखोरास देऊन त्या कुटुंबावर हल्ला करण्यास पाठविलें होतें, डाका घालून लुगालूट करण्याचा घाट घातला होता. पण सुदैव असें कीं, गोविंदराव याचे स्नेही नारायणराव यानीं त्याच्या संरक्षणार्थ ते गोकाकबाहेर पडेपर्यंत तरी काहीं वेरड दिले होते. ते या दरवडेखोराच्या ओळखीचे निघाले. त्यामुळें त्याचा बेत फसला व सर्वच व्यूह दासळून गेला. नाहींतर त्या प्रसगीं त्याच्यावर मोठीच आपत्ति ओढवली असती. जवळची असेल नसेल ती मिळकत गमावून बसण्याची वेळ आली असती. असो. ती सर्व मडळी गोकाक रोड स्टेशनवरून पहाटे मेलनें निघाली व सध्याकाळीं येल्वगी स्टेशनवर उतरली. शिरहट्टीहून आईच्या मामानीं तेथें गाडी पाठवलीच होती. फराळ वगैरे आटोपून त्या मडळींनीं रात्रीं चादण्यामध्येंच पुन- प्रवासाला सुरवात केली आणि दुसरे दिवशीं पहाटे ते सर्वजण गोविंदराव याच्या आजोळीं सुखरूपपणें जाऊन पोहोंचले.



प्रकरण सहावें

# राजकारणांत प्रवेश

याळगी बंधु—गोविंदराव, कृष्णराव व जीवनराव—इतक्या लहान वयात राजकारणात कसे ओढले गले याचें कोडें पडतें. हे तीनहि बंधु विसाव्या आतलेच. मानसशास्त्र आणि देशातील त्या काळचें वातावरण या दृष्टीनें विचार करता यानीं राजकारणात पडावें हा केवळ ईश्वरी योगायोग होता असेंच म्हणावें लागेल. मनुष्य मोठा झाला, आयुष्यातील अनेक घटनामुळें अगर स्वाभाविक गुणप्रभावामुळें तो देशातील कर्ता पुरुष ठरला म्हणजे त्याच्या बालपणच्या वागणुकीला व विचाराना लोक तात्त्विक बैठक देऊ लागतात. प्रथमारंभी त्याचें निदान असें कीं, मुलाचे पाय पाळण्यातच दिसून येतात! पण गोविंदरावाचें जीवन मी एका शास्त्रीय दृष्टिकोनातून पाहात आहें. जीवनाची गाडी सुदैवानें योग्य रस्त्याला लागली म्हणजे पुढील सर्व गोष्टी यथाक्रम होत जातात, असा माझा तरी अनुभव आहे. आकस्मिक घटना अगर अपघात हे अपवादच होत.

गोविंदरावाना प्रथम घरीं आणि पुढें पुढें समाजातहि 'दादा' या नावानें संबोधलें जाई. दादा अवघे एकोणीस वर्षांचे होते. गृहस्थिति व अनेक समस्या यामुळें त्यांचें शालेय शिक्षण संपुष्टात आलें होतें. त्याना आपलें शिक्षण पूर्ण करता आलें असतें तर त्याच्या जीवनाला निराळेंच वळण लागलें असतें व गु गगाधररावाच्या जीवनाचा इतिहासहि वेगळा झाला असता, आणि बेळगाव जिल्ह्यातील सामाजिक, शैक्षणिक व राजकीय इतिहासानें वेगळा आकार घेतला असता, असें मला वाटतें. गु. गगाधरराव याच्याशीं गोविंदरावाचा संपर्क आला नसता, एकमेकाचा सहवास घडला नसता तर गोविंदरावाचें मित्रमंडळ अगदींच वेगळे बनलें असतें, आणि गगाधररावा-मधील अत्यत उत्कट व लोकोत्तर गुण म्हणजे वक्तृत्व व राजकीय दूरदृष्टि याना पुरेसें क्षेत्र सापडलें असतें किंवा नाहीं याची शंका आहे. राष्ट्रसेवा करताना व प्रत्यक्ष अनेक चळवळींमध्यें ते दोघे एक दुसऱ्याना पूरकच होते. गोविंदरावाचें संघटनाचातुर्य, साहस व लोकसंग्रह आणि गगाधररावाचें सूक्ष्म निरीक्षण, राजकीय दूरदृष्टि, बुद्धिमत्ता

होत्या. संध्याकाळीं गोकाकहून निघून रात्रीं सुमारें दहा वाजण्याचे वेळीं त्याच्या बैलगाड्या स्टेशनवर येऊन पोहोंचल्या. त्याच्या कुटुंबाची वसति धर्मशाळेमध्यें होती. तेवढ्यात रात्रीं एकटेनच्या सुमारास कांहीं दरवडेखोरांनीं त्याना गाठलें. गोकाकला परत येण्याची कांहींच शक्यता नसल्यामुळें जी कांहीं चीजवस्त, मालमत्ता त्याच्याकडे होती ती सर्व त्यांनीं बरोबरच घेतलेली होती. बरोबर जाणते कोणी नव्हते. लहान लहान भावंडें, बायकामंडळी अशा प्रसंगीं अधिक अडचणीची पण जोखमीची असतात याळगी कुटुंबात या वेळीं त्यांचाच भरणा जास्त. ही सर्व वित्तंबातमी दरवडेखोरास कोणीतरी हितशत्रूनीं कळविली असावी असेंच त्या वेळीं सर्वांना वाटलें. पुढें असें कळून आलें कीं, ही बातमी गोविंदरावाच्या वडिलांच्या एका मित्रानेंच म्हणजे अण्णाराव महाजन यानेंच दरवडेखोरास देऊन त्या कुटुंबावर हल्ला करण्यास पाठविलें होतें, डाका घालून लुटालूट करण्याचा घाट घातला होता. पण सुदैव असें कीं, गोविंदराव याचे स्नेही नारायणराव यानीं त्यांच्या संरक्षणार्थ ते गोकाकबाहेर पडेपर्यंत तरी कांहीं बेरड दिले होते. ते या दरवडेखोराच्या ओळखींचे निघाले. त्यामुळें त्याचा बेत फसला व सर्वच व्यूह ढासळून गेला. नाहींतर त्या प्रसंगीं त्यांच्यावर मोठीच आपत्ति ओढवली असती. जवळची असेल नसेल ती मिळकत गमावून बसण्याची वेळ आली असती. असो. ती सर्व मंडळी गोकाक रोड स्टेशनवरून पहाटे मेलनें निघाली व संध्याकाळीं बेळगांवी स्टेशनवर उतरली. शिरहट्टीहून आईच्या मामानीं तेथें गाडी पाठवलीच होती. फराळ वगैरे आटोपून त्या मंडळींनीं रात्रीं चांदण्यामध्येंच पुनः प्रवासाला सुरवात केली आणि दुसरे दिवशीं पहाटे ते सर्वजण गोविंदराव यांच्या आजोळीं सुखरूपपणें जाऊन पोहोंचले.



प्रकरण सहावें

# राजकारणांत प्रवेश

याळगी बंधु—गोविंदराव, कृष्णराव व जीवनराव—इतक्या लहान वयांत राजकारणांत कसे ओढले गेले याचें कोडें पडतें. हे तीनहि बंधु विशाच्या आंतलेच. मानसशास्त्र आणि देशातील त्या काळचें वातावरण या दृष्टीनें विचार करतां यांनी राजकारणांत पडावें हा केवळ ईश्वरी योगायोग होता असेच म्हणावें लागेल. मनुष्य मोठा झाला, आयुष्यांतील अनेक घटनांमुळें अगर स्वाभाविक गुणप्रभावामुळें तो देशांतील कर्ता पुरुष ठरला म्हणजे त्याच्या बालपणच्या वागणुकीला व विचारांना लोक तात्त्विक बैठक देऊं लागतात. प्रथमारंभीं त्यांचें निदान असें कीं, मुलाचे पाय पाळण्यांतच दिसून येतात! पण गोविंदरावाचें जीवन मी एका शास्त्रीय दृष्टिकोनांतून पाहात आहें. जीवनाची गाडी सुदैवानें योग्य रस्त्याला लागली म्हणजे पुढील सर्व गोष्टी यथाक्रम होत जातात, असा माझा तरी अनुभव आहे. आकस्मिक घटना अगर अपघात हे अपवादच होत.

गोविंदरावांना प्रथम घरीं आणि पुढें पुढें समाजांतहि 'दादा' या नांवानें संबोधलें जाई. दादा अवघे एकोणीस वर्षांचे होते. गृहस्थिति व अनेक समस्या यामुळें त्यांचें शालेय शिक्षण संपुष्टात आलें होतें. त्यांना आपलें शिक्षण पूर्ण करतां आलें असतें तर त्यांच्या जीवनाला निराळेंच वळण लागलें असतें व गु. गंगाधररावांच्या जीवनाचा इतिहासहि वेगळा झाला असता, आणि बेळगांव जिल्ह्यातील सामाजिक, शैक्षणिक व राजकीय इतिहासानें वेगळा आकार घेतला असता, असें मला वाटतें. गु. गंगाधरराव यांच्याशीं गोविंदरावांचा संपर्क आला नसता, एकमेकांचा सहवास घडला नसता तर गोविंदरावांचें मित्रमंडळ अगदींच वेगळें बनलें असतें, आणि गंगाधररावां-मधील अत्यंत उत्कट व लोकोत्तर गुण म्हणजे वक्तृत्व व राजकीय दूरदृष्टि यांना पुरेसें क्षेत्र सांपडलें असतें किंवा नाहीं याची शंका आहे. राष्ट्रसेवा करताना व प्रत्यक्ष अनेक चळवळींमध्यें ते दोघे एक दुसऱ्यांना पूरक होते. गोविंदरावाचें संघटनाचातुर्य, साहस व लोकसंग्रह आणि गंगाधररावाचें सूक्ष्म निरीक्षण, राजकीय दूरदृष्टि, बुद्धिमत्ता

या गुणामुळें ते दोघे परस्परास पोषकच झाले. या दोघांनीं मिळून बेळगाव शहर, बेळगाव जिल्हा किंबहुना सारा कर्नाटक प्रांत जागृत केला, सर्व तऱ्हेच्या राजकीय आंदोलनामध्यें मार्गदर्शन केलें आणि कर्नाटक प्रांत (म्हणजे बेळगाव, धारवाड, कारवार व विजापूर हे जिल्हे) राजकीय चळवळीच्या दृष्टीनें कधींहि इतर प्रांताच्या मागें पडू दिलेला नाहीं. इतकेंच नव्हे, तर राजकीय चळवळींत कर्नाटकाला प्रतिष्ठा मिळवून दिली. देशाच्या स्वातंत्र्यलढ्यामध्यें लो. टिळकांना काय किंवा महात्माजींना काय कर्नाटकप्रांताविषयीं व विशेषतः बेळगाव जिल्ह्याविषयीं जो एक प्रकारचा विश्वास वाटत होता तो या दोघा कर्तृत्ववान पुढाऱ्यामुळेंच होय.

गोविंदरावांच्या वडिलांच्या मृत्यूनंतर त्यांच्या कुटुंबानें चार वर्षें कशींतरी काढलीं. त्यांचे इतर दोघे बंधु लहानच होते. गोविंदरावांना 'दादा' पद लाभलें असलें तरी तेहि वयानें लहान होते. घरची-वडीलकी त्यांच्यावर येऊन पडल्यानें ती त्यांना झिडकारता येण्यासारखी नव्हती. कुटुंबाच्या पोषणाची जबाबदारी त्यांना बाजूला सारता येण्यासारखी नव्हती. त्यासाठीं त्यांना कांहींतरी उद्योग करणें प्राप्तच होतें. खेळण्याचें वय असून खेळता येण्यासारखें नव्हतें. शिक्षण घेण्याची उमेद असून तें पुरे करता येत न व्हतें. कोणत्याहि विषयाचें ज्ञान मिळवण्याची बुद्धि आणि हौस असूनहि गोविंदरावांना तें मिळवणें कठीण झालें होतें. लहानपणींच आईच्या मामांनीं त्यांना विवाह करून टाकल्यामुळें गळ्यात घोरपड किंवा लोढणें अडकविल्या प्रमाणें झालें-होतें. आणि तेंहि आता काढून टाकता येण्यासारखें नव्हतें. नोकरी धरणें अगर बिल्कुल मामुली धंद्यात शिरणें जन्मतःच गोविंदरावांच्या वृत्तींत नव्हतें. त्यांचे मन, बुद्धि नि अंतःकरण यावर झालेले पूर्वसंस्कार फारच उच्च कोटीचे होते असें आज म्हणता येण्यासारखें आहे. याळगी घराण्याचे एक स्नेही म्हणजे शहापूरचे मल्हार नाईक नेरूर यांना सराफी धंद्याची चांगली माहिती होती, सराफी व्यवहाराचा अनुभवहि होता. त्या काळीं शहापूर ही सराफी धंद्याची मोठी नामवंत पेठ होती. त्यांच्या सल्ल्यानें गोविंदरावांनीं बेळगावात सराफी दुकान काढावयाचें ठरविलें. त्या दिवसात सबंध बेळगाव शहरात श्री. पिराळे यांचें एकच सराफी दुकान होतें. मल्हार नाइकांचे धाकटे बंधु वासुदेवराव हे गोविंदरावांना या धंद्याची माहिती देण्यासाठीं त्या दुकानात बसू लागले. त्याचप्रमाणें मदतनीस म्हणून मुतक्याचे रंगोपंत कुळकर्णी यांना दुकानात घेतलें होतें. याळगींचें हें सराफी दुकान प्रथम अगदीं लहान प्रमाणात सुरू झालें. ज्या मोठमोठ्या नद्यांमध्यें पुढें जहाजेंहि चालू शकतात त्या नद्यांचे मूळ अथवा उगम एखाद्या लहान झऱ्याएवढाच असतो. दुकान अगदीं लहान असलें तरी त्यात चालणारें काम व्यवस्थित होत असे. वर्ष सहा महिन्यातच गोविंदरावांनीं या धंद्यातील बरीच माहिती व ज्ञान करून घेतलें होतें. त्यांची बुद्धि या सराफी धंद्यात एखाद्या अनुभवी सराफासारखी चालू लागली. सर्वच धंद्यात, विशेषतः सराफी धंद्यात

जोडीदार फारच विश्वासू व प्रामाणिक असावे लागतात. सोनें, चांदी, जवाहर व प्रत्यक्ष रोकड या व्यवसायात हातामध्ये सारखी खेळत असली तरी जोडीदारावर संपूर्ण विश्वास टाकल्याशिवाय हा धंदा चालविताच येत नाहीं. या व्यवसायातील रत्नपारखी इतराना कदाचित् फसवतील, पण आपल्या साथीदाराला फसविण्याचा खुळेपणा कधींहि करणार नाहींत. मोठ्या स्वार्थाच्या दूरदर्शी दृष्टीनें तें त्याना परवडण्यासारखेंहि नसतें. हजारों रुपये किंवा हजारों रुपये किंमतीचे सोन्याचांदीचे नग आपल्या अंग वर त्याना वागवावे लागतात. सराफाच्या कपड्यावरून म्हणजे सदऱ्याच्या आत एक जॅकेट घालणें, किंवा मोठ्या खिशाचीं जाकिटें वा कोट वापरणे, यावरूनहि सामान्यतः अनुभवी मनुष्य ओळखू शकेल कीं, ही विशिष्ट व्यक्ति धंद्यानें सराफ आहे किंवा नाहीं. वर उल्लेखिलेला सल्लागार मदतनीस अथवा जोडीदार याला बरोबर घेऊनच गोविंदरावानीं आपलें सराफी दुकान दोनतीन वर्षे चालविलें. आपल्या कामाचा आढावा घेत राहण्याची सवय याळगी बंधूना—विशेषतः गोविंदरावाना—जन्मजात होती. ते सामाजिक, शैक्षणिक व राजकीय क्षेत्रात पाण्यासारखा पैसा खर्च करीत असत, पण कोणत्या कार्यात किती व कमी पैसा खर्च झाला याचा हिशोब त्याच्या डोक्यात सतत तयार असे. पुढे हे तिन्ही याळगी बंधु सराफी दुकानात बसत असत. रात्रीं आपलें दुकान बंद करण्यापूर्वी सर्व जमाखर्च व शिल्लक लिहून मोजून व हिशोब जुळल्यावाचून ते दुकानाबाहेर पडतच नसत. जमाखर्चाच्या हिशोबात एखाद्या आण्याची जरी चूक असली तरी सर्व ताळेबंद पुनः पुनः पाहून चूक शोधून ती योग्य रीतीनें दुरुस्त होईपर्यंत त्याचें दुकान कधीं बंद होत नसे. मग त्या दिवशीं भोजनाला जाण्यास तासभर किंवा अधिकहि विलंब झाला तरी त्याना त्याची पर्वा नसे. घरीं जाऊन भोजन करणें व झोपणें ही गोष्ट त्याना त्या वेळीं गौण वाटे. असे प्रसंग प्रस्तुत लेखकानें प्रत्यक्ष पाहिलेलेहि आहेत.

त्या पहिल्या दोन वर्षांच्या व्यापाराचा व व्यवहाराचा आढावा पाहता, गोविंदरावाना अंदाजापेक्षा, अपेक्षेपेक्षा, फारच थोडा नफा झालेला आढळून आला. म्हणून आपले धाकटे बंधु कृष्णराव याची शाळा सोडवून त्यालाहि त्यानीं आपल्या मदतीस घेतलें. अर्थात् हें कृष्णरावाचें पदार्पण केवळ गोविंदरावानीं सुरू केलेल्या सराफी दुकानातच नव्हे तर गोविंदराव करीत असलेल्या इतर सार्वजनिक, राजकीय व सामाजिक कार्यांतहि तें बरोबर त्याचें पदार्पण झाल्यासारखें होतें. गु. गंगाधरराव यानीं आपल्या एका सहकाऱ्याला म्हणजे प्रस्तुत लेखकाला लिहिलेल्या पत्रामध्यें कृष्णरावाविषयीं ते म्हणतात, 'गोविंदरावापेक्षा त्याचा कृष्णराव माझ्या सहवासात जास्ती असता तर त्याना उपयोग जास्ती झाला असता. गोविंदरावाना कमीपणा देण्याच्या उद्देशानें मी हें लिहीत नाहीं, पण मला असें वाटतें. (अनुग्रह पत्र १६) यावरून कृष्णरावाची कार्यक्षमता कोणालाहि सहज कळून येण्यासारखी आहे.

प्रकरण सातवें

# गोविंदरावांची जन्मजात वृत्ति

सराफी दुकानात अदाजापेक्षा—अपेक्षेपेक्षा गोविंदरावाना कमी फायदा झाल्याचें दिसून आलें. केवळ याच एका कारणासाठीं कृष्णरावाची शाळा सोडून त्याना दुकानात बसण्यासाठीं आणिलें, असें नाहीं. त्याला दुसरेंहि एक कारण होतें. गोविंदरावानीं कुटुबपोषणासाठीं सराफीचें दुकान काढून जो एक धदा सुरू केला होता त्याला ते आपला सर्व वेळ देऊ शकत नव्हते. त्याच्या आवडीच्या इतर कामाना पुरेसा वेळ सापडावा, हा त्याचा हेतु कृष्णरावाचें शिक्षण बद करण्यामाग होता.

गोविंदराव ज्याला एकदा आपला म्हणतील त्याच्यावर केव्हाहि कसलाहि प्रसग येवो तो प्रसग स्वत वरील आहे असे ते मानीत. त्याच्या दु खात किंवा सुखात ते नेहमीं सहभागी असत. अशा रीतीनें 'जो परोपकार करातचि गला—तो पाहिजे ज्याला त्याला' हा समर्थ रामदासस्वामींनीं लिहून ठेवलेला अनुभव गोविंदरावाच्या बाबतींत ततोतत जुळणारा आहे. गोविंदरावाचा मित्रपरिवार दिवसेंदिवस वाढतच चालला. ज्या ज्या लोकाना ते मदत करीत गले त्याच्याकडून त्यानीं कधीं कशाची अपेक्षा केली नाहीं. एवढेंच नव्हे, तर तशा प्रकारचा खालच्या पातळीवरील विचार त्यानीं आपल्या मनातहि शिरू दिला नाहीं ही त्याची वृत्ति 'दिन दूनी रात चौगुनी' अशी वाढतच गली. त्याचा मित्रपरिवारहि फुगत गला. गोविंदरावाच्या जन्मजात वृत्तीविषयीं गगाधररावानीं अगदीं यथार्थ वर्णन करून ठेवलेलें आहे. ते लिहितात.

> "गोविंदरावाचा व माझा सबध इतका आला होता कीं, त्यानीं आपल्या कार्यतत्परतेमुळें माझें मन जवळजवळ पूर्णपणें आकर्षित करून घेतलेलें होतें त्याचा शब्द मोडण्याचें माझ्या हातून झाल नाहीं. माझ्या सार्वजनिक आयुष्यात असे अनेक प्रकार घडले आहेत व माझ्या जिवलग स्नेह्याच्या प्रोत्साहनानें मीं अनेक जबाबदारीचीं व जोखमीचीं कामें अगावर घेतलीं आहेत.

फक्त प्रोत्साहन देऊन आपण नामानिराळे राहणाऱ्यांपैकीं ते नव्हते. माझ्यावर जे अनेक प्रसंग आले त्या त्या प्रसंगात ते माझे सहभागी होते. इतकेंच नव्हे तर आपला पैसा, आपली सर्व शक्ति खर्ची घालून, आपल्यावर संकटें ओढवून घेण्याला देखील त्यांनीं कमी केलें नाहीं."

*—माझी जीवनकथा, पान ११८.*

त्याच दिवसांत 'छोटासा जपान आणि बलाढ्य रशिया' यांचें युद्ध सुरू होतें, त्याची हकीकत 'केसरी'मधून वाचून ते आपल्या मित्रमंडळीशीं त्याची चर्चा करीत असत. गोविंदरावांच्या सहवासामुळें त्यांच्या मित्रापैकीं कित्येकांच्या जीवनांत आमूलाग्र बदल किंबहुना क्रांति घडून आलेली आहे. जे त्या श्रेणीपर्यंत चढूं शकले नाहींत त्यांना स्वाभाविकपणेंच दूर व्हावें लागलें. परंतु त्यांच्या सहवासात आलेल्या कोणालाहि त्यांनीं आपला विरोधी बनू दिलेलें नाहीं. कारण मनुष्य आपल्याजवळ राहो किंवा दूर राहो, त्याला त्याच्या कोणत्याहि प्रसंगांत मदत करीत राहण्यास ते मागेंपुढें पाहात नसत; किंवा तो आपल्याशीं कसा वागला अथवा वागतो याचाहि हिशोब ते कधीं मनांत आणीत नसत. रुसो जपानी युद्धामध्यें छोट्या जपानला यश मिळालेलें वाचून त्यांच्या मनांत येत असे कीं, 'मग आपणहि आपल्या देशातून इंग्रजांना हाकलून देऊन आपल्यावरील पारतंत्र्याचें जूं कां फेकून देऊं शकणार नाहीं?' त्याविषयीं ते आपल्या मित्रमंडळीमध्यें खूपच चर्चा करीत असत. व परिणामकारक बोलत असत. "बुधवारी केसरी केव्हां एकदां येतो व त्यांतील विचार कधीं एकदां मी वाचतों आणि केव्हां त्यांतील विचारांची चर्चा मी मित्रांशीं करतों" असें गोविंदरावांना होत असे. टिळक आज काय म्हणतात व त्यांना आज काय पाहिजे आहे, आमच्याकडून ते कोणत्या गोष्टीची अपेक्षा करीत आहेत याकडे त्यांचें बारीक लक्ष असे. या त्यांच्या मनोभूमिकेमुळें समाजांतील तरुण मंडळी त्यांच्याकडे आकर्षित होऊं लागली. खाजगी चर्चेमध्यें गोविंदराव वाटेल तितकें बोलत असले तरी त्याना सभाधीटपणा नव्हता. एकदां तर तसा प्रसंगच पडला म्हणून एका सभेला ते अध्यक्ष झाले होते. व्याख्याते गुरु. गंगाधरराव हेच होते. श्रोतृगणाच्या वतीनें त्यांना आपलें व्याख्यान सुरू करण्यास अध्यक्ष या नात्यानें गोविंदरावांना *'आजच्या सभेचे व्याख्याते गु. गंगाधरराव यांनीं आतां आपलें व्याख्यान सुरू करावें'* अशी विनंती करावयाची होती. पण आयत्या वेळीं सभाधीटपणाच्या अभावामुळें ते गंगाधररावांचें नावच विसरून गेले. आणि गंगाधररावांच्याकडे हात दाखवून "मी 'यांना' आतां आपल्या सर्वांच्या वतीनें आपले विचार मांडण्यास विनंती करतों" असें बोलून त्यांना सभेचें काम सुरू करावें लागलें होतें. आणि 'सभेचें काम संपलें आहे' एवढेच मोजके चार शब्द मोठ्या धीटपणें (!) सांगून

सभा भावरानी लागली होती. गोविंदरावाच्या आपुलकीच्या वागणुकीमुळें समाजातील सर्व जातींची मडळी त्याच्याकडे अत्यत प्रेमानें पहात असत. बेळगावातील भिन्न भिन्न जातींमध्यें, हिंदु मुसलमानामध्यें किंवा राजकीय पक्षोपपक्षामध्यें मतभेद नव्हते व नाहींत असे नाहीं. गोविंदराव-गंगाधररावाच्या अशा प्रकारें आत्मीयतेच्या वागणुकीचा व शिकवणुकीचा परिणाम असा झालेला आहे कीं, त्याच्या कामाआड अशा तऱ्हेचे भेदगतेहि तटे आले नाहींत व कधींच विकोपाला जाऊ शकले नाहींत व कामाचा बिघाडहि झाला नाहीं. एका क्षेत्रात तीव्र मतभेद असलेले कार्यकर्ते किंवा पुढारी दुसऱ्या क्षेत्रात एकोप्यानें कार्य करीत असलेलें दृश्य बेळगावात अनेक प्रसगीं पहावयास मिळत असे. अद्यापिहि तेंच वळण गिरवलें जात असलेलें अनुभवास येतें.

अशा रीतीनें गोविंदरावाचा समाजाच्या सर्व लोकाशीं सबध येत गेल्यामुळें कोठें कोण गुणी मनुष्य आहे व त्याला कसे पुढे आणावें व कसें प्रोत्साहन द्यावें याकडे गोविंदरावाचें नेहमीं लक्ष असे. त्याचें एकच उदाहरण मी येथे देत आहें. त्याच्या जीवनातील अशीं कितीतरी उदाहरणें देता येण्यासारखीं आहेत.

"सन १९०५ मध्यें काशीला कॉंग्रेसचें अधिवेशन भरलें होतें. त्याला जोडूनच स्वदेशी वस्तूंचे व देशातील कलाकौशल्याचेंहि प्रदर्शन भरविण्यात आलें होतें. लाकडी रगीत फळफळावळाच्या वस्तु व इतर चित्राबद्दल गोकाक मशहूर आहे. कुशल कारागीर उत्तम आकाराचीं लाकडी फळें बनवून त्यावर अगदीं नैसर्गिक वाटण्याइतका हुबेहूब रग देत असतात. विशेषत' साब या नावाचे कुशल कारागीर या कलेंत अगदीं अजोड होते त्याच्या काहीं वस्तु आपल्या खर्चानें काशीच्या प्रदर्शनात पाठवून त्या वस्तूबद्दल त्याना उत्तम प्रशसापत्र गोविंदरावानीं मिळवून दिलें. सबध हिंदुस्थानात त्या कारागिराची व गोकाकचीहि प्रसिद्धि केली. सारवटगाडी हे बेळगावातील वाहनाचें वैशिष्ट्य आहे हें जाणून गोविंदरावानीं सदर साब याजकडून एक खेळण्यातली छोटी सारवट बैलगाडी तयार करवून घेतली. ती गाडी कित्येक वर्षें याळगींच्या घरीं होती."

लोकाना अडीअडचणीमध्यें गोविंदराव व त्याची मित्रमडळी मदत करण्यास धावून येतात ही गोष्ट शहरामध्यें सर्वश्रुत झालेली होती प्रस्तुत लेखकानें गोविंदरावाच्या नेतृत्वाखालीं काहीं वर्षें काम केलेलें असल्यामुळे या सदर्भाला अनुलक्षून काहीं स्मृति येथे दिल्या तर त्या अस्थानीं होणार नाहींत.

१. पूर्वी बेळगावचें जनरल पोष्ट ऑफिस गावाच्या कडेला सुठणकर याच्या जागेंत होतें. तेथील एका ऑफिसरच्या घरीं एका वृद्ध नातलगाचें निधन झाले होतें. त्याचा व श्री बाबासाहेब सोमण याचा परिचय असल्यामुळे त्यानीं ही बातमी बाबासाहेबाना दिली. बाबासाहेबानीं गोविंदरावाना बोलावून घेतलें आणि त्याना सर्व हकीगत सांगितली. सुमारें एक तासाचे आत गोविंदरावानी आपल्या मित्राना बोलावून ही बातमी दिली. नतर मृत देहाची पुढील सर्व व्यवस्था गोविंदराव व त्याचे

मित्रमंडळीकडून करण्यात आली. या प्रेतयात्रेला गोविंदरावांच्याबरोबर प्रस्तुत लेखकहि गेला होता.

२. बेळगाव शहरांत एक वैश्य गृहस्थ निधन पावले असल्याचें वृत्त त्यांच्या घरच्या लोकांनीं गोविंदरावांना कळविलें. ती दोन प्रहरची वेळ होती. भोजन बाजूला सारून गोविंदराव व त्यांची मित्रमंडळी तेथें दाखल झाली. ते गृहस्थ शरीरानें बरेच स्थूल होते. शव नेण्यासाठीं जी तिरडी तयार करण्यात आली होती तिचे बांबू त्या स्थूलकाय शवाचें वजन पेलतील इतके मजबूत नव्हते. मी (प्रस्तुत लेखक) गंगाधररावांच्या घरीं भोजनास जाण्याच्या तयारीस लागलों होतों. (ह. भ. प. डॉ. दत्तोपंत पटवर्धन यांच्या सहवासांतून थोड्याच दिवसापूर्वी मी गंगाधररावांच्याकडे आलों होतों. अर्थात् त्या वेळीं मी सोवळें नेसून जेवणास बसत असे. कपडे घालूनच भोजनाला बसण्याची कला त्या वेळेपर्यंत मी शिकलों नव्हतों) प्रेत खांद्यावरून वाहून नेणाऱ्यांचा तो घोळका गंगाधररावांच्या घरापर्यंत आला असेल नसेल, त्या तिरडीची एक बाबूची दांडी प्रेताच्या पायाकडील बाजूस करकरू लागली. गंगाधरराव आपल्या दरवाजांतच उभे होते. त्यांनीं एकदम मोठ्यानें मला हाक मारली व म्हटलें, 'अरे पीतांबर नेसू नकोस. कपडे घाल व चटकन् बाहेर ये' मला वाटलें कीं, कोठेतरी कांहीं कामासाठीं बाहेर जायचें आहे. अंगात कपडे घातले. पायीं चप्पल अडकवीत पळतच मी बाहेर आलों, तों दरवाजासमोर एक प्रेत खांद्यावरून लोक वाहून नेत आहेत, हें दृश्य मला दिसलें. गंगाधरराव मला म्हणाले, 'या प्रेताच्या तिरडीचा एक बांबू मोडला आहेसें वाटतें त्या ठिकाणीं टेकू दे व स्मशानापर्यंत त्यांच्याबरोबर जा.' मी तसाच प्रेताकडे वळलों. बांबूचा मोडका भाग सावरण्यासाठीं मी माझा हात त्या ठिकाणीं धरला व खांदेकऱ्यांबरोबर चालू लागलों. लगेच मला दिसून आलें कीं, तिरडीवर तें शव नीट बांधलेलेंहि नाहीं. तिरडी आवळणारा मनुष्य नवखा असावा. त्या प्रेताचा पाय सुतळी तुटल्यामुळें सुटून थोडा खालीं बाजूला सरकला होता. खांदा देणाऱ्या लोकांच्या विषम उंचीच्या हेलकाव्यानें तो पाय हलू लागला. मोडका बांबू सावरून धरण्यासाठीं माझा हात त्याच ठिकाणीं होता. मी माझ्या आईवडिलांच्या मृत्यूच्या वेळीं प्रेत पाहिलें होतें, पण कधीं कोणाला खांदा दिलेला नव्हता माझा तो पहिलाच प्रसंग होता. तो प्रेताचा पाय वरचेवर माझ्या हाताला लागू लागल्यानें खांदा देणाऱ्या इतर लोकांना मीं म्हटलें, 'वर बांधलेलें प्रेत लाथा मारू लागलें आहे. हे गृहस्थ खरोखरच मेले आहेत कीं नाहीं, हें तरी नीट पाहून घ्या.' हें ऐकून खांदा देणारे सर्व लोक हसू लागले. मोडक्या बांबूला हात देऊन चालविलेली ही तिरडी हसत, खेळत, श्री बेळवी यांच्या घरासमोर आली. इतक्यांत तिरडीचा दुसरा बांबूहि मोडल्याचा आवाज झाला. तेव्हां मीं सहज म्हटलें कीं, 'प्रेत जरा खालीं उतरवा. रस्त्याच्या मध्यावर उतरवण्यापेक्षा तें बेळवींच्या घराची चांगली प्रशस्त

पायरी आहे, त्यावर ठेवा. हें माझें बोलणें वेळवींच्या घरातील लोकांनीं ऐकलें असावें. त्यानीं आपल्या घराचा दरवाजा बंद करून घेतला. नवीन बांबू व सुतळी आणवून प्रेताची तिरडी त्या पायरीवरच दुरुस्त करवून घेतली व नंतरच तें प्रेत तेथून उचलण्यात आलें. वेळवींच्या घरापुढें मीं मुद्दाम प्रेत उतरविलें अशी वेळवींच्या घरातील लोकाची समजूत पुढें कित्येक दिवस होती. पण वस्तुस्थिति कळून आल्यावर तो त्याचा गैरसमज दूर झाला. या दोन प्रसंगामुळें पुढें असल्या कामाला अडचण पडेल त्या वेळीं स्वत गोविंदरावच मला बोलावू लागले.

३. तिसराहि एक असाच प्रसंग आहे. तो आज आठवला तर माझी मलाच लाज वाटते. तारुण्यातील अविचार जाणवतो. आणि साहसाची ऊर्मि विवेकाच्या लगामीं राहिली नाहीं तर काय अनर्थ ओढवतो याचें मूर्तिमत उदाहरण म्हणजे हा तिसरा प्रसंग आहे. वेळगावातच केळकर बागेमध्यें एका वृद्ध सराफाचें निधन झालें. त्याच्या घरीं ते सराफ, त्याची पत्नी व तिची बहीण अशीं तीनच माणसें होतीं. रात्रीं सुमारें नऊ वाजता त्याचें प्राणोत्क्रमण झालें होतें. त्या दोन स्त्रियानीं रडणें ओरडणें मुळींच केलें नाहीं. त्या प्रेतावर एक पाघरूण घालून घराला कुलूप लावलें आणि दोघी स्त्रियानीं आपल्या सराफी दुकानाच्या किल्ल्याचा जुडगा घेऊन दुकान गाठलें. दुकान उघडून दुकानातील सर्व दागदागिने, चीजवस्त, सोनेचादी, रोकड नाणें, कसोटीवरील सोनें टिपलेला मेणगोळा, हिशोबाच्या वह्या, झाडून सर्व जें आणता येईल तेवढें घेऊन एका ट्रंकेत भरलें. आणि ती ट्रंक घेऊन त्या दोघी घरीं परतल्या. पुढें सराफाच्या पत्नीनें आपल्या बहिणीकडे ती ट्रंक दिली. त्या दोघी टांगा करून स्टेशनवर गेल्या. त्या बहिणीला खानापुरास पाठवून सराफपत्नी घरीं आली. ती एकटीच आली. कुलूप काढून आत जाऊन काहीं काळ निवात बसली. मग थोड्या अवसरानें घरात एकदम रडून तिनें आकांत माडला. ती रड ऐकून शेजारपाजारच्या आवारातील काहीं बायका जमल्या. त्यानींहि अश्रु गाळून सराफीण-बाईना सहानुभूति दाखविली. कै. बाबासाहेब सोमणानीं ही बातमी गोविंदरावाना कळवली. या प्रसंगीं गोविंदरावानीं मलाहि बोलावून घेतलें. त्या दिवशी अपरात्र असल्यामुळें प्रेत वाहण्यास पुरेशी मडळी जमलेली नव्हती. तेव्हा माझ्या मनात आलें कीं, बाजारामध्यें एक 'सप्लाइंग कपनीचें' दुकान आहे. लोकाच्या घरीं सामान पोंचवण्यासाठीं त्या दुकानानें रबरी धावाची एक हातगाडी केलेली होती. ती त्याच्या दुकानासमोरच रात्रीं रिकामी पडून असे! त्या गाडींतून गु गगाधररावाच्या घरचा किराणामाल मीं अनेक वेळा आणविला होता. त्यामुळें या गाडीचें मला स्मरण झालें. कोणासहि न विचारता, न सागता मीं पळतच त्या दुकानाकडे गेलों. ती हातगाडी त्या दुकानाबाहेर होतीच. ती घेतली नि ढकलून या मयताच्या घरासमोर घेऊन आलों.

तोंपर्यंत प्रेताला तिरडीवर आणून ठेवण्याची तयारी झालेली होती. प्रेत उचलण्यापूर्वी पत्नीचें मगळसूत्र त्या प्रेताच्या म्हणजे पतीच्या तोंडात घालावयाची रूढी आहे. तें मगळसूत्र मागण्यास कोणा स्त्रीनें दुसरीला सुचवलें. तें अस्फुट अभद्र बोलणें ऐकून ती सराफीण मोठमोठ्यानें रडू लागली. मगळसूत्र मागणाराना रडण्याच्याच सुरात शिव्याशाप मोजू लागली त्यामुळें सराफाच्या घरात जाण्यास कोणी तयारच होईना. गोविंदरावाना कल्पना सुचली. ते माझ्याकडे आले. माझ्या खांद्यावर हात ठेवून त्यानीं मला थोडें दूर बाजूला नेलें. तेथे जमलेल्या लोकामध्ये सर्वांत ल्हान मीच होतों. गोविंदराव म्हणाले, 'पुडलीक, एक थोडे नाजूक पण धाडसाचे काम आहे. तुझ्याशिवाय तें होणार नाहीं. असली कामें करायला तुझ्यासारखा क्रातिकारक तरुणच पाहिजे.' हरभन्याच्या झाडाला शिडी लावली पण चढणारा त्यावर चढला पाहिजे ना ? म्हणून ते आणखी म्हणाले, 'खरा क्रातिकारक तरुण तोच कीं, जो आपलें काम करीत असता स्त्रीपुरुष हा भेद विचारात घेत नाहीं, वेळप्रसग पाहात नाहीं. काम उरकलें कीं त्याला सर्व पावतें. माझ्या समजुतीनें तू धाडस करशील !'

'जरूर. मी तें खात्रीनें करतो.' मोठ्या हौसेनें मी बोलून गेलों.

"त्या प्रेताच्याजवळ उजव्या बाजूला जी बाई बसली आहे तिच्या गळ्यातील मगळसूत्र तिच्या पतीच्या तोंडात घालण्यासाठीं पाहिजे आहे. ती कोणासहि जवळसुद्धा येऊ देत नाहीं. तेव्हा झटकन् घरात शिरून, तिच्याजवळ जाऊन तें मगळसूत्र काढून आणावयाचें आहे. हें काम झटक्यासरशीं केलें तरच होणारें आहे. दक्कत दबकत सावकाश जाशील तर तें होणार नाहीं."

'मी तें काम सहज करीन' असें म्हणत प्रेताजवळ जावयास मी निघालोंहि. जाताना गोविंदरावानीं मला मुद्दाम बजावून सागितलें कीं, 'प्रेताच्या डोक्याजवळ उजव्या बाजूला बसलेली बाई, तीच मृताची पत्नी आहे.'

गोविंदरावाच्या बोलण्याचा उद्देश होता कीं, 'प्रेताची उजवी बाजू' आणि मी समजलों कीं, 'माझी म्हणजे आत जाणाऱ्याची उजवी बाजू.' या विचारानें मी झपाट्यानें आत गेलों व भलत्याच सुवासिनीच्या गळ्यातील मगळसूत्र हिसडा मारून तोडून घेतलें व तडक बाहेर आलों. या माझ्या अविचाराने मगळसूत्र हरलेल्या त्या माउलीनें त्या वेळीं जो आकात केला तो आठवला म्हणजे आजहि माझ्या अगावर शहारे येतात. ही सर्व घटना पाहून त्या मृताच्या पत्नीनें आपलें मगळसूत्र आपणच काढून आपल्या पतीच्या तोंडात घातलें. मीं ज्या माउलीचें मगळसूत्र काढून आणलें होतें त्याच्या घरीं जाऊन, त्याच्या पतीला भेटून ही सर्व भानगड गोविंदरावानीं कशी मिटवली असेल तें त्याचें त्यानाच माहीत !

प्रेत बाहेर आणून तिरडीवर ठेवलें. तें बाधून उचलण्याची वेळ आली. त्या वेळीं मीं गोविंदरावाना म्हटलें कीं, मी मध्यतरीं पळत जाऊन 'सप्लाइग कपनीची' ही

हातगाडी घेऊन आलों आहें. त्यावर ही तिरडी ठेवली तर स्मशानापर्यंत प्रेत वाहून नेणें अधिक सोपें व सोईचें होईल. त्या हातगाडीची रुंदी व तिरडीची रुंदी बरोबर जुळली. त्यामुळें गाडीच्या दोन बाजूवर ती तिरडी ठेवून, ती ढकलगाडी स्मशानात नेली.

तिरडी बांधतांना ती व्यवस्थित बांधतात पण ती सोडताना किंवा गाडीवरून प्रेत उतरविताना तितकी काळजी कोण घेणार? त्या शवाला बांधलेल्या सुतळ्या भराभर तोडल्या जातात. त्यामुळे सुतळीचे लांडे तुकडे त्या गाडीला बरेच राहून गेले होते. प्रेत जळेपर्यंत झालेल्या सर्व घटनाचें बोलणें व हशा स्मशानात चालूच होता. गाडीकडे कोणाचेंच लक्ष नव्हते.

स्मशानातून परत आल्यानंतर मीच ती हातगाडी 'सप्लाइंग कंपनी' पुढें जशी होती तशी सोडून आलों. गाडीच्या कड्यामधून अडकून राहिलेले सुतळीचे तुकडे काढून टाकण्याची कल्पना कोणासच सुचली नाहीं. दुसऱ्या दिवशीं त्या दुकानाच्या मालकानें पुष्कळाच्याकडे 'या सुतळ्या आमच्या हातगाडींत कशा?' याची चौकशी केली. त्या स्मशानयात्रेला जे लोक आले होते त्यापैकीं दोनतीन लोक त्या 'सप्लाइंग कंपनी'मध्यें कांहींतरी निमित्त काढून जाऊन आले. दुकानाचे मालक करीत असलेली चौकशी तिथें त्यानीं आपल्या कानानीं ऐकली. पण गाडी रात्रीं कोठें कोणी नेली होती की काय? अगर त्या गाडीत सुतळीचे तुकडे कसे आले? याचा छडा मालकाना शेवटपर्यंत लावता आला नाहीं. या घटनेमुळे गोविंदरावांच्या मित्रमंडळीशीं माझा दाट परिचय झाला



प्रकरण आठवें

# गोविंदरावाचा लोकसंग्रह

दुसऱ्यांना मदत करण्याची जन्मजात प्रवृत्ति गोविंदरावांच्या रक्तांतच होती. समाजांतील सर्व थरांमध्यें सारखाच प्रवेश, लोकप्रियता वाढलेली, रसो–जपानी युद्धांत जपानचा जय झाल्याचें उदाहरण तरुण पिढीच्या डोळ्यापुढें प्रत्यक्ष घडलेलें, आणि सर्वांवर कळस म्हणजे 'केसरीं'तून दर आठवड्याला लोकमान्य देत असलेल्या शिकवणीचा प्रभाव असे सर्वच योग व अनुकूल ग्रह एकत्र जमून आले होते. त्यामुळें गोविंदरावाच्या बुद्धींत व अंतःकरणात असलेला स्वातंत्र्याचा स्फुलिंग प्रज्वलित होत चालला. लोकजागृतीच्या दृष्टीनें श्री. नगरकर वकील व कानविंदे यांना गोविंदरावांनीं आपल्याबरोबर घेतलें होतें, कारण त्याना व्याख्यानें देतां येत होतीं. त्या काळीं आर्यसमाजी लोकांचें मिशनऱ्यांच्या विरुद्ध प्रचारकार्य चालू होतें. वादेरच्या प्रांतांतील कोणी एक वक्ता—बहुतेक तो महानचंद्र वर्मा असावा—बेळगावांत आला असतां त्याच्यासाठीं बोलावलेल्या जाहीर सभेमध्यें उपवक्ता म्हणून गंगाधररावांचें परिणामकारक भाषण झालें. तें ऐकल्यानंतर लगलीच त्याच दिवशीं गोविंदराव गंगाधररावाच्या घरीं आले. दोघांनाहि एकमेक जसे पाहिजे होते तसे मिळाले. त्या दिवसापासून ते दोघे—गुरु शिष्य—अगदीं एकजीव झाले. ही युति सन १९०५ सालीं झाली. एवढा चांगला परिणामकारक वक्ता मिळाल्यानंतर आणि त्यालाहि स्वातंत्र्यसंपादनाचा ध्यास आणि देशसेवेचा नाद आहे हें कळून आल्यानंतर, नगरकर व कानविंदे यांच्याकडील मोह गोविंदरावांना तितकासा उरला नाहीं. अन्य वक्त्यांनींहि वक्तृत्वाच्या तारज्यांतील आपलें वजन ओळखून वागण्यात कमीपणा मानला नाहीं. या दोघांच्याहि जाज्वल्य देशभक्तीच्या मानानें ते तोकडे पडूं लागले. सन १९०६ मध्यें या दोघांच्या विचारविनिमयामुळेंच लो. टिळकांना बेळगांव जिल्ह्यामध्यें आणवून सर्व जिल्हाभर त्यांचा दौरा काढण्यांत आला होता. लोकमान्यांचा प्रभाव म्हणून असो कीं त्यांचें संघटनाचातुर्य असो ते जेथें जातील तेथें असा जाज्वल्य देशाभिमान व धैर्य असलेले

तरुण कार्यकर्ते मिळत गेले. त्यांच्या कर्तृत्वाचा लोकमतावर प्रभाव पडत असल्याचें पाहून सरकारनें त्यांना आवरण्याचें ठरविलें. सन १९०६ च्या काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून दादाभाई नौरोजींनीं 'स्वराज्य' शब्दाचा पुकारा केला. आणि पुढें थोड्याच दिवसांत लोकमान्यांची चतु:सूत्री—स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण आणि स्वराज्य—बाहेर प्रसृत झाली. यापुढील सर्व काँग्रेस अधिवेशनास बेळगावाहून बरीच मंडळी हजर राहू लागली. पुढें काँग्रेसच्या अधिवेशनासाठीं, काँग्रेस प्रतिनिधींसाठीं रेल्वेचे स्वतंत्र डबे व नंतर रेल्वेची स्वतंत्र गाडीच सोडविण्याची योजना करावी लागली होती. सोलापूरच्या प्रांतिक परिषदेच्या अधिवेशनासाठीं बेळगावाहून स्वतंत्र रेल्वेगाडीच सोडविण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. लोकमान्यांच्या चतु:सूत्रीचा प्रचार कसा करावयाचा याची, बेळगाव जिल्ह्यापुरती व नंतर कर्नाटकापुरती योजना कशी आखायची याची, चर्चा गंगाधररावांच्या घरीं एका खोलीमध्यें रोज रात्रीं भोजन आटोपल्यानंतर चालत असे. त्या सर्व चर्चा ऐकत बसण्याचें भाग्य व पूर्वपुण्याई प्रस्तुत लेखकाला लाभलेली आहे. शहरामध्यें त्या कोणाला जी कोणती राष्ट्रपोषक चळवळ करावयाची असेल अगर तशी आकांक्षा असल्याचें गोविंदरावांच्या निदर्शनास येईल, त्याच्या मदतीला ते प्रथम धांव घेत. गोविंदरावांनीं स्वदेशीचा पुरस्कार करण्यासाठीं स्वदेशी कापडाचें दुकान सुरू केलें. ज्या कोणा तरुणांना आखाडे स्थापून कुस्ती-दांडपट्टा वगैरेचा प्रचार करण्याची इच्छा असेल त्यांना ते आनंदानें साह्य देत, मार्गदर्शन करीत आणि खर्चाची तोंडमिळवणी करतांना पैशाची वाण न पडू देण्याचें कामहि त्यांनीं केलें आहे विद्यार्थीवर्गाची संघटना उभारण्याचें व राष्ट्रीय शाळा उघडण्याचेंहि आंदोलन त्यांना हातीं घेतलें होतें. बहिष्कारावर गंगाधररावांचीं व्याख्यानें गोविंदराव वारंवार जाहीर सभांतून करवीत असत. ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धन यांचीं स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, स्वराज्य यावरील पदें वगैरेच्या बैठकी घडवून आणून लोकांना ऐकवीत असत. संक्रातीच्या दिवशीं परदेशी साखरेचा हलवा विकत बसणाऱ्यांचीं ताटें उधळून फेकून देण्याचाहि कार्यक्रम त्या काळच्या तरुणांनीं वगळलेला नव्हता. या सर्व प्रवृत्तीमध्यें गोविंदरावांची दृष्टि व उद्देश त्या त्या कलेची वृद्धि, उन्नति व उपासना करण्याकडे फारच थोडा होता. त्या सर्व धडपडीचा उपयोग स्वातंत्र्याच्या लढ्यास किती व कसा करून घेता येईल याकडेच त्यांची दृष्टि असे. व्यायामशाळा काढण्यास प्रोत्साहन देण्यामध्यें उत्तम कुस्तीगीर व उत्तम दांडपट्टा खेळणारे किंवा जगीं कुस्त्या मारणारे लोक त्यांना तयार करावयाचे नव्हते. त्यांना जी कुस्ती मारायची ती इंग्रजांशीं जुंपलेली होती. त्या कुस्तीचा शेवट देशाची गुलामगिरी नष्ट होऊन स्वातंत्र्यसूर्याचा उदय झाल्यानंतर व्हावयाचा होता. हीच गोष्ट त्यांच्या अनेक इतर चळवळींविषयीं होती. संक्रातिदिवशीं केवळ तीळ व गूळ कुटून मारुतिमंदिरांत तीळगूळ वाटण्याचा उपक्रम गोविंदरावांनीं चालू केला

होता. गणपति उत्सव, शिवजयंती उत्सव, पिकेटिंग, शिमग्याचा सण वगैरे चळवळींना गोविंदरावाच्यामुळें बेळगाव शहरात व पुढें समग्र जिल्ह्यात जोर चढत राहिला सन १९०६ च्या चळवळीनंतर या जोडीचा संबंध फडकेसाच्या क्रांतिकारकांशीं येऊ लागला. सरकारची ज्याच्यावर नजर आहे अशा क्रांतिकारकाचें भूमिगत होऊन राहण्याचें बेळगाव हे एक स्थान होऊन बसलें. यामुळें गोविंदराव—गंगाधरराव याना व त्याच्या साथींना फारच सावधगिरीनें दिवस काढणें क्रमप्राप्त होऊन बसलें.

**मोहरमाच्या पद्धतीवर शिमगा सण :** सन १९०५ व त्यापूर्वीपासूनच गोविंदराव व गावातील जात-गोत-पंथ याकडे नारकाईने पाहून आणि त्याकडे दुर्लक्ष करूनहि म्हणजे जातिनिष्ठ न होता लोकाना हरतऱ्हेनें मदत करीत, लोकांच्या उपयोगी पडून संपर्क करीतच होते. शिमग्यातील होळीच्या उत्सवाच्या निमित्तानें गोविंदराव आपला लोकसंग्रह वाढवीत होते. मुसलमानाच्या सणामध्ये सोंगें घेऊन नाचणारे बहुतेक लोक हिंदूच असतात. तसे नाचण्याची संधि व हौस हिंदू लोकाना अन्यत्र भागवित आल्यास त्याचें लक्ष मुसलमानाच्या सणावरून बाजूस हटेल, निदान कमी होईल, अणु काय हें जाणूनच गंगाधरराव-गोविंदरावांनीं शिमग्याच्या सणामध्यें हिंदू लोकांनीं मिरवणूक काढून तशीं सोंग घ्यावींत अशी योजना करून दिली. मावळ्याचीं सोंगें घेऊन तशा मिरवणुका निघू लागल्या. शिमग्याच्या सणातील बीभत्सपणा काढून टाकावा व देशस्थितीकडे जनतेचें लक्ष वेधावें, याकडे या जोडीचे व त्याच्या साथीदाराचे लक्ष असावयाचें! मुसलमानाच्या सणामध्ये सोंगें घेण्याचें अजीबात बंद करण्याचें बहुजन हिंदू समाजाला मान्य होईना. म्हणून त्यात व्यर्थ वेळ न घालवता, लोकसेवेच्या दृष्टीनें या मेळाव्याचा जास्तीत जास्त उपयोग कसा करून घ्यावा याबरच त्यांनीं आपली शक्ति वेचली. मेळे आदींच्या निमित्ताने लोक जमत असत त्याच्यापुढे गंगाधरराव याचीं व्याख्यानें करावयाचीं असा क्रम गोविंदरावांनीं आखला. मुसलमानाच्या सणामध्यें ब्राह्मणसमाजातील काहीं लोकानीं सोंगें घेऊन नाचण्यापर्यंत पाळी आली होती, इतर्‍यां त्यांच्या पाळेंमुळें खाल गेलीं होतीं. शिमग्याच्या सणामध्यें प्रत्येक होळीसमोर गंगाधरराव अगर गोविंदरावाच्या मित्रमंडळीपैकीं कोणाच तरी व्याख्यान होई. दोन खुर्च्या, एक टेबल, दोन ग्यासचे दिवे डोक्यावर घेऊन या होळीपासून त्या होळीकडे अशी सामग्री गल्लीगल्लीं फिरवली जात असे. आणि त्या ठिकाणीं भाषणें होत. हीं व्याख्यानें देण्यासाठीं गंगाधरराव देशपांडे हेहि गोविंदराव त्याना नेतील तेथें जात व व्याख्यानें देत.

गोविंदरावाना सभाधीटपणा नव्हता. परतु जे काम ते आपल्या हातीं घेतील त्यात आपलें तनमनधन अर्पण करीत असत. सन १९०५ सालीं काँग्रेस अधिवेशनास उपस्थित राहून गोविंदरावांनीं पुष्कळच स्फूर्ति मिळवली होती त्या अधिवेशनापासून लोकमान्याच्या राष्ट्रीय चतुःसूत्रीला आकार येत चालला होता. सन १९०६ च्या

काँग्रेस अधिवेशनात अध्यक्ष दादाभाई नौरोजी यानीं 'स्वराज्य' शब्दाचा उच्चार करून त्या शब्दाला एकप्रकारचें पावित्र्य आणून तो राजकारणात रूढ केला. लोकमान्यानीं आपल्या वैचारिक नेतृत्वामुळें व प्रचारामुळें 'स्वराज्य' शब्द सर्वतोमुखीं केला. सन १९०५ सालीं काँग्रेस अधिवेशनाहून परत आल्यावरोबर गोविंदरावानीं या राजकीय चतुःसूत्रीप्रमाणे लोकसंघटना करण्यास प्रारंभ केला व त्या चतुःसूत्रीच्या कल्पनेचा फायदा आपल्या प्रचारानें सर्वांच्या घरोघरीं पोहोंचविण्याची शिकस्त केली. आणि बेळगावात राजकारणाची आघाडी निर्माण केली, व त्यासाठी लोकजागृति करण्याकरिता गोविंदरावानीं अनेक योजना व मार्ग हाताळून पाहिले.

**प्रसिद्ध गवई अबदुल करीमखां यांचें शिष्यत्व :** —लोकजागृतीसाठीं चळवळीचीं लोकमान्यांच्या चतुःसूत्रीवरील पदें प्रत्येक गल्लीच्या चवाठ्यावर व रस्तोरस्तीं म्हणवावींत अशी कल्पना एकदा स. १९०६ सालीं गोविंदरावाच्या मनात आली, व ते त्या उद्योगाला लागले. डॉ. ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धन याना पुण्याहून बोलावून घेऊन, त्याची स्वदेशीवरील पदें त्याच्या खड्या आवाजात म्हणविण्याची योजना त्यानीं आखली. गोविंदराव जेथें उभे करतील तेथें उभे राहून डॉ. ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धन पदें म्हणत असत. त्याचे हे कार्यक्रमहि चागले होत. चव्हाट्यावर व गल्लोगल्लीं रस्त्यावर लोकहि बरेच जमत असत. धारवाडचे श्री. केरूरकर वकील व श्री. चिरेवकील हेहि बेळगावला येऊन स्वदेशीवरील पदें गल्लोगल्लीं म्हणण्याच्या कार्यक्रमात नियमितपणें भाग घेत असत. पुढे असे हे बाहेरील लोक बोलावून पदें म्हणविण्याचे कार्यक्रम किती दिवस चालविता येणार आहेत! असा विचार गोविंदरावाच्या मनांत आला म्हणून म्हणा, किंवा डॉ. ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धन याच्या जाहीर कार्यक्रमावर सरकारने बंदी घातल्यामुळें म्हणा, गोविंदराव व त्याचे काहीं सहकारी यानीं आपण स्वतःच संगीताचा थोडा अभ्यास करून तयार व्हावें असें ठरविलें. त्या दिवसात प्रसिद्ध गवई अबदुल करीमखां बेळगावातच रहात होते. त्याचेकडे गोविंदराव व त्याचे काहीं सहकारी संगीत शिकण्यास व काहीं गाणीं बसवून घेण्यास जाऊ लागले. पदें जसजशीं बसविलीं जातील तसतसे त्याचे प्रयोग च हाच्यावरील कार्यक्रमामध्येंच व्हावयाचे! त्यापैकीं काहीं सहकाऱ्यानीं असले कार्यक्रम निभावून नेण्याइतकें संगीत शिकून घेतले व काहीं स्वदेशीवरील गाणींहि बसवून घेतलीं, व तेवढ्या पुंजीवर आपले कार्यक्रम ते पार पाडू लागले.

डॉ ह. भ प. दत्तोपंत पटवर्धन याच्या जाहीर कार्यक्रमाला सरकारनें बंदी घातल्यानंतर, त्याच्या गायनाचे कार्यक्रम खाजगी घरातून होऊ लागले त्याची सर्व योजना व व्यवस्था गोविंदरावच करीत असत. कल्लोळ गावचे श्री. कृष्णराव करगुप्पीकर या कामीं हौसेनें भाग घेत असत. श्री. कृष्णराव करगुप्पीकर याना हार्मोनियम वाजविता येत असे, व त्याचा आवाजहि चागला होता. गोविंदरावाचे ते शाळेंतील वर्गबंधु होते.

दोघानीं एकदमच शाळा सोडली होती. स्वदेशीचीं पदं व्याख्यानावर म्हटलीं जात असत त्या वेळीं श्री. कृष्णराव करगुप्पीकर हेच पेटी वाजविण्याचें काम करीत असत. त्यासाठीं गोविंदरावानीं एक हार्मोनियम पेटी विकत घेतलेली होती. ठिकठिकाणच्या व्याख्यानावरील कार्यक्रमासाठीं आपल्या डोक्यावर हार्मोनियम घेऊन फिरण्यास श्री. कृष्णराव करगुप्पीकर याना संकोच वाटण्याचें तर नावच नको, पण उलट हौस व उत्साह वाटत असे, व लोकजागृतीच्या सत्कार्यामध्यें आपल्या आयुष्याचा सदुपयोग होत आहे याचा अभिमान वाटत असे.

पुढें स. १९१४ मध्यें डॉ. ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धन यानीं लोकमान्यांच्या आज्ञेनुसार आपला डॉक्टरीचा धंदा बंद करून, लोकजागृतीसाठीं कीर्तनकाराचा पेशा पत्करला; आणि त्यांतून अयाचितवृत्ति राखून होणारी प्राप्ति स्वीकारण्यांत कोणताहि दोष नाहीं असे लोकमान्यानीं त्याना सांगितल्याचें गोविंदरावाना समजलें. त्या वेळीं कीर्तनकार दत्तोपंत पटवर्धन यांच्याकडे प्राज्ञपाठशाळेचे श्री. महादेवशास्त्री दिवेकर टाळ हातात घेऊन कीर्तनकाराच्या मागं साथीदार म्हणून उभे रहात असत. कांहीं महिनेपर्यंत प्रस्तुत लेखकहि त्यांच्यामागं साथीला म्हणून झांज घेऊन उभा रहात असे. गोविंदरावाना डॉ. पटवर्धन याना बेळगावास कीर्तनें करण्यासाठीं बोलावून घेतलें. त्या काळीं त्यांच्याबरोबर विद्वद्रत्न पंडित दिनकरशास्त्री कानडेहि बेळगावास येत असत. गोविंदरावानी डॉ. दत्तोपंत पटवर्धनांचीं बेळगावच्या मारुतीच्या देवाल्यात तीन जाहीर कीर्तनें करविलीं व त्याना बिदागी म्हणून तीनशें रुपये मिळवून दिले. अशा रीतीनें राष्ट्रीय कीर्तनकार म्हणून अयाचित वृत्तीनें मिळेल ती बिदागी स्वीकारून लोकजागृतीप्रीत्यर्थ कीर्तनें करीत फिरण्यासाठीं सन्नद्ध होण्याचा पटवर्धनबुवांचा विधि प्रथम बेळगावात गोविंदरावाच्या अध्वर्युत्वाखालींच झालेला आहे. ती प्रथा किंवा तें व्रत आज गलीं पन्नास वर्षें अव्याहतपणें पटवर्धनबुवानीं चालविलेलें आहे तेव्हापासून आतापर्यंत म्हणजे पुरीं पन्नास वर्षें डॉ. दत्तोपंत पटवर्धन प्रतिवर्षी बेळगावात एकदोनदा तरी येत राहिले आहेत. गोविंदराव हयात असेपर्यंत, डॉ. दत्तोपंत पटवर्धन यांच्या कीर्तनाचे कार्यक्रम व्यवस्थित होत असतात किंवा नाहीं, याकडे गोविंदरावाचें लक्ष असे

लोकजागृतीसाठीं अमुक एक गोष्ट करणें किंवा होणें आवश्यक आहे असे एकदा गोविंदरावांच्या मनानें घेतलें म्हणजे त्यात, गीतेंत सांगितल्याप्रमाणें, 'सर्व भावेन' ते—आपण स्वत , आपले सहकारी, आपले नातलग यांच्यासह—उडी घेत असत. त्याचें प्रत्यंतर या बाबतींतहि सर्वांच्या अनुभवास आलें.

काँग्रेस अधिवेशनात अध्यक्ष दादाभाई नौरोजी यानीं 'स्वराज्य' शब्दाचा उच्चार करून त्या शब्दाला एकप्रकारचें पावित्र्य आणून तो राजकारणात रूढ केला. लोकमान्यानीं आपल्या वैचारिक बैठकीमुळें व प्रचारामुळें 'स्वराज्य' शब्द सर्वतोमुखी केला. सन १९०५ साली काँग्रेस अधिवेशनाहून परत आल्याबरोबर गोविंदरावानीं या राजकीय चतुःसूत्रीप्रमाणे लोकसंघटना करण्यास प्रारंभ केला व त्या चतुःसूत्रीच्या कल्पनेचा फायदा आपल्या प्रचारानें सर्वांच्या घरोघरीं पोहोंचविण्याची शिकस्त केली. आणि बेळगावात राजकारणाची आघाडी निर्माण केली, व त्यासाठी लोकजागृति करण्याकरिता गोविंदरावानीं अनेक योजना व मार्ग हाताळून पाहिले.

**प्रसिद्ध गवई अबदुल करीमखां यांचें शिष्यत्व :** —लोकजागृतीसाठी चळवळीचीं लोकमान्याच्या चतुःसूत्रीवरील पदें प्रत्येक गल्लीच्या चवाठ्यावर व रस्तोरस्ती म्हणवावींत अशी कल्पना एकदा स. १९०६ सालीं गोविंदरावाच्या मनात आली, व ते त्या उद्योगाला लागले. डॉ ह. भ प. दत्तोपंत पटवर्धन याना पुण्याहून बोलावून घेऊन, त्याची स्वदेशीवरील पदें त्याच्या खड्या आवाजानें म्हणविण्याची योजना त्यानीं आखली. गोविंदराव जेथें उभे करतील तेथें उभे राहून डॉ. ह. भ प. दत्तोपंत पटवर्धन पदें म्हणत असत. त्याचे हे कार्यक्रमहि चागले होत. चव्हाठ्यावर व गल्लोगल्लीं रस्त्यावर लोकहि बरेच जमत असत. धारवाडचे श्री. हेरलेकर वकील व श्री पित्रेवकील हेहि बेळगांवला येऊन स्वदेशीवरील पदें गल्लोगल्लीं म्हणण्याच्या कार्यक्रमात नियमितपणें भाग घेत असत. पुढे असे हे बाहेरील लोक बोलावून पदें म्हणविण्याचे कार्यक्रम किती दिवस चालविता येणार आहेत ! असा विचार गोविंदरावाच्या मनात आला म्हणून म्हणा, किंवा डॉ ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धन याच्या जाहीर कार्यक्रमावर सरकारनें बंदी घातल्यामुळें म्हणा, गोविंदराव व त्याचे काहीं सहकारी यानीं आपण स्वतःच संगीताचा थोडा अभ्यास करून तयार व्हावें असें ठरविलें. त्या दिवसात प्रसिद्ध गवई अबदुल करीमखा बेळगावातच रहात होते त्याचेकडे गोविंदराव व त्याचे काहीं सहकारी संगीत शिकण्यास व काहीं गाणीं बसवून घेण्यास जाऊ लागले. पदें जसजशी बसविलीं जातील तसतसे त्याचे प्रयोग चव्हाट्यावरील कार्यक्रमामध्येच व्हावयाचे ! त्याच्यापैकीं काहीं सहकाऱ्यानीं असले कार्यक्रम निभावून नेण्याइतकें संगीत शिकून घेतलें व काहीं स्वदेशीवरील गाणींहि बसवून घेतलीं, व तेवढ्या पुंजीवर आपले कार्यक्रम ते पार पाडू लागले.

डॉ ह. भ प. दत्तोपंत पटवर्धन याच्या जाहीर कार्यक्रमाला सरकारनें बंदी घातल्यानतर, त्याच्या गायनाचे कार्यक्रम खाजगी घरातून होऊ लागले त्याची सर्व योजना व व्यवस्था गोविंदरावच करीत असत कल्लाप्पा गावचे श्री. कृष्णराव करगुप्पीकर या कामीं हौसेनें भाग घेत असत श्री. कृष्णराव करगुप्पीकर याना हार्मोनियम वाजविता येत असे, व त्याचा आवाजहि चागला होता. गोविंदरावाचे ते शाळेंतील वर्गबंधु होते

दोघांनीं एकदमच शाळा सोडली होती. स्वदेशीचीं पदें चव्हाट्यावर म्हटलीं जात असत त्या वेळीं श्री. कृष्णराव करगुप्पीकर हेच पेटी वाजविण्याचें काम करीत असत. त्यासाठीं गोविंदरावांनीं एक हार्मोनियम पेटी विकत घेतलेली होती. ठिकठिकाणच्या चव्हाट्यावरील कार्यक्रमासाठीं आपल्या डोक्यावर हार्मोनियम घेऊन फिरण्यास श्री. कृष्णराव करगुप्पीकर यांना संकोच वाटण्याचें तर नांवच नको, पण उलट हौस व उत्साह वाटत असे, व लोकजागृतीच्या सत्कार्यामध्यें आपल्या आयुष्याचा सदुपयोग होत आहे याचा अभिमान वाटत असे.

पुढें स. १९१४ मध्यें डॉ. ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धन यांनीं लोकमान्यांच्या आज्ञेनुसार आपला डॉक्टरीचा धंदा बंद करून, लोकजागृतीसाठीं कीर्तनकाराचा पेशा पत्करला; आणि त्यांनून अयाचितवृत्ति राखून होणारी प्राप्ति स्वीकारण्यात कोणताहि दोष नाहीं असे लोकमान्यांनीं त्याना सांगितल्याचें गोविंदरावांना समजलें. त्या वेळीं कीर्तनकार दत्तोपंत पटवर्धन यांच्याकडे प्राशगडशाळेचे श्री. महादेवशास्त्री दिवेकर टाळ हातात घेऊन कीर्तनकारांच्या मागे साथीदार म्हणून उभे रहात असत. कांहीं महिनेपर्यंत प्रस्तुत लेखकहि त्यांच्यामागे साथीला म्हणून झांज घेऊन उभा रहात असे. गोविंदरावांनीं डॉ. पटवर्धन यांना बेळगांवास कीर्तनें करण्यासाठीं बोलावून घेतलें. त्या काळीं त्यांच्याबरोबर विद्वद्रत्न पंडित दिनकरशास्त्री कानडेहि दौऱ्यावर येत असत. गोविंदरावांनीं डॉ. दत्तोपंत पटवर्धनांचीं बेळगांवच्या मारुतीच्या देवाल्यात तीन जाहीर कीर्तनें करविलीं व त्यांना बिदागी म्हणून तीनशें रुपये मिळवून दिले. अशा रीतीनें राष्ट्रीय कीर्तनकार म्हणून अयाचित वृत्तीनें मिळेल ती बिदागी स्वीकारून लोकजागृतीप्रीत्यर्थ कीर्तनें करीत फिरण्यासाठीं सन्नद्ध होण्याचा पटवर्धनबुवांचा विधि प्रथम बेळगांवांत गोविंदरावांच्या अध्वर्युत्वाखालीच झालेला आहे. ती प्रथा किंवा तें व्रत आज गेलीं पन्नास वर्षें अव्याहतपणें पटवर्धनबुवांनीं चालविलेलें आहे. तेव्हापासून आतांपर्यंत म्हणजे पुरीं पन्नास वर्षें डॉ. दत्तोपंत पटवर्धन प्रतिवर्षी बेळगावात एकदोनदा तरी येत राहिले आहेत. गोविंदराव हयात असेपर्यंत, डॉ. दत्तोपंत पटवर्धन यांच्या कीर्तनाचे कार्यक्रम व्यवस्थित होत असतात किंवा नाहीं, याकडे गोविंदरावाचें लक्ष असे.

लोकजागृतीसाठीं अमुक एक गोष्ट करणें किंवा होणें आवश्यक आहे असे एकदां गोविंदरावांच्या मनानें घेतलें म्हणजे त्यात, गीतेंत सांगितल्याप्रमाणें, 'सर्व भावेन' ते—आपण स्वतः, आपले सहकारी, आपले नातलग यांच्यासह—उडी घेत असत. त्याचें प्रत्यंतर या बाबतींतहि सर्वांच्या अनुभवास आलें.



प्रकरण नववें

# बेळगांवांतील हिंदूमुसलमानांचे दंगे

'फोडा आणि झोडा' हें इंग्रजी राज्यकर्त्यांचें एक आवडतें सूत्र आहे. आपली सत्ता गाजवण्यासाठीं आणि रुजवण्यासाठीं इंग्रजांनीं या तत्त्वाचा अंगीकार केलेला होता. 'हिंदू आणि मुसलमान या वेगळ्या जमाती आहेत, त्यांचे कायदे वेगळे आहेत. मुसलमान ही आपली आवडती राणी आहे' असे अनर्गळ प्रलाप काढावयासहि सत्ताधिकाऱ्यांना लाज वाटत नव्हती, एवढेंच नव्हे तर तो एक मुत्सद्दीपणाचाच भाग मानला जात होता. मुसलमानांनाहि यांत कधीं कमीपणा वाटला नाहीं उलट या इंग्रजी धोरणाच्या अनुनयाचेंच त्यांचें वर्तन असे. अधिकाऱ्यांच्या असल्या वागणुकीमुळें जो परिणाम व्हायचा तोच झाला. म्हणजे दोन्ही जमातींमध्यें एकमेकांविषयीं अविश्वास निर्माण झाला. चिढीची भावना उत्पन्न झाली. आणि महाराष्ट्रांत हिंदु-मुसलमान दंग्याचें मूळ रुजलें. एरवीं सन १८५७ पासून मुसलमान व हिंदू एकदिलानें वागलेले असूनहि त्यांच्यामध्यें या इंग्रजी नीतीनें वैरभाव उत्पन्न झाला. नाहींतर बेळगांवामध्यें मारिहाळचे इनामदार रा. खादीरसाहेब हे मारुतीच्या देवळाच्या पालखीचे पंच म्हणून एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकापर्यंत राहिले, ते राहते ना. हिंदुमुसलमान समाजांतील हा एकोपा इंग्रजांनीं बिघडवला, यांत शंका नाहीं. हिंदुमुसलमान-दंग्याचें मूळ कोठें आहे याचा ऊहापोह करण्याचें हें स्थळ नव्हे म्हणून त्याविषयींचे पुरावे व अदाज येथें देत नाहीं.

बेळगांवला दसऱ्याच्या सणाला 'श्री जोतीबा देवाची काठी' निघते. त्याला खडेबाजारांत 'श्री. अंबाबाई वाहन' येऊन मिळतें. मग ही मिरवणूक गणपत गल्लींतून खालीं उतरते. कोपऱ्यावर 'व्यंकटेश वाहन' त्यांत सामील होऊन तीं वाहनें मारुतीगल्लींतून वर चढतात. तेथें मारुतीच्या पालखीला घेऊन मिरवणूक नोगार वेशींतून पुढें सरकते. त्यानंतर हा मिरवणुकीचा लोंढा मिशन हायस्कूलच्या समोरून आज जेथे पहिल्या स्वातंत्र्ययुद्धांतील हुतात्मा श्रीमंत भावे यांचें स्मारक आहे त्या

खाल्च्या दक्षिण भागात येऊन शमीपूजनाचा विधि होतो. सीमोल्लंघनाचा शेवटचा भाग जो सोन्याची लूट, शस्त्रपूजन तोहोतो आणि आपल्या इष्टमित्राना, सग्यासोयऱ्याना दृष्टीचें आदानप्रदान होतें, व नतर जनसागर पागतो. मिरवणुकींत पैलवानी खेळ, लेजीम, दांडपट्टा वगैरे मर्दानी निदर्शनें आजच्याप्रमाणेंच तेव्हाहि होत असत.

दसऱ्याची ही मिरवणूक खडे ओलांडून गणपतगल्लींत शिरणार इतक्यात इस्लाम धर्मियानीं हिंदूवर हल्ला केला. उभय समाजात मारामारी सुरू झाली. कोणी दंगा पाहावयास तर कोणी दंगा करावयास लोक जमू लागले. एकवटलेल्या हिंदू समाजानें प्रतिकाराचा रामटोला हाणला. पोलीस आले, रस्ते रोखले; तोंपर्यंत दंग्याचें क्षेत्र बरेंच वाढलें होतें. या दंगलीमध्यें मुसल्मानाची पारच केविलवाणी स्थिति झाली. जरी प्रथम आगळीक त्यानीं केली असली तरी ते पूर्ण सुसघटित नव्हते. उलट मराठाच नव्हे तर अखिल हिंदुसमाज सख्येनें विपुल, दसऱ्याचा दिवस म्हणजे विजयसपादनाची एक पर्वणी अशा पूर्वापार रामायण-महाभारतकाळापासून चालत आलेला समेत, यामुळें अशा प्रसगीं त्यांच्यामध्यें पराक्रमाचे वारें सचारलें असल्यास नवल नाहीं. मुसल्मानाचा डाव त्याच्यावर उलटला. त्यात आठ जणाचे मुडदे पडले. अधिकाऱ्यानीं दंगखोराना सोडून हिंदूनाच धोपटण्यास सुरुवात केली. सोटावहादूर श्री. भीमराव पाटील व नाना जठार याना या दंग्याचे पुढारी ठरवून पकडून पोलीस ठाण्यावर नेले. खुनाचे आरोप ठेवून खटले भरले. परतु त्यातूनहि ते सहीसलामत निर्दोषी म्हणून सुटले. या दसऱ्याच्या दंगलीमुळें हिंदू जागे झाले. त्यानीं त्या वेळीं अस्तित्वात असलेल्या बेळगावातील सतरा गल्ल्याची एकजूट केली. या सर्व गल्ल्यातील म्होरक्याचे सरपच म्हणून श्री. भीमराव पाटील याची निवड झाली. हिंदूच्या या सघटनेमुळे नवरात्रोत्सव व गणपति-उत्सव अधिकच पोफावले! हिंदूचे हक्क व देवताचें सरक्षण उत्तम प्रकारें होऊ लागलें. ही आखणी गोविंदराव याळगी यांच्या सल्ल्यानुसार होत असे.

या दंग्याचा धसका येथील मुसल्मानानीं इतका घेतला कीं, येथील हिंदूसमाजा विरुद्ध हात उचलताना, प्रस्थापित सत्तेचें पाठबळ असलें तरी मुसल्मान पुढारी दहा वेळा विचार करू लागले. तो दरारा, ती धडकी मुसल्मान समाजाच्या उरांतून अद्यापिहि गेलेली नाहीं. या दंग्याच्या निमित्तानें एक मोठा असा फायदा झाला कीं, आपली कुवत किती आहे तें उभय समाजाना समजून व दिसून आलें मराठा समाजातील एक मूर्तिमत कार्यशक्ति असे भीमराव पाटील याना गगाधररावानी जवळ केलें. त्यानतर बहुतेक उत्सवाचें आणि सभाचें काम या पाटलाच्या व बाळकृष्णपत लाड याच्या सहकार्यानेंच तडीस नेलें जाऊ लागलें. 'माझी जीवनकथा' या आपल्या आत्मचरित्रामध्यें गगाधररावानीं याचा उल्लेख आत्मीयतेनें केला आहे. दे. भ. गोविंदराव याळगी याचीहि जोड मिळाल्यामुळें, या सर्वांनीं मिळून अनेक चळवळी

यशस्वी नेल्या आणि वेळगावचें मुख उज्ज्वल राखलें आहे. दंग्यातून जन्मलेल्या या सरदनेचें पुष्कळसें श्रेय गोविंदराव याळगी यांच्याकडेच जातें. सार्वजनिक कार्यांची माहिती मिळवणें, कार्याचा आराखडा तयार करणें, कोणाकडून कोणतें काम करवून घ्यावयाचें व या सर्वांचा दक्षतेनें व्याप सभाळणें गोविंदरावच करीत असत. कार्याची सांगता सर्वश्री भीमराव पाटील, दादा सावंत आणि बाळकृष्णपंत लाड यांच्याच देखरेखीखालीं होत असे. तरी या सर्वांचीं सूत्रें गोविंदरावांच्याच हातीं असत.

भीमराव पाटील यांच्याविषयीं गंगाधररावांनीं 'जीवनकथे'त लिहून ठेवलें आहे. त्यांच्या आत्मचरित्रांतील तेवढा उतारा वाचला तरी भीमराव पाटलांच्या गुणकर्तृत्वाची योग्य कल्पना येण्यासारखी आहे. वाचकांसाठीं तो उताराच त्यांच्यापुढें ठेवतों.—

> "मी वेळगावचा पाटील आहें. वेळगावच्या केवळ हिंदूंचा पाटील नाहीं. *सर्व जातींचे लोक माझे आहेत' असे ते अभिमानानें म्हणत असत. त्यांचा* डौल व एकंदर शरिराची ठेव बरीच रुबाबदार असे. त्यामुळें ते दुसऱ्यावर छाप पाडीत असत. त्यांचे शिक्षण फारसें नव्हतें. पण प्रसंगावधान व समयसूचकता हे गुण त्यांच्यामध्यें असल्यामुळें व बोलण्यांत एक प्रकारचा स्वाभिमान असल्यामुळें त्यांचे भाषण तेजस्वी होत असे. . . . हिंदुमुसलमानांच्या दंग्यापासून वेळगावचे हिंदू, मुसलमानांच्या मोहरमच्या उत्सवात भाग घेईनासे झाले. तेव्हापासून भीमरावाची हिंदू जातींत बरीच प्रतिष्ठा वाढली होती. भीमरावाचा उपयोग मला माझ्या पुढील कार्यांत अनेक प्रसंगीं झाला."

*—माझी जीवनकथा, पान ११*



प्रकरण दहावें

# लोकमान्यांची चतुःसूत्री आणि गोविंदराव

**स्वदेशीच्या प्रचाराची चळवळ :** स्वदेशीच्या प्रचारासाठीं गोविंदरावांनीं एक स्वदेशी दुकान सुरू केलें होतें. त्यात स्वदेशी स्टेशनरीहि ठेवण्यास प्रारंभ केला. त्यातच गाकाक्चीं रंगीत खेळणीं व लाकडी फळफळावळे ठेविलीं होतीं. सन १९०५ च्या कॉंग्रेस अधिवेशनास जातांना त्यातील काहीं निवडक माल आपल्याबरोबर नेऊन, कॅांग्रेसला जोडून भरलेल्या स्वदेशी प्रदर्शनामध्यें ठेवला होता. या गोष्टीचा उल्लेख मीं पूर्वी केलेलाच आहे. या स्वदेशी दुकानासाठींच गोविंदरावांनीं एक तरुण उत्साही मनुष्य श्री गोविंदराव अर्जुनवाडकर यांना मुद्दाम जवळ केलें होतें. श्री. गोविंदराव अर्जुनवाडकर याळगींच्या घरींच लहानाचे मोठे झाले. पुढे ते कुटुंबवत्सल झाल्यानंतरहि त्यांच्या कुटुंबातील सर्वच मंडळी याळगी कुटुंबामध्येंच राहात असत. हीं दोन्ही कुटुंबें इतकीं समरस व एकजीव झालेलीं होतीं कीं, नवख्या मनुष्याला त्यांच्यामधील मालक कोण व आश्रित कोण हें समजून येणेंच शक्य नव्हतें. याळगी कुटुंबात गोविंदराव अर्जुनवाडकरांना 'झा झा काका' म्हणत असत. हें स्वदेशी दुकान स. १९०८ पर्यंत ठीक चाललें होतें. या स्वदेशी दुकानांतून शहरातील मोठ्या व प्रतिष्ठित लोकांनीं जो माल उधार नेला होता ती बाकीच वसूल न होऊं शकल्यामुळें दुकान रोडावत जात जात अलभावाला पावलें.

या स्वदेशीच्या आदोलनाच्या काळात अशाच प्रकारें आदर्श किराणा मालाचें दुकान एका अन्य शहरामध्यें सुरू करण्यात आलें होतें त्याचें स्मरण प्रस्तुत लेखकास झाल्याशिवाय रहात नाहीं. त्यात बदाम, बेदाणा, खडीसाखर वगैरे जिन्नस दुकानाच्या उद्घाटनदिनापासूनच ठेवण्यात आले होते. या दुकानाच्या उद्घाटनप्रसंगीं जमलेल्या लोकांना प्रसाद म्हणून हेच जिन्नस मिसळ करुन वाटण्यात आले होते. 'स्वदेशी' दुकान शेअर्स खपवून, भाडवल उभारुन, त्या पुंजीवरच सुरू करण्यात आलें होतें. अशा प्रकारें तें 'स्वदेशी' दुकान सर्वांचेंच झालें असल्यामुळें सत्प्रवृत्तीचे

शेअरहोल्डर्स व त्याचे स्नेहीसोबती सायंकाळीं त्या दुकानाला भेट देत असत. हाताचा चेवड एक चाळा म्हणून तेथील खाद्य जिन्नस बदाम, बेदाणा, खोबरें, खडीसाखर, गूळ अशापैकीं हाताशीं असेल तो जिन्नस सहज तोंडात टाकीत. ते तेथें बसून असेतों तोंडात टाकणें चालू असे. हा बहुतेक शेअरहोल्डराचा नित्यक्रम असे. अशा मुत्सद्दीमुळें आणि थोर लोकांच्या उधारीमुळें त्या किराणा दुकानाचा अस्त झाला होता. याच मार्गानें बेळगावातील तें 'स्वदेशी' दुकान 'यद्गत्वा न निवर्तन्ते' अशा ठिकाणीं जाऊन पोहोंचलें. कॉंग्रेस अधिवेशनाला हजर राहाण्याची रूढी गोविंदराव याळगी आणि त्याचे मित्र तथा गंगाधरराव यानीं पाडली. गोविंदराव याळगींनीं त्यानिमित्तानें गावामध्यें सभा भरविण्याचा सपाटा चालविलाच होता. त्याचें 'स्वदेशीचें' दुकान बंद पडलें असलें तरी त्याच्या डोक्यातील स्वदेशीची हौस व खुमखुम अजून उतरली नव्हती. त्यासाठीं त्यानीं एक नवाच मार्ग चोखाळून पाहायचें ठरविलें.

गोविंदराव गंगाधरराव यानीं श्री. निलजकर याना जपानमध्यें कापड विणण्याची कला शिकून येण्यास पाठविलें. त्याच्या खर्चाची जबाबदारी गोविंदरावानींच आपल्या शिरावर घेतली. त्यासाठीं लोकांच्याकडूनहि काहीं मदत घेतली, व निलजकराच्या जपानमधील शिक्षणाची व्यवस्था करून दिली. त्या काळीं गोविंदरावाच्या मित्राचा अशा एक सचच संघटित झाला होता की, कोणतेहि काम निघो, तें सर्वानीं मिळून घडाडीनें करावयाचें आणि थोडीशी झीज सोसावी लागली तरी ते ओझें अंगावर घेऊन निभावून न्यावयाचें. ही सवय गोविंदरावानींच त्या सर्वांना लावून ठेवली होती. श्री. निलजकराचें जपानला जाणें हें केवळ मागाचें काम शिकून येण्यापुरतेंच नव्हतें, तर 'अन्य काहीं' म्हणजे बॉंब तयार करण्याची कला शिकून यावें असाहि एक हेतु त्यामागें होता. रुसो जपानी युद्ध त्याच सुमारास संपून जपाननें जय मिळवल्यामुळें लोकाच्या आशाआकांक्षा खूप वाढल्या होत्या. यात गु. गंगाधररावाचाहि हात होता. आधुनिक काळात पाश्चात्य राष्ट्रावर पौरस्त्याचा हा पहिला विजय होता. संधि मिळाल्यास, मागासलेलीं म्हणून मानण्यात आलेलीं पौर्वात्य राष्ट्रेंदेखील सुधारलेलीं म्हणून समजल्या जाणाऱ्या पाश्चिमात्य राष्ट्रावर युद्धात जय मिळवू शकतात, याचा प्रथमच अनुभव आल्यामुळें हिंदुस्थानातील लोकामध्यें एकप्रकारचा आत्मविश्वास उत्पन्न झाला होता. या आत्मविश्वासाच्या भावनेनें तेव्हापासून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या चळवळीला एक निराळेंच वळण लागलें असें मानता येईल.

**बेळगांवांतील शिवाजी-उत्सव आणि गणपति-उत्सव :** याच सुमारास लोकमान्यानीं शिवाजी-उत्सवाला प्रारंभ केला होता. या उत्सवात मान प्रथमपासूनच व्याख्यानें वगैरे करविली जात. बंगाल, पंजाब, महाराष्ट्र व विशेषतः पुणें येथे ज्या काहीं चळवळी होतील त्या सर्वांचे पडसाद बेळगावात उठत असत. एवढेंच नव्हे तर त्याच्या उगमस्थानापेक्षा कित्येक वेळीं अधिक उत्कटत्वानें व घडाडीनें त्या येथें प्रत्यक्षात

आणल्या जात असत. ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धन याच्या स्वदेशीवरील स्फूर्तिदायक गाण्याच्या बैठकी परिणामकारक होत असत. दत्तोपंत पटवर्धनांची ती भव्यमूर्ति, त्यांचा तो खडा पहाडी आवाज, भावनापूर्ण देशभक्तीनें ओथंबलेलीं गोड पदें आणि तीं तन्मयतेनें गाण्याची शैली यामुळें त्यांचें गाणें ऐकताच लोकांच्या अंगात चैतन्य संचारत असे. त्यांच्या असल्या परिणामकारक जाहीर कार्यक्रमांना सरकारनें बंदी घातल्यानंतर ते कार्यक्रम खाजगी रीतीनें होऊं लागले. अशाच एका प्रसंगीं गोविंदरावांच्या घरीं शिवाजी उत्सव होऊन कै. वीर वामनराव जोशी यांचें व्याख्यान झालेलें प्रस्तुत लेखकानें ऐकलें आहे. पुढें या शिवाजी उत्सवाला मोठें स्वरूप प्राप्त होऊन तो प्रचंड प्रमाणांत सार्वजनिक रीत्या होऊं लागला व अद्यापिहि तो होत असतो. याच कार्यक्रमाच्या गर्दीमध्यें लोकमान्यांनीं गणपति उत्सवहि जाहीर रीतीनें करण्याचा प्रचार केला. या दोन्ही उत्सवांना लोकमान्यांनीं आणि खाडिलकरांनीं 'केसरी' साप्ताहिकांतून लेख लिहून आध्यात्मिक व राजकीय बैठक दिली. या उत्सवांना राष्ट्रीय उत्थानाच्या किंवा जागृतीच्या दृष्टीनें किती महत्त्व आहे याची कल्पना सामान्य जनतेपेक्षांहि ब्रिटिश सरकारला अधिक स्पष्टपणें आलेली होती. या असल्या चेतावणीच्या उपक्रमांना आळा घालणें सरकारलाहि सोपें नव्हतें. दडपशाहीमुळें कित्येक वेळीं चळवळ फोफावतच जाते याकडेहि देशभक्तांचें व सरकारचें दोघांचहि लक्ष होतें. भारतभर अनेक प्रांतांतून गणपति उत्सवाचीं पाळेंमुळें अधिकाधिक खोल जाऊं लागलीं. राजकीय दृष्टिकोनांतून सर्वच चळवळींकडे पाहणाऱ्या कार्यकर्त्यांनीं या दोन्ही उत्सवांचा उपयोग लोकजागृतीकडे करून घेण्यास मनापासून प्रारंभ केला. गणपति उत्सवामध्यें समग्र महाराष्ट्रभर लोकमान्यांचे दौरे होण्यास सुरुवात झाली होती. अशा लोकजागृतीला व राष्ट्रीय उत्थानाला पोषक ठरणाऱ्या या उत्सवाचें लोण बेळगावास येण्यास विलंब लागला नाहीं.

बेळगाव-शहापूरमध्यें लोक आपापल्या गल्लींचे स्वतंत्र जाहीर गणपति उत्सव करूं लागले. त्या उत्सवांत गणपतीपुढें भाषणें देण्यासाठीं मुंबई-पुणें-नागपूर-वऱ्हाडमधील नामवंत पुढाऱ्यांचें बेळगावांत आगमन घडवून आणून त्यांचीं व्याख्यानें करविण्याचें काम गोविंदराव व गंगाधरराव करीत होते. त्यापैकीं कांहीं पुढाऱ्यांचे दौरे पुढें कर्नाटकामध्यें गदगपर्यंतहि होऊं लागले. गंगाधररावहि त्या वेळेपासूनच अशा पुढाऱ्यांबरोबर कर्नाटकभर दौऱ्यावर जाऊं लागले. अनंतचतुर्दशीच्या दिवशीं या सर्व सार्वजनिक गणपतींची मिरवणूक निघत असे. त्या मिरवणुकीचे सूत्रचालक गोविंदराव असत. मिरवणुकीचे रस्ते सरकारकडून आगाऊ मंजूर करविले जात असत. ही मिरवणूक मारुतीच्या देवळापासून निघून राममंदिरावरून खडेबाजाराकडे वळण घेऊन गणपति गल्लींत उतरत असे व पुढें व्यंकटेशाच्या देवळावरून कपिलेश्वराकडे जाऊन तेथें गणपतिविसर्जन होई. ही मिरवणूक केव्हां एकदा कपिलेश्वरावर

पोंचते व आपण केव्हा एकदा या दगदगींतून मोकळे होतों असें पोलीस अधिकाऱ्यांना होऊन जात असे. पोलीस अधिकारी घोड्यावरून या गर्दीमधून फिरत असत. मिरवणुकींतील अनेक गणपतीपुढें त्या त्या गल्लींतील लेझीम पथकें, टाळपट्टा पथकें, गाड्यावरील मल्लखांब, चाबूकस्वाराचे बारीक वादीच्या आवाजाचे चकाटे, करडी ढोल, वाजत्रीं, दिमडी इ. कार्यक्रम चालत असत. त्यामुळें गणपतीच्या गाड्या पोलिसांना वारंवार हलवाव्या लागत. एवढी मोठी प्रचंड मिरवणूक एका विशिष्ट रस्त्याला लागल्यानंतर तिला फिरवणें जवळजवळ अशक्यच असतें. मिरवणुकीला विलंब होत आहे या सबबीवर पोलीस अधिकारी ठरलेल्या रस्त्यापासून फुटलेल्या मधल्याच रस्त्यानें मिरवणुकीचें तोंड वळविण्याचा प्रयत्न करीत असत. तसें न व्हावें म्हणून हातात एक वेताची छोटी छडी घेऊन असे रस्ते फुटण्याच्या ठिकाणीं आगाऊ जाऊन गोविंदराव उभे राहात असत. एका पोलीस अधिकाऱ्यानें गोविंदरावांचा डोळा चुकवून मिरवणुकीचें तोंड असेंच एका मधल्या रस्त्याकडे वळविलें. हें पाहताच गोविंदरावांनीं त्या तेवढ्याच भागाला मिरवणुकीपासून वेगळें जाऊं देऊन बाकीची मिरवणूक ठरलेल्या रस्त्यानें नेरविली. मधल्या रस्त्यानें चाललेल्या त्या भागाला दुसऱ्या बाजूनें पुन्हा मिरवणुकीच्या आघाडीला म्हणजे त्याच्या पूर्वीच्या जागेला आणून उभें केलें. पोलीस अधिकारी व गोविंदराव यांची झालेली ही झगपट प्रस्तुत लेखकानें पाहिली आहे व त्यात त्यानें भागहि घेतलेला आहे. या मिरवणुकीमध्यें हरिजनांच्या गणपतीला अग्रमान देण्यास गोविंदराव कधींच विसरत नसत. तीच प्रथा आजहि चालू आहे. त्या काळीं सार्वजनिक गणपति-उत्सवाची प्रथा गोविंदराव व गंगाधरराव यांनीं जी एकदा घालून दिली ती आजतागायत चालू आहे. शेवटीं कपिलेश्वराच्या तीर्थामध्यें गणपतीचें विसर्जन होत असतां गंगाधरराव व इतर पुढाऱ्यांचीं भाषणें त्या ठिकाणीं होत असत.

**गोविंदरावांची दूरदृष्टि :** बेळगाव म्युनिसिपालिटीच्या स. १९०७ च्या निवडणुकीसाठीं आपल्या वॉर्डमधील कांहीं प्रतिष्ठित मडळींच्या विचारानें उमेदवार म्हणून उभे राहण्याचें गोविंदरावांनीं ठरविलें होतें. त्या निवडणुकींत प्रतिस्पर्धी उमेदवार म्हणून श्री. वैजाप्पा अनगोळ उभे होते. त्या वेळीं निवडणुकीची पद्धत वेगळीच होती. उमेदवारांनीं खुर्च्यांवर बसून राहावयाचें आणि मतदारानें येऊन मतनोंदणी अधिकाऱ्याला 'मी अमुक गृहस्थास मत देतों' असें सांगावयाचें, अशी रीत त्या वेळीं होती. त्याप्रमाणें मतदान सुरू झालें. अशिक्षित मतदार आपल्या वचनाला जागून मत देऊन जात असत. सकाळीं दहा वाजण्याचे सुमारास एक प्रतिष्ठित मतदार दामुअण्णा वैद्य मत देण्यास आले, आणि सरळ श्री. वैजाप्पा यांना मत देऊन गेले. त्या वैद्यांनींच गोविंदरावांना निवडणुकीस उभे रहाण्याचा सल्ला व प्रोत्साहन दिलें होतें. एवढेच नव्हे तर मदत करण्याचेंहि आश्वासन दिलें होतें. या घटनेमुळें

गोविंदरावाना फारच वाईट वाटलें आणि तावडतोब सदर निवडणुकींतून आपलें अग त्यानीं काढून घेतलें. या घटनेपासून त्यानीं योग्य तो धडा घेतला.

'ज्यांना आपण अशिक्षित समजतो त्यांच्यामध्ये सुशिक्षितांपेक्षा नीतिमत्ता अधिक असते. आणि सेवेनें त्याचा पाठिंबा मिळवणें आवश्यक असतें' असा निष्कर्ष गोविंदरावानीं काढला. त्या मार्गाला ते लागले. आणि पुढील निवडणुकीमध्यें सहज्पणें ते निवडूनहि आले. गोविंदरावानीं पुढे सुमारें बारा वर्षें निवडणूक जिंकून त्यानीं नगरपालिकेंत कामें केलीं. सन १९१७–१८ सालीं जेव्हा ब्राह्मणेतर चळवळीचें वारें बेळगावपर्यंत येऊन पोहोंचलें आणि एका अर्थी राजकीय दृष्टीनें त्या पक्षाच्या पुढाऱ्यांचे संबंध किंचित् दुरावल्यासारखे झालेले असले तरी वैयक्तिक स्नेहाला अखेरपर्यंत बाध आला नाहीं, व त्यानीं येऊ दिलाहि नाहीं. त्यामुळें गोविंदरावाना बेळगावात उत्तम समाजसेवा करता आली.

एखाद्या छोट्याशा विशिष्ट घटनेवरून समाजाची अचूक नाडीपरीक्षा करणें व सामाजिक दृष्ट्या त्याचा विचार करणें, त्या विचाराला अनुसरून आपल्या ध्येयधोरणात बदल करणें, आपली राहणीकरणी आणि विचारसरणी संस्कारित करवून घेणें व त्याप्रमाणें वागणें हा सैद्धांतिक जीवनाचा एक महत्त्वाचा भाग असतो. गोविंदरावाच्या जीवनात त्याचा प्रत्यय पदोपदीं येतो. आपलें व आपल्या आजूबाजूचें जीवन अंगीकृत कार्यात होमून टाकणें हा त्यांच्या जीवनाचा स्थायीभाव आहे. त्यांच्या जीवनातील अनेक लहानथोर मामुली अगर महत्त्वाच्या राजकीय व सामाजिक सेवेमध्यें त्यांच्या स्वभावातील हा स्थायीभाव उपयोगी पडलेला आहे.

**धंदा आणि प्रपंच :** गोविंदरावानीं स. १९१० नंतर आपल्या धंद्यामध्यें विशेष लक्ष घातलें. त्यापूर्वी काढलेलें 'स्वदेशी स्टेशनरी दुकान' अनेक कारणामुळें बंद करावें लागलें. मुख्यतः समाजातील शिष्ट समजल्या जाणाऱ्या लोकाकडून उधार नेलेल्या मालाच्या पैशाची वसुली वक्तशीर न झाल्यामुळें दुकान गुंडाळावें लागलें होतें. त्या दुकानाचा व्यवहार पहाण्यासाठीं ज्याना मुद्दाम गुंतवलें होतें ते श्री. गोविंदराव अर्जुनवाडकर–अर्थात् 'देशी गोविंदराव' याना आता सराफी दुकानात घेतलें. श्री. कृष्णराव घरच्या शेतीकडे लक्ष पुरवून फावला वेळ या सराफी दुकानाकडेच देत असत. दुकानाच्या वाढीबरोबरच त्याची जबाबदारीहि वाढली होती. त्यामुळें देखील धंद्याकडे विशेष लक्ष देण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. याळगींचे सराफी दुकान पूर्वीच्या जागेवरून हलवून नास्त्यावरील नवीन जागत आणविलें होतें. केवळ सोन्याचांदीच्या व्यवहारानें सराफीच्या धंद्याची वाढ व भरभराट होण्यासारखी नव्हती. जडजवाहिराचा व्यापार वाढविणें जरूर होतें. हातीं घेतलेल्या या धंद्यात प्रगति व्हावी या उद्देशानें मुंबईच्या मोतीबाजारातील दलाल व व्यापारी मंडळीं शीं गोविंदरावानीं संबंध जोडले. जवाहिराच्या व्यापारामध्यें फ्रान्सची राजधानी 'पॅरिस' शहर त्या काळीं जगप्रसिद्ध व

नावाजलेलें होतें. तेथील बाजारात कोणत्या मालाला उत्तम भाव येतो हें शिकून घेणें आणि भिन्नभिन्न देशातून येणाऱ्या जवाहिराची पारख व त्याचे भाव समजणें जरुरीचें असल्यामुळें गोविंदरावानीं आपले कनिष्ठ बंधु श्री. जीवनराव याना पॅरिसला पाठविण्याचें योजिलें! त्यासाठीं त्याच्या फ्रेंच शिक्षणाची व्यवस्था श्री. नानासाहेब सोमण याच्यावर सोपविण्यात आली. याच सुमारास युरोपमध्यें युद्ध सुरू झाल्यामुळें श्री. जीवनराव याना फ्रान्समध्यें जाता आलें नाहीं. ते शिक्षणार्थ फ्रान्समध्यें जाऊ शकले असते तर याळगींच्या घराण्याच्या इतिहासात महत्त्वाची भर पडली असती! असें म्हणतात कीं, स. १९०९ ते १९१२ पर्यंत सराफी दुकानात बसून त्या धंद्यामध्यें गोविंदरावानीं जें कमावलें होतें तें त्याना दोनचार पिढ्या पुरलें असतें. परन्तु ही सारी मिळकत त्यानीं ऐष आरामात बसून चैनींत खर्चण्यापेक्षा देशसेवेंतच वेचली हें विशेष होय.

एका अकल्पित गोष्टीमध्ये गोविंदरावाना भाग घ्यावा लागल्यामुळें, पुनः आपल्या सराफी धंद्याकडे किंवा आपल्या प्रपंचाकडे त्याना लक्षच देता आलें नाहीं. ती गोष्ट म्हणजे त्याचे स्नेही श्री. हणमंतराव देशपांडे याचे मेहुणे श्री. हरिनाना मान्नुद्री याचेवरील खुनी खटला होय. मे १९१३ ते जून १९१४ पर्यंत हें प्रकरण बेळगावमध्यें बरेंच गाजलें. त्याची हकीगत पुढें यथाकाल येणारच आहे.

गोविंदरावाना घरगुती कामाकडे, आपल्या प्रपंचाकडे व सराफी दुकानाकडे लक्ष देण्यास अशा रीतीनें थोडी सवड मिळाली. आळस ही चीज त्याच्या रक्तात किंवा स्वभावातच नव्हती. दुकानाचे हिशोब लिहिण्याचें काम बरेंच रेंगाळत जाऊन तें मागें मागें पडत चाललें होतें. त्यासाठीं एखादा कारकून नोकरीवर घेऊन तें काम संपवावें, हें गोविंदरावाना पसंत नव्हतें. 'समर्थ विद्यालय' बंद झाल्यानंतर श्री. जीवनरावाना दुसऱ्या कोणत्याहि सरकारी शाळेंत प्रवेश मिळाला नाहीं. श्री. गंगाधररावाच्याकडे मराठी शिकण्यासाठीं जीवनरावाना रोज एक तास पाठविलें जात असे. हें शिक्षण एक वर्षपर्यंत झालें. मग गोविंदरावानीं जीवनरावाना आपल्या हाताखालीं घेतलें. रोज रात्री जेवणानंतर जीवनराव घरींच रोजकीर्द लिहून ठेवीत आणि गोविंदराव पहाटे लवकर उठून त्यावरून खतावणी तयार करीत. कामातील या नियमितपणामुळें दुकानाचे हिशोब अद्ययावत् तयार राहूं लागले आणि रोजचे व्यवहार, हिशोब पक्के लिहिताना पुनः एकदा जीवनराव-गोविंदराव याच्या नजरेखालून जाऊं लागले. त्यामुळें भूलचूक राहत नसे आणि व्यवहारात आपण काटेकोर आहोंत याचीहि याळगींमधूना ठाम कल्पना येत असे. गोविंदरावाच्या हाताखालीं असें एक वर्ष काढल्यानंतर जीवनरावानाहि धंद्यात गोडी उत्पन्न झाली आणि आपल्या व्यवहाराचा व्याप आपण वाढवला पाहिजे असें त्यानाहि वाटूं लागलें.

**राष्ट्रीय शिक्षण आणि बेळगांव :** चतुःसूत्रीपैकीं राष्ट्रीय शिक्षणाच्या प्रचाराच्या दृष्टीनें गोविंदराव-गंगाधररावाच्या हालचाली प्रत्यक्षांत दिसूं लागल्या

होत्या. 'गणेश विद्यालय' नावाची एक शाळा बेळगावांत स्थापन करण्यात आली होती. प्रथम कांहीं दिवस हें विद्यालय भाटे यांच्या घरींच चालू होतें. पुढें त्याची जागा बदलण्यात आली. या विद्यालयात पू. श्री. काकासाहेब कालेलकर, दीक्षित, नागपूरकर, वगैरे लोक शिक्षक म्हणून काम करीत होते. क्रांतिकारक दलामध्यें काकासाहेब कालेलकर प्रविष्ट झाल्यानंतर या गणेश विद्यालयात सेवा करण्यापासूनच त्यांच्या देशसेवेला खरा प्रारंभ झालेला आहे. या विद्यालयामुळेंच त्यांचा 'राष्ट्रमत' दैनिकामध्यें प्रवेश होऊन त्यांना संपादकीय वर्गांत एक जागा मिळू शकली. लोकमान्य बेळगावांत येऊन गेल्यानंतर इंग्रजी सहाव्या व सातव्या इयत्तेंतील विद्यार्थ्यांसाठीं गंगाधररावांनीं एक वर्ग काढला होता. त्यांत ७१ ते १०० विद्यार्थी येत असत. या वर्गांत मॅझिनीचें चरित्र आणि त्याच्या लेखांतील निवडक उतारे गु. गंगाधरराव मुलांना शिकवीत असत. विद्यार्थ्यांच्या हायस्कूलमधील ठराविक अभ्यासाशीं या वर्गाचा कांहींहि संबंध नव्हता. मुलांच्या शालेय शिक्षणापेक्षा त्यांच्याशीं आपला संबंध यावा, आपले विचार त्यांना कळावेत, आणि आपल्या देशांतील वर्तमान परिस्थिति त्यांना कळावी व समजून सांगावी व त्यांच्या विचारालाहि दिशा लागावी हाच हा वर्ग चालविण्यांतील त्यांचा उद्देश होता. या वर्गामुळें कांहीं विद्यार्थी गोविंदराव व गंगाधरराव यांच्या नादीं लागले होते. वारंवार होणाऱ्या सभामध्यें व इतर सार्वजनिक कामामध्यें या विद्यार्थ्यांचा फार उपयोग होत असे. विद्यार्थ्यांना कोणतेंहि काम करावयाचें म्हणजे लहानमोठें किंवा हलकें महत्त्वाचें हा भेद वाटत नाहीं. त्यांच्या वयाचें तें एक वैशिष्ट्यच असतें. त्या काळीं 'तरुण संघ' किंवा 'स्वयंसेवक दल' यासारख्या संस्था अद्यापि निघण्यास प्रारंभहि झाला नव्हता. म्हणून अशा होतकरू विद्यार्थ्यांना हाताशीं घ्यावें लागत असे. यांतूनच अनेक माणिकमोत्यें व रत्नें उत्पन्न झालीं आहेत.

या वेळीं गोविंदरावाचे कनिष्ठ बंधु जीवनराव हे त्यांच्या घराण्यांपैकीं एकटेच हायस्कूलमध्यें शिक्षण घेत होते. गोविंदरावांनीं जीवनरावांना शाळा सोडण्यास सांगून कोल्हापूर येथील 'समर्थ विद्यालयांत' पाठविलें. स्वतः राष्ट्रीय शिक्षणाचा हिरीरीनें प्रचार करीत असतांच आपलीं मुलें सरकारी हायस्कुलांत व पुढे सरकारी कॉलेजांत व क्रियेशाच्या बाबतींत पुढे इंग्लंड–अमेरिकेंत पाठवूनहि त्यांना सर्वश्रेष्ठ उच्च शिक्षण देऊन आणण्याची कला अद्यापि रूढ व्हावयाची होती. आपला मुलगा नॅशनलमध्यें शिक्षण घेण्यास गेल्यामुळें 'गांधीसेवा संघातून' लागलीच राजीनामा देणारे दे. भ. बाबासाहेब सोमण यांच्यासारखी तत्त्वनिष्ठ मंडळी समाजाचे मार्गदर्शक म्हणून त्या काळीं वावरत होती. या सर्व गोष्टी गणपति-उत्सवाच्या मेळ्यांतील पदांतून व्यक्त होत असल्यामुळें मेळ्याचे कार्यक्रम सर्व गणपति उत्सवांतील मूर्तींपुढें होत असत. कांहीं हौशी श्रीमंत लोक या मेळ्यांना आपल्या घरीं बोलावून त्यांचे कार्यक्रम करवीत असत. मेळ्यांतील विद्यार्थ्यांना थोडें फराळाचें किंवा मोदक देऊनहि काम भागत असे. कांहीं लोक

त्याना आर्थिक मदतहि करीत. शिवाजीमहाराजाच्या उत्सवाला देखील राष्ट्रीय शिक्षणाचें स्वरूप आलें होतें. त्यामुळें मराठ्याचा उज्ज्वल इतिहास तरुण पिढीपुढें ठेविला जाऊं लागला.

कोल्हापुराहून 'समर्थ विद्यालया'ला मिरजेंत यावें लागलें. मिरजेस कृष्णा नदीच्या तटावर असलेला मिरजकराचा भव्य बंगला मिरजेचे राजेसाहेब श्रीमंत बाळासाहेब यानीं दिलेला होता. पुढें तळेगावला जागा मिळाल्यानंतर 'समर्थ विद्यालय' मिरजेहून तळेगावला नेण्यात आलें.

राष्ट्रीय शिक्षणाच्या आंदोलनाचें पुढारीपण स्वीकारताना गोविंदरावानीं प्रथम आपला बंधु सरकारी शाळेमध्यें शिकत होता त्याला तेथून काढून 'समर्थ विद्यालयात' पाठविला. ही गोष्ट गोविंदरावाना आपल्या स्वत:वरील जबाबदारीची जाणीव किती होती आणि त्याची तत्त्वनिष्ठा किती उज्ज्वल व भक्कम पायावर ठाण माडून होती या गोष्टीवर चागला प्रकाश पाडते.

लो. टिळकाना राजद्रोहाच्या खटल्यामध्यें सहा वर्षाची शिक्षा झाल्यानंतर जी भयंकर दडपशाही झाली त्यात अण्णासाहेब विजापूरकर, वामन मल्हार जोशी, गगपतराव मोडक याना कोल्हापूरला शिक्षा झाल्या. पुढें वर्ष दीडवर्ष आद्य लोक शिक्षणकार प्रो. जनार्दन विनायक ओक, भाईसाहेब कोतवाल आणि पूर्वीचे तात्यासाहेब करंदीकर, रा दा. सरदेसाई यानीं राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य चालविले होतें. पण स. १९१० साली सरकारच्या रोषाला हें विद्यालय बळी पडल्यामुळें कायमचें बंद झालें. तो काळच असा होता की, ब्रिटिश सरकारला जिकडे तिकडे गुप्त, प्रच्छन्न क्रातिकारकच दिसत होते व असल्या संशयानें पछाडल्यामुळे दडपशाहीचा वरवंटा सरकारनें सररास सुरू केला होता.

**नवीन पद्धतीचे आखाडे :**—बेळगावात आखाडे नव्हते असें नाहीं. होते, पण जुन्या पद्धतीचे. एका लहानशा तालीमध्यें एक कुस्तीचा हौद्दा अगर खड्डा असावयाचे. त्यातच व्यायाम घेणें, कुस्ती करणें वगैरे चालत असे. एका लहानशा खिडकीवजा दरवाजातून त्या कुस्तीच्या खड्ड्यात उतरावयाचें. आखाड्यामध्यें कुस्ती खेळण्याकडेच विशेष भर दिला जात असे. हवा आणि उजेड याचें या आखाड्याशीं बहुधा पटत नसावें. जो दिव्याचा मद उजेड मिळेल तेवढाच. पण गोविंदरावानीं जे नवीन तऱ्हेचे आखाडे स्थापण्याचा उपक्रम केला त्यात लाठीकाठी, दाडपट्टा, बोथाटी, खेळले जाऊं लागले. गावातील बहुतेक आखाड्यानीं ही नवीन दृष्टि स्वीकारल्यासार खीच होती. त्याच्या शिक्षणासाठी पगारी तज्ज्ञ बाहेरून बोलावण्यात आले होते या सर्व भानगडीमध्यें येणारा खर्च गोविंदरावानाच करावा लागलेला आहे.

काठी लाठी बोथाटी व दाडपट्टा या खेळाचें शिक्षण तरुणाना देत राहण्याचा छंद गोविंदरावाच्या मनात शेवटपर्यंत होता. गोविंदरावाची मातोश्री निवर्तल्यानतर,

याळगी कुद्रुन गावापासून दोन मैल अंतरावर असलेल्या एका बंगल्यामध्यें येऊन राहिले होते. गोविंदरावांचे स्नेही शामराव कालकुंद्रीकर यांचाच तो बंगला होता. त्या बंगल्याचे शेजारींच एक लहानशी टेकडी—लक्ष्मी टेकडी—व त्या टेकडीच्या पायथ्याला एक तलाव बांधलेला होता. मिरजेस 'समर्थ विद्यालयात' असताना याळगी बंधूंपैकी सर्वात लहान जीवनराव यानें कृष्णा नदीमध्यें पोहणें शिकून घेतले होतें. गोविंदरावाचे बंधु कृष्णराव व कांहीं स्नेहीमंडळी यानीं पोहण्याची कला यापूर्वींच शिकून घेतली. सन १९०६ मध्यें खेड्यातील एका विहिरींत याळगी बंधु पोहावयास शिकत असताना पहिल्या दिवशींच गोविंदरावाना जो अनुभव आला, त्या अनुभवानंतर त्यानीं पोहण्याचें नावच सोडून दिलें. या लक्ष्मी टेकडीजवळील बंगल्याच्या आसपास लोकवस्ती बिलकूल नव्हती. गोविंदरावानीं आपल्या या घराला एका शिबिराचेंच स्वरूप दिलें. आपले मित्र, बाहेरचे अन्य कांहीं तरुण आणि आपल्या घरची मुलें या सर्वांना लाठीकाठी-बोथाटी दाडपट्टा यांचें शिक्षण देवविण्यास त्यानीं प्रारंभ केला. तेवढ्यासाठीं एक मुसलमान वस्तादहि तेथें आणून ठेवला. तरुणाच्या मनातील भीति मोडावी म्हणून त्याना आळीपाळीनें रात्रीं १० ते पहाटे ६ पर्यंत बंगल्याभोंवतीं पहारा देण्याचेंहि शिकविलें. त्या वस्तादाच्या हाताखालीं लाटीकाठी बोथाटी याचें शिक्षण घेऊन बरेच तरुण तयार झाले होते.

याळगींचें सख्य कुटुंबच तेथें रहात असल्यामुळें व गावापासून दूर दोन मैलावर तें ठिकाण असल्यामुळें सरकारचें लक्ष तेथें काय चालत होतें, याकडे गेलेंच नाहीं. नाहींतर तेंहि सरकारच्या डोळ्यावर आलें असतें व त्यानीं तें चालूहि दिलें नसतें. मिलिटरी कॅपमध्यें जें व जसलें शिक्षण दिले जात असे व जो अनुभव तरुणाना मिळत असे तो लाभ आपल्या तरुणाना घेता यावा हीच धडपड या एका अर्थी घरगुती कॅप किंवा शिबिरात चालत असे. असला कॅप काढतो म्हटलें तरी सरकारनें तो चालू दिला नसता आणि गोविंदरावाचा संबंध त्यात आहे, असें दिसून आले असतें तर तो अंकुर मुळातच सरकारनें खुडून टाकला असता.

**बहिष्काराचें सूत्र** : बहिष्कारसूत्राच्या प्रसाराचीहि सघटना प्रभावी करण्याची शिकस्त गोविंदरावानीं केली होती. 'बहिष्कार' या विषयावर वारंवार संधि मिळेल तेव्हा गंगाधररावाचीं जाहीर व्याख्यानें बेळगाव व शहापूर गावच्या गल्लीगल्लीमधून करविण्याचा सपाटा गोविंदरावानीं चालविला होता. परदेशी साखर व परदेशी कपडा या दोन वस्तूंचा बहिष्कार विशेषतः अभिप्रेत होता. या बहिष्काराच्या प्रचाराचाहि फायदा घेण्यास कांहीं व्यापाऱ्यानीं कमी केलें नाहीं. साखरेलाच गुळाचें पाणी मारून ती साखर स्वदेशी म्हणून विकली जाऊं लागली होती या बहिष्कारानें परदेशी मालाला कांहीं विशेष टोला बसण्यासारखा नसला तरी त्यायोगें जनतेमध्यें जें नैतिक बळ उत्पन्न होत होतें, त्याचें महत्त्व विशेष होतें. आणि ब्रिटिश सरकाराला तीच

गोष्ट नको होती. राष्ट्रामध्यें एकप्रकारचें चैतन्य उत्पन्न होऊन तें या योगें वृद्धि पावत होतें. त्या काळचा मवाळ–जहालाचा तटाहि या चतुःसूत्रीच्या प्रचाराभोंवतीं अनुकूल प्रतिकूल पिंगा घालून आपली शक्ति व समाजावरील प्रभाव दोन्ही पक्ष अजमावीत असत. मवाळ–विचारसरणीचा प्रचार करीत राहणारे एकदोन वक्ते बेळगाव शहरात होते. हा मवाळ–जहालाचा तटा वादविण्यामध्यें व वारसा धुमसत राखण्यामध्यें ब्रिटिश सरकारचाहि हात होता, हें सर्वश्रुत होतें. बेळगाव शहापूरची जनता जागृत झालेली असल्याचें वृत्त बाहेरच्या प्रांतांतील वक्त्यानाहि माहीत झालें असल्यामुळें, बाहेरचे जहाल वक्तेहि बेळगावात येऊ लागले होते. अर्थात् मवाळ विचारप्रणालीचे पुरस्कर्ते पुढारी बेळगावातील मवाळबंधूकडून व्याख्यानार्थ बोलावले जाऊ लागले होते. बेळगावमध्यें गंगाधररावाचें 'अस्तित्व' असल्यामुळें बहुतेकाचे दौरे बेळगावमध्येंच अलभावाला पावत असत. मिवानरी पुढाऱ्याचे दौरे बेळगाव जिल्ह्यामध्यें जाऊच शकले नाहींत. लोकमान्याच्या आक्रमक चळवळीला पायबंद घालण्यासाठीं व होमरूल लीगच्या चळवळीला विरोध करण्यासाठीं ना. शास्त्री यानीं कर्नाटकभर दौरा काढण्याचें ठरविलें होतें; परतु बेळगावमध्यें गंगाधररावानीं त्याना त्याच्याच सभेमध्यें भाषण करून विरोध केल्यामुळें आणि कर्नाटकभर याचीच सुधारून वाढविलेली आवृत्ति होत राहणार याची जाणीव श्री. ना. शास्त्री याना झाल्यामुळें त्यानीं आपला कर्नाटकचा दौरा स्थगित केला. तो पुनः कधीं झालाच नाहीं. पुढें गांधीजींच्या विचारप्रणालीला विरोध करण्यासाठीं पुण्याच्या काहीं पुढाऱ्यानीं बेळगाव वेंगुर्ले-रत्नागिरी भागात काढलेला दौरा बेळगाव पर्यंत आल्यानंतर तथेंच विराम पावला. बहिष्काराच्या प्रचाराला पायबंद घालण्याच्या कामीं मवाळ पक्षाला बेळगावात कधींच यश लाभलेलें नाहीं. एवढेंच नव्हे तर त्या प्रयत्नात मवाळ पक्षाचा बेळगावच्या जनतेवरील प्रभाव संपुष्टात आला. श्री. मोरोपंत मराठे वकील व श्री. नाईक वकील यानीं मवाळ पक्षाची बाजू उजळून धरण्याचें कंकण आपल्या हातीं बांधलें होतें. या कामीं त्या दोघानाहि मुळींच यश लाभू शकलें नाहीं. श्री. मोरोपंत यानीं तर तेवढ्यासाठीं एक मराठी साप्ताहिक 'चैतन्य'देखील सुरू केलें होतें. कोण याहि सभेत एकाकी उठून बोलण्यास ते कधींच कचरत नसत. गंगाधरराव गोविंदरावानीं ज्या जिल्हा परिषदा भरविल्या होत्या त्यामध्यें एकाकी जाऊन त्यात बोलण्याचा प्रयत्न मोरोपंत शेवटपर्यंत करीत राहिले होते. बरीच व्यक्तिगत झीज सोसल्यानंतर त्याना आपलें 'चैतन्य' पत्र बंद करावें लागलें. श्री. मोरोपंतानीं आपल्याला किती तरी कटु अनुभव आल्यानंतरहि आपला कधीं पराजय मानला नाहीं. अर्थात् पुढें पुढें त्याचें व्याख्यान म्हणजे जनता एक 'विनोद'च मानू लागली होती. श्री. नाईक वकील आपली 'मवाळ पक्ष भक्ति' इतक्या थराला कधींच जाऊ देत नसत



प्रकरण अकरावें

# लोकमान्याचा दौरा

45927

पुण्यामध्यें स. १८९४ सालीं हिंदु-मुसलमान समाजामध्यें तेढ उत्पन्न होऊन दंगे झाल्यानंतर हिंदूंनीं गणपतीचा उत्सव सार्वजनिक रीतीनें आचरण्याची किंवा साजरा करण्याची पद्धत घातली. यांत लोकमान्य टिळकांनीं पुढाकार घेतला होता, एवढेंच नव्हे तर याच्या बुडाशीं टिळकच होते. त्या सालच्या हिंदु मुसलमान तंट्यामध्यें खुनापर्यंत गोष्टी जाऊन कांहीं हिंदूंवर खटलेहि भरण्यांत आले होते, त्यामुळें त्या सालच्या गणपति-उत्सवास पुण्यामध्यें बराच जोर चढला होता. पुण्याचें उदाहरण पाहून मुंबईस व महाराष्ट्रांतील अनेक शहरांमधून याच पद्धतीवर सार्वजनिक गणपति-उत्सव करण्यास प्रारंभ झाला होता. मुसलमानांच्या मोहरमच्या सणापासून हिंदु लोकांना परावृत्त करून त्या उत्सवाच्या बदली हिंदूंना एखादा उत्सव असावा याच हेतूनें गणपति-उत्सवाला प्रारंभ झाला आहे, असेंच त्या काळच्या पुष्कळ जाणत्या लोकांना वाटत होतें. हा उत्सव धार्मिक आहे, परंपरागत आहे, यांत नवीन कांहीं नाहीं, असें कांहीं लोक म्हणत होते. पण त्यांचें तें राजकारणहि असूं शकेल. बेळगांवात शिमग्याच्या सणाला नवीन वळण देण्याचा उपक्रम गोविंदरावांनीं यापूर्वीच केला होता. त्या शिमग्यांतील सणाचा फायदा लोकजागृतीला व राजकारणाला करून घेण्याची संधि गोविंदराव व गंगाधरराव यांनीं फुकट जाऊं दिली नाहीं. गणपति-उत्सवाला मात्र प्रथमपासूनच व्याख्यानें देण्याची व देवविण्याची प्रथा रावण्यांत आली होती.

पुण्याप्रमाणें बेळगांवांतहि पुण्याच्या पद्धतीवर गणपति-उत्सव करण्याची कल्पना बेळगांवांतील रविवार पेठेंतील व्यापाऱ्यांतून आली असा इतिहास झाला आहे. पण याच्याहि मागील स्फूर्ति व प्रेरणा गोविंदरावांचीच होती. त्या उत्सवाचा उपयोग राजकारणाला करून देण्याची योजना व कृति गोविंदराव व गंगाधररावांची होती, यांत तिळमात्र शंका नाहीं. कोणाकडून या कल्पना प्रथम उगम पावलेली

असेना, बेळगावातील असल्या प्रकारच्या कोणत्याहि कार्यांचा संबंध त्या काळीं गंगाधरराव–गोविंदरावाशीं आल्याशिवाय कसा राहणार? इतकी प्रतिष्ठा लोकामध्यें या दोघांनीं प्रस्थापित केली होती. या उत्सवाची व्याप्ति बेळगाव शहरात वाढत गेल्यामुळें त्या उत्सवाला लो. टिळकाना आणावें असा बूट लोकामध्यें निघाला. आणि तो सर्व कार्यकर्त्यांनी उचलून धरला. लोकमान्याना बोलावून आणण्याचें त्याच वर्षी करावें असे गंगाधररावाना वाटत नव्हतें. याला खरें कारण असे होतें कीं, बेळगाव शहरात त्या वेळीं कांहीं भागात मवाळाचें वर्चस्व होतें, असें गंगाधररावाना वाटत होतें. आपल्या कार्यानें व प्रभावानें हें त्या मवाळाचें वर्चस्व घालवावें आणि मगच लोकमान्याना निमंत्रण द्यावें अशी गंगाधररावाची विचारसरणी होती. पण या बाबतींत गोविंदरावानीं आग्रहच धरल्यामुळें गंगाधररावानीं ते घडवून आणण्याची जबाबदारी आपल्यावर घेतली. गोविंदराव व गंगाधरराव कोणत्याहि सार्वजनिक कामात जनतेला आपल्याबरोबर घेऊन जाण्याच्या वृत्तीचे असल्यामुळें, बेळगाव शहरातील सर्व लहानथोर कार्यकर्त्यांना व त्या काळच्या वृद्ध पुढाऱ्याना धरून त्यानीं या गोष्टी घडवून आणल्या. जणु काय तेच सर्व मिळून ही गोष्ट घडवून आणीत आहेत असे स्वरूप त्याला देण्यात आलें. त्यासाठीं जबाबदार लोकाची एक समीति स्थापन करून त्या समितींतील कांहीं सभासदाना आपल्याबरोबर घेऊन गंगाधरराव पुण्यास लोकमान्याना निमंत्रण देण्यास गले. समितीचेच लोक निमंत्रण देण्यास जात असून त्याना मदत करण्यासाठीं आपण त्याच्याबरोबर, लोकमान्याची आपली ओळख असल्यामुळें, जात आहोंत असें स्वरूप त्याला देण्यात आलें. गणपति–उत्सवामध्यें लोकमान्याचे दौरे ठरत असल्यामुळें पत्रोत्तरीं किंवा तारानीं हें काम साधता आलें नसतें. उत्सवात कार्यक्रम कोणते कोणते ठेविले आहेत याचा तपास केल्यानंतर लोकमान्यानीं नाशिकहून थेट बेळगावला येण्याचें मान्य केलें. लोकमान्याना निमंत्रण देऊन स्वागतसमितीचे लोक व गंगाधरराव बेळगावला परत आल्याबरोबर मेळे तयार करणें, लोकमान्याची मिरवणूक काढणें, व्याख्यानाच्या जागा ठरवणें वगैरे सर्व कामाची सरंजाम करण्यास गोविंदराव व त्याचे स्नेही याना प्रारंभ केला. ही माहिती बेळगाव जिल्ह्यातील तालुक्याच्या गावीं व इतर जागृत गावीं देण्यासाठीं गोविंदरावानीं गंगाधररावाना सर्व जिल्हाभर फिरवलें व गंगाधररावाच्या व्याख्यानामुळें जिल्हाभर जागृति झाली. हा उत्सव केवळ बेळगाव शहरापुरता न राहता त्याची व्याप्ति वाढली. त्या सालच्या गणपति–उत्सवासाठीं जिल्हाभर निमंत्रणें पाठविण्यात आलीं होतीं. लोकमान्याच्या आगमनानें त्या वेळीं अखिल कर्नाटकामध्यें जागृतीची लाट उसळली. त्या वेळीं कर्नाटक प्रांतानें कॉंग्रेस चळुळीमध्यें बेळगाव, धारवाड, विजापूर व कारवार एवढ्या चार जिल्ह्याच्या भागाचा बोध होत होता. यापैकीं पहिले तीन जिल्हेच विशेषत राजकारणात भाग घेऊ लागले होते. लोकमान्य यापूर्वी दोन वेळा बेळगाव जिल्ह्यामध्यें

येऊन गेले असले तरी त्या वेळीं त्यांची माहिती लोकांना नव्हती व ते इतके विख्यात व मोठेहि झालेले नव्हते.

असल्या अनेक कार्यांमुळें जिल्ह्यांतील कर्तबगार लोकांचा परिचय गोविंदरावांशीं वाढूं लागला. सार्वजनिक कार्याला उपयोगी पडणारा गुण कोणामध्येंहि दिसून आला तर गोविंदराव त्याला जवळ करीत व त्याच्यांतील गुणाचा गौरव करीत. आपल्याशीं सहकार करणान्याशीं गोविंदराव फार प्रेमानें, आदरानें, व आपुलकीनें वागत असत. एवढेंच नव्हे तर राष्ट्रकार्यासाठीं आपला स्वतःचा मानापमान विसरून, आपल्या विरोधकांशीं वागतांना आपण स्वतः कमीपणा घेत. राष्ट्रीय व राजकीय पुढाऱ्यांची मिरवणूक काढण्याचा वेळगांवांत हा पहिलाच प्रसंग होता. मिरवणुकीची तयारी गोविंदरावांनीं जय्यत करून ठेवली होती. पण त्याच दिवशीं गोविंदरावांचें पहिलें पुत्ररत्न जन्मतःच वारलें. तरीहि तें दुःख बाजूला सारून गोविंदरावांनीं त्या मिरवणुकीमध्यें भाग घेतला होता. या टिळक-भेटीचा गवगवा बराच झाला असल्यामुळें जिल्ह्यांतील व जिल्ह्याबाहेरीलहि पुष्कळ लोक बेळगांवास आले होते. गोविंदरावांनीं ही गोष्ट अमेस धरूनच सर्व तयारी ठेविली होती. लोकजागृति होण्यास मिरवणुकीचा उपयोग किती व कसा होत होता याची कल्पना आज तितकीशी कोणाला येणार नाहीं. लोकमान्य बेळगांवांत आले; त्यांची मिरवणूक यशस्वी रीतीनें पार पडल्यानंतर त्यांना श्री. दादासाहेब नरगुंदकर वकील यांच्या घरीं नेण्यांत आलें. लोकमान्यांच्या या मिरवणुकीमध्यें त्यांना हार घालणारांची संख्या इतकी झाली कीं, गांवांत मिळणारे हार कमी पडले. आणि शेवटीं शेवटीं एका गल्लीमध्यें लोकमान्यांना घातलेल्या हारांचें ओण पुढल्या गल्लींत पोहोंचविण्यांत येऊं लागले, तरीहि हार कमीच पडले.

'आज मिरवणुकींत प्रामुख्यानें भाग घेणारा ठेंगणा, गोरासा, मध्यम बांध्याचा तरुण कोण?' अशी पृच्छा लोकमान्यांनीं गंगाधररावांच्याकडे केली. गोविंदरावांना उद्देशूनच ते बोलत आहेत ही गोष्ट गंगाधररावांच्या झटकन् ध्यानांत आली. त्यांनीं लगेच गोविंदरावांना समक्ष बोलावून त्यांची ओळख टिळकांना करून देण्याचा प्रयत्न केला. पण त्या वेळीं गोविंदराव अन्य कामासाठीं तेथून निघून गेले होते. कदाचित् एवढ्या मोठ्या पुरुषाजवळ आपण कशाला जावें? अशा संकोचानें ते लोकमान्यांची भेट टाळीत असण्याचा संभव नसेल असें नाहीं. शेवटीं गोविंदरावांना मुद्दाम बोलावून घेऊन गंगाधररावांनीं त्यांची भेट व ओळख लोकमान्यांशीं करून दिली. टिळक-गोविंदरावांची ही पहिलीच भेट. त्यांची ही ओळख पुढें वाढतच गेली.

रविवार पेठेंतील गणपतीपुढील मांडव कितीहि मोठा असला तरी तेथें जनसमुदाय मावेना म्हणून त्यापुढील मोकळ्या जागेंत जाहीर सभा भरविण्यांत आली होती. थोडा पाऊसहि त्या वेळीं झाला. लोकांनीं आपापल्या छत्र्याहि उघडल्या. पण गंगाधररावांनीं विनंती करताच सर्वांनीं छत्र्या मिटल्या. लोकमान्यांनीं आपल्या

एकव्याख्यान डोक्यावर छत्री नको म्हणून सांगितल्यामुळें तीहि मिटवण्यांत आली. त्या दिवशीं टिळकांचें भाषण दोन तासपर्यंत झालें. शहापूरच्या जैन मंडळींनीं लोकमान्यांना पानसुपारी केली होती. त्या वेळच्या शहापूरच्या सभेंत जैन धर्म केव्हां व कसा झाला, त्यांतील स्वतंत्र तत्त्वें कोणतीं याचा ऊहापोह लोकमान्यांनीं केला होता. या सभेमध्येंच श्री. अनंतराव दाभाडे यांचें प्रकरण झालें होतें. व्याख्यानाला लोकांची इतकी गर्दी झाली होती कीं, विलंगानें सभेत येणाऱ्या कोणासहि सभेच्या प्लॅटफार्मपर्यंत जातां येण्यासारखें नव्हतें. बाजूच्या घरावर चढून मुख्य मांडवावर येऊन प्लॅटफार्मच्या मध्यखांबावरून श्री. अनंतराव खालीं उतरले होते. टिळकांच्या या दौऱ्यापासून 'टिळकांचा खास जिल्हा' म्हणून बेळगांवची ख्याति झाली. टिळकांच्या दौऱ्यानंतर गोविंदराव व गंगाधरराव यांनीं जिल्हाभर फिरून पुष्कळच व्याख्यानें दिलीं. ही सर्व योजना आखून गंगाधररावांच्याकडून तें घडवून आणण्याचें काम गोविंदरावांचेंच. गोविंदराव-गंगाधररावांच्याबरोबर काम करणारे त्यांचे स्नेही म्हणजे हणमंतराव देशपांडे, लाड, भीमराव पाटील यांचा प्रामुख्यानें उल्लेख करण्यास हरकत नाहीं. टिळकांनाहि बेळगांवबद्दल विशेष आपलेपणा वाटूं लागला. सन १९०६ सालचा नवरात्र व दसरा हा सणहि सार्वजनिकपणें पाळण्याची प्रथा गोविंदरावांनीं पाडली. कोटलाहि सण येवो किंवा कांहींहि काम उत्पन्न होवो त्याचा उपयोग लोकांमध्यें राजकीय जागृति उत्पन्न करण्याकडेच गोविंदराव कटिबद्ध होऊन वागत असत.

संक्रांतीच्या सणाचाहि उपयोग अशाच प्रकारें लोकजागृतीच्या कामीं करून घेण्याची गोविंदरावांनीं योजना आखून तिला प्रत्यक्षात आणण्यासहि प्रारंभ केला. ही प्रथा पुण्यामध्येंच सुरू झालेली होती. संक्रांतिनिमित्त लोकमान्यांचें भाषण बहुतेक प्रतिवर्षी होत आलें आहे. बंगाल, पंजाब व महाराष्ट्र हे तीनच प्रांत चळवळीच्या दृष्टीनें त्या काळीं विशेष जागृत व जिवंत झालेले होते. काँग्रेसच्या किंवा इतर चळवळी त्या काळामध्यें बहुधा विद्यार्थी व वकील वर्गच करीत असत. व्यापारी लोक बहुधा चळवळी-मध्यें—विशेषतः राजकीय चळवळीमध्यें—पडत नसत. पण बेळगांवातील परिस्थिति तशी नव्हती. व्यापारी लोक येथे अगदीं प्रथमपासून सर्व चळवळींमध्यें प्रत्यक्षाप्रत्यक्ष भाग घेत आलेले आहेत. राजकीय चळवळीसाठीं आर्थिक मदत करण्यास तर व्यापारी बंधु कधींच कोणाच्या मागे पडले नाहींत. अन्य प्रांतांमध्यें या प्रमाणांत तरी व्यापारी बंधु राजकारणांत भाग घेत नसावेत असें दिसतें. याला जबाबदार जे कोणी असतील त्यांत गोविंदरावांचा हिस्सा इतर कोणापेक्षाहि कमी नव्हता. गोविंदरावांचा व्यापारी पेशा हेंच त्याचें कारण आहे.

आपल्या गल्लींतील किंवा पेठेंतील सार्वजनिक गणपति शक्य तेवढा आकारानें मोठा, देखणा व उठून दिसणारा असावा आणि आपल्या गणपतीपुढें जबरदस्त,

प्रसिद्ध आणि चळवळ्या पुढाऱ्यांचीं व्याख्यानें अधिक व्हावींत अशी प्रत्येकाची धडपड चालू असे. या सर्व सार्वजनिक गणपति उत्सवाच्या चालकांना व्याख्यानें अधिक व्हावीत अशी प्रत्येकाची धडपड चालू असे. या सर्व सार्वजनिक उत्सवाच्या चालकाना व्याख्याते पुरविणें आणि त्यापैकीं शक्य तितक्या अधिक 'गणपति-उत्सव-मंडळा'च्या वाटणीला राजकीय पुढारी व्याख्याते म्हणून पुरवतां येतील याची काळजी गोविंदराव घेत असत.



प्रकरण बारावें

# मद्यपान-निरोधन आणि 'वंदेमातरम्' कैदी

मद्यपान–प्रतिबंधाच्या चळवळीला महाराष्ट्रात व विशेषतः पुण्यात जोर चढत चालला होता. टिळकांच्या प्रोत्साहनानें पुण्यात दारू–दुकानावर निरोधन (पिकेटिंग) करण्याचा कार्यक्रम सुरू झाला होता. बेळगावातहि हाच कार्यक्रम हातीं घेण्याचें गोविंदरावानीं ठरविलें व त्याप्रमाणें स्वयंसेवक तयार करून कामाला प्रारंभ झाला. पुण्यातील कार्य किंवा अन्यत्र होणारें कार्य यांत फार मोठा फरक आहे. नाहीं म्हटलें तरी पुण्यातील समाज थोडाफार अधिक शिक्षित; त्यानीं चळवळी पाहिलेल्या व केलेल्याहि. त्यामुळें असल्या निरोधनाच्या चळवळीचा कार्यक्रम त्याना नवीन नव्हता. अशा सार्वजनिक कामाला ते सरावलेलेच होते. उलट बेळगाव हें त्या मानानें मागासलेलें गाव. तेथे सार्वजनिक काम हें नवें नवें वाटण्याइतकी जनता एका दृष्टीनें अशिक्षित. तेव्हा अशा चळवळीच्या कामीं स्वयंसेवक तयार करण्यापासूनच कामाला सुरुवात करावी लागे. अर्थात् पुण्यापेक्षा बेळगावात असे निरोधनाचें काम करणें अधिक अवघड होतें. शिवाय दुसरें असें कीं, पुणें येथील दारूगुत्ते तेव्हा जणु भरवस्तींत होते. लोकांच्या जाण्यायेण्याच्या वाटेवरच ते होते. त्यामुळें तेथें काम करणाऱ्या स्वयंसेवकाला या वाटसरूंचा एकप्रकारें धीर असे. पण ही परिस्थिति बेळगावात न हती. बेळगावचे दारूगुत्ते दूर गावाच्या कोपऱ्यावर असत. त्या भागात रहदारी कमी व आसपास रहाणारे लोकहि समाजाच्या तळपातळीचे व व्यसनी असे असत. त्यामुळें येथील गुत्त्यावरील निरोधन धोक्याचें होतें. त्यातहि येथील दारूविक्री सायंकाळपासून रात्रीं नऊपर्यंत होत असल्यामुळें हें ठिकाण व ही वेळ निरोधकाना भयदायकच होती. पण बेळगावकराचें सुदैव असें कीं, बहुजनसमाजामध्यें ओतप्रोत झालेला व ज्यांचा प्रवेश घरोघर झाला होता असा गोविंदरावांसारखा कार्यकर्ता या चळवळीचें मार्गदर्शन करण्यास लाभला आणि तो त्या कामासाठीं कटिबद्ध झालेला होता. दारूच्या दुकानावर रात्र पडत जाईल तशी गर्दी वाढत जाते. बेळगाव

शहर व लष्कर मिळून एकंदर सहा दारुगुत्ते होते. या सर्व पिठ्यावर सारखेंच निरोधन चालू करण्यात आलें. गोविंदराव याळगी, गंगाधरराव, हणमंतराव देशपांडे आणि लाड आदि दहाबारा मंडळी स्वयंसेवकांच्या कामावर देखरेख ठेवण्याचें काम करीत होती.

केवळ निरोधनावरच सर्वस्वीं अवलंबून न राहतां आळीगाळीनें आळी आळींतून पंचामार्फत सभा घ्याव्यात, दारूच्या दुष्परिणामावर व्याख्यानें द्यावींत आणि दारू न पिण्याच्या आणाशपथा घेवविण्याचा सपाटा गोविंदरावानीं चालू ठेवला. यासाठीं गल्लींतील लोकांची संघटना केली. या कार्यात श्री भीमराव पाटील यांचा उपयोग गोविंदराव गंगाधररावानीं भरपूर करून घेतला वास्तविक श्री. भीमराव पाटील व श्री. लाड हे दोघेहि या पिण्याच्या व्यसनात गुरफटलेले होते. परंतु या चळवळी मध्यें भाग घेण्याचें ठरविल्यानंतर या पियक्कडानीं आपलें व्यसन संपूर्णतया सोडलें. लोकाना याच आश्चर्यच वाटलें. अन्य लोकाकडून दारू पिणें सोडण्यास व तशा प्रतिज्ञा व शपथा घेवविण्यास या दोघांच्या उदाहरणाचा फार उपयोग झाला मराठे लोकामध्यें भीमराव पाटलांचें वजन असल्यामुळें जातपंचायतींतहि त्याना महत्त्व होतें त्याचें सांगणें लोक ऐकत व त्यानीं स्वत. दारू सोडल्यामुळें 'आधीं केलें मग सांगितलें' या न्यायानें त्यांच्या बोलण्याचा परिणाम होई गोविंदरावांच्या लोकसंग्रही वृत्तीमुळें असे लोक दारूनिरोधनाच्या कामीं राबविल्यामुळें गोविंदराव गंगाधर रावाना पुष्कळच यश येऊं लागलें. दारूगुत्त्यावर पिकेटिंग करावयास जाण्यापूर्वी अशा प्रकारच्या संघटनामुळें दारुगुत्त्यावर विशेष कोणा जाणारच नाहीं, अशी दक्षता गोविंदराव प्रथम घेत. त्या व्यवस्थेकडे त्यानीं आपली शक्ति वेचली व ती फलदायी झाली.

दारूगुत्त्यावर पिण्यासाठीं जाणाऱ्या समाजाचें सूक्ष्म निरीक्षण केलें तर असें आढळून येतं कीं, ज्यांच्या हातात रोज पैसा येत असतो अशा गवंडी, सुतार, लोहार, विणकर वगैरे लोकांचा भरणा दारू पिणारामध्यें अधिक असतो. दोनकरी लोकांच्या हातीं रोज तितका पैसा खेळत नसल्यानें त्यांच्यामध्यें दारु पिणाराची संख्या त्या प्रमाणांत कितीतरी कमी असते. म्हणून गोविंदरावानीं त्याच समाजामध्यें सुधारणेचें काम अधिक चिकाटीनें करण्याचा चंग बांधला. खाजगी चर्चा करून, व्याख्यानें देऊन व प्रतिष्ठित माणसांची या जातपंचाची भीड घालून आणि प्रसंगीं घरच्या बायकांचें साह्य घेऊनहि अट्टल दारुड्याचीहि दारू सोडावण्याचा प्रयत्न होऊं लागला. या गोष्टीला सरकार प्रतिबंध करून शकत नव्हतें. त्या आळींतील लोकांनीं दारू सोडल्याचें प्रसिद्ध होत असे त्या आळींतील प्रमुखच या कामीं मदत करण्यास येऊं लागले स्वाभाविकपणेंच गल्लीगल्लींत चढाओढ व ईर्षा उत्पन्न झाली. या सात्त्विक चढाओढी मुळें अन्य गल्लींतील दारूबंदीचें काम तितकें सोपें होत असे. हें सर्व काम आरते

आस्ते बिनबोभाट चालू लागलें. 'हा सर्व पोरखेळ आहे, यात कांहीं होणें नाहीं नि जाणें नाहीं' ही लोकांची प्रथमप्रथमची उदास वृत्ति पार नाहींशी झाली. लोक आता या कार्याकडे जागरूकतेनें डोळे लावू लागले. कामाला चांगला आकार येऊ लागला, बाळसें वाढू लागलें. मग मात्र दारूमक्तेदारांनीं अधिकाऱ्यापुढें त्याविरुद्ध तक्रार आरंभली. आपल्या धंद्यावर या चळवळीचा परिणाम होत असल्याचें गाऱ्हाणें सरकारकडे दारूदुकानदार नेऊ लागले. आणि सरकारला त्यांत लक्ष घालण्यास संधि चालून आली. श्री. नानू वकील यानीं दारू सोडून देणारास चहापार्टी दिली. या गोष्टीचा उल्लेख 'केसरी'मध्यें आला होता. ('केसरी' ता. २० ऑगस्ट १९०६).

**अधिकाऱ्यांचे सामोपचाराचे प्रयत्न व बुद्धिवाद :** डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट-साहेबानीं गोविंदरावाना बोलावून घेतलें. त्यांची गोरी ठेंगणी मूर्ति, चेहऱ्यावरील तरतरी आणि प्रभावी व्यक्तिमत्त्व पाहून त्याना धमकी वगैरे देण्याच्या भानगडींत ते प्रथम पडले नाहींत. त्यांच्याशीं बुद्धिवाद करण्याचाच त्यानीं प्रयत्न केला. मोठेपणाचा आव आणून ते म्हणाले, "तुमचें वय लहान आहे, दारूबाज लोक आडदांड, दांडगोर असतात. त्यांच्या वाटेस गेल्यास कदाचित् ते तुम्हास मारतीलहि. म्हणून तुम्ही या फंदात पडू नका. कामकरी लोक श्रमानें थकून जातात. शीण घालविण्यासाठीं त्याना उत्तेजक पेयाची जरुरी भासते व म्हणून ते पितात. तथापि सरकारनेंहि दारू महाग करून ती गरिबांच्या आवाक्याबाहेर केल्यामुळें लोक फार पीत नाहींत व म्हणून चळवळीची तशी आवश्यकताहि नाहीं." मॅजिस्ट्रेटसाहेबाचें हें सारें बोलणें गोविंदरावानीं शांतपणें ऐकून घेतलें. त्यांच्याशीं वाद करण्यात अर्थ नव्हताच. म्हणून बोलण्याला मोडता घालण्याच्या इरादानें ते म्हणाले, 'सरकारी अधिकाऱ्याना आपल्या सुरक्षिततेची काळजी करण्याचें कारण नाहीं. कोणावर जुलूम न करता सामोपचारानें लोकांचें मन वळविण्यात दगाधोपा होण्याचा संभव नाहीं.' असें तुटक उत्तर देऊन गोविंदराव तेथून उठले व परत आले. दारूनिरोधकाच्या विनवणीचा धिक्कार करून दारुडा गुत्यात शिरला असें उदाहरण क्वचितच घडलें असेल. ही चळवळ करणाराचा अनुभवहि तसाच आहे. त्यामुळें गोविंदरावानीं मॅजिस्ट्रेटसाहेबाना सांगितलें तें खरेंच होतें!

**लोकमान्यांनीं बेळगांवकरांचें अभिनंदन केलें! :** पुण्यामध्यें पिकेटिंग करणारावर खटले होऊ लागले व लोकाना दंडाच्या शिक्षा झाल्या. तोच प्रकार आता बेळगावात होणार हें कोणासहि कळण्यासारखें होतें. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें गंगाधररावाना व इतर कांहींना कचेरीमध्यें बोलावून 'ही चळवळ अशीच चालू राहील तर सरकारला कडक उपाय योजावे लागतील!' अशी धमकी दिली. पुढें लौकरच इ. पि कोडाच्या १४४ कलमाप्रमाणें दारूच्या दुकानाच्या आसपास ५० यार्डांपर्यंत पिकेटिंग करू नये अशा नोटिसा लावण्यात आल्या. दारूबंदीची चळवळ करायची तर या नोटिसा मोडणें

समप्रमाणातच होतें. स्वयंसेवकांनीं त्याकडे दुर्लक्ष करून आपलें निरोधन चालू ठेवलें. साहजिकच निरोधकांना अटक झाली, खटले भरले आणि त्यांना दंडाच्या शिक्षा होऊं लागल्या. हाच प्रकार पुण्यातहि झाला. दंडाची रक्कम टिळकांना भरावी लागली अशा प्रकारें लोकमान्यांना चारपांच हजार रुपये भरावे लागले होते. बेळगावातहि आतां हीच अडचण उभी राहिली. दंडाची रक्कम कशी उभी करावी याचा निर्णय गोविंदराव गंगाधररावांना घ्यावाच लागला. कारण पहिल्याच दिवशीं दंडाची रक्कम पांचशें रुपयांवर गेली होती. गोविंदरावांचा पेशा सराफी व्यापाराचा असल्यामुळें कांहीं व्यापाऱ्यांनीं स्वयंस्फूर्तीनें कांहीं रक्कम दिल्यामुळें ती गंगाधररावांच्या हातीं जमाहि झालेली होती. तरीसुद्धां निरोधकांचा दंड हा त्यांच्यापुढें एक प्रश्न होता. गोविंदराव गंगाधरराव व त्यांचे इतर सहकारी यांनीं विचार करून ठरविलें कीं, यापुढें निरोधकानें दंड न भरतां त्याऐवजीं दिल्या जाणाऱ्या कैदेची शिक्षाच पसंत करावी व ती भोगावी पण या बाबतींतील अंतिम निर्णय, ज्यांच्यावर खटले भरले आहेत व ज्यांना दंड आणि शिक्षा झालेली आहे त्या निरोधकांनींच घेणें उचित होतें, म्हणून त्यांना भेटण्यासाठीं गंगाधरराव कोर्टात गेले. त्यांना आपला विचार गंगाधररावांनीं समजावून दिला. गंगाधररावांसारखा पुढारी आपली भेट घेतो व आपलें मत विचारतो या विचारानें ते निरोधक भारून गेले आणि त्यांनीं गंगाधररावांच्या विचारालाच साथ दिली. सर्व स्वयंसेवकांनीं दंड न भरतां कैदेत जाण्याचेंच पसंत केलें. एकदोन दिवसांतच गोविंदरावांना अटक झाली. त्यांना हातकड्या घालून कोर्टापासून तुरुंगापर्यंत चालत नेण्यात आलें. या कृत्यानें लोकांना चीड आली. पिकेटिंगला जोर चढला. चळवळ फोफावली.

बेळगावच्या पिकेटिंगमध्यें दंड झालेल्या स्वयंसेवकांनीं दंड न भरतां तुरुंगवास पत्करला, ही गोष्ट टिळकांना कळल्यानंतर त्यांनीं 'केसरी'मध्यें एक स्फुट लिहून बेळगांवकरांचें अभिनंदन केलें. या स्वयंसेवकांत वाईच्या प्राज्ञपाठशाळेचे प्रचारक म्हणून पुढें महाराष्ट्रांत प्रसिद्धीस आलेले श्री. महादेवशास्त्री दिवेकर हेहि एक होते. त्यांनाहि दंड झाला होता. परंतु दंडाच्या ऐवजीं कैदेची शिक्षा त्यांना झालेली नव्हती महादेवशास्त्री दिवेकर बोगारवेशींतील गुत्त्यावर पिकेटिंग करीत होते परंतु त्यांच्या बंधूकडून आलेल्या बनावट तारेचें निमित्त करून, त्यांना उगारला पाठविण्यात आलें. यामुळेंच गोविंदराव-गंगाधरराव यांचा परिचय महादेवशास्त्रींना घडला. यांत काम करणारामध्यें कल्लाप्पा, अप्पा शिंपी यांचीं नांवें प्रामुख्यानें सांगतां येतील.

**'वंदे मातरम्' कैदी** : रहदारीला अडथळा करण्याच्या कलमाखालीं गोविंदराव व त्यांचे सात साथी यांना पोलिसांनीं अटक केली. या सर्व चळवळीचा वृत्तांत कैलासवासी वामनराव मानविंदे यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या 'परीक्षक'

खालाहिंगातून छ पुन येत असे. याच संदर्भात त्या वेळीं 'केसरी'नें लिहिलें आहे कीं,

"बेळगांव येथे स्वयंसेवक मंडळीने बोगारवेशींतील दारूचा गुत्त्याजवळ जमून, दारू न पिण्याबद्दल दारूबाजास उपदेश करण्याची खटपत चालविली आहे. दारू पिण्यानें होणारें नुकसान समजून देण्यात येत आहे. मदर गुत्त्यातील पारशी दारूच्या एका बाटलीची किंमत 'दोन आणे कमी केली आहे.' असे मोठ्यानें ओरडून मद्यपास मद्य पिण्याबद्दल सवलत दाखवून, प्रोत्साहन आणीत आहेत. या खटपटींत स्वयंसेवकास आस्ते आस्ते यश येत चाललें आहे." (केसरी : मंगळवार ता. ३ जुलै १९०६)

याच सुमारास बेळगांवात लोकमान्यानीं आपल्या भाषणात खालील उद्गार काढले आहेत. ते आपल्या भाषणात म्हणाले आहेत कीं,

"येथील दारूचेंच उदाहरण घ्या. त्या व्यसनापासून लोकांना सोडविण्यासाठीं केवढीहि यातायात घेतली, तरी सरकारच्या धोरणामुळें ती बहुतेक सर्व व्यर्थ होऊन जाते. सरकारचीं सर्व खातीं केवळ लोकांच्या कल्याणासाठींच आहेत असें सांगण्यात येत असतें. परंतु या हेतूशीं उघडपणें विरोध दिसण्याजोगा दारूखात्या दुसरा विषय नाहीं. तिजोरीची भर व्हावी यापरता अबकारी खात्याचा दुसरा हेतु कांहीं नाहीं. सरकारनें लष्करी व इतर खर्च अवाढव्य वाढविलेला आहे. तो खर्च चालविण्यासाठीं दारूचे पिठे या देशात जेथें तेथें स्थापन करण्याचें पातक आमचें सरकार जाणूनबुजून आपल्या माथीं घेत आहे. दारूचें उत्पन्न कमी झालें तर सरकारला खर्च कमी करण्याची पाळी येईल हें खरें. पण दारूच्या व्यसनातून आमचे लोक मुक्त झाले तर त्याची स्थिति सुधारेल हें निर्विवाद आहे." (केसरी : ता. २५ सप्टेंबर १९०६)

प्रस्तुतमनुसरामः. गोविंदरावाना झालेल्या पहिल्या अटकेच्या वेळीं त्याना समज देऊन सोडून देण्यात आले होतें. परंतु त्यानीं पुनः निरोधन केल्यामुळें त्याना पुन अटक झाली. त्याच्यावर खटले भरले व त्याना सात दिवसाची शिक्षा देण्यात आली.

गोविंदरावाच्या स्वभावातील एक वैशिष्ट्य असे होतें कीं, संकटाचे वेळीं स्वत जातीनें पुढाकार घेऊन ते संकटात उडी घेत असत. या संकटाशीं मुकाबला करण्याच्या निर्भय वृत्तीमुळें त्याना हातीं घेतलेल्या कामामध्यें पूर्ण यश सपादता येत असे. या गुणामुळेंच त्याच्या मित्रमंडळींतहि त्याच्याविषयींचा अभिमान वाढत चालला होता. व ते सर्व मिळून उत्साहानें काम करीत असत. बेळगाव लष्करभागामधील सर्व गुत्त्यावर निरोधन चालू ठेवले होते प्रत्यक्ष सरकारशीं सामना देण्याचा प्रसंग व सुमधि याच निरोधनचळवळीमुळें गोविंदराव व त्याचे मित्रमंडळ याना प्रथम लाभली होती. या सर्व स्वयंसेवकाच्या चळवळीना आदि व अंत 'वंदेमातरम्' या जय घोषानेच होत असल्यामुळें या कैद्याना तुरुंगातील इतर बंदी 'वंदेमातरम् कैदी' म्हणू

लागले होते. अशा रीतीनें देशसेवा करीत असताना, सक्ते मुद्दाम अंगावर ओढून घेऊन, त्या कार्यी तुरुंगात जाणें ही गोष्ट अगदीं नवीनच होती. असली देशासाठीं पत्करलेली कैद म्हणजे स्वदयाला अंगावर जखम मिरवण्याचा अलंकार होता. तो कैद्याचा पोषाख म्हणजे राष्ट्रसताची ती निशाणी होती आणि म्हणून जनतेमध्यें त्याचें विशेष कौतुक होतें. या अटकेमध्यें त्याचा आठवडा गेला. या कैदेमुळें विशेष कांहीं झालें नाहीं पण एक गोष्ट घडली. आठ दिवसाची शिक्षा भोगल्यानंतर त्यांना सोडून देण्यात आलें. पहाटेची शांत वेळ होती. सर्वांनीं 'वंदे मातरम्' चा जयघोष दिला. कुतूहल जागें झालें. लोकांनीं दारें उघडलीं. राष्ट्रमंत्राचा जयघोष चालू होता 'वंदे मातरम्'. सर्व स्वयंसेवक गर्जना करीत होते 'वंदेमातरम्'. आनंदानें प्रत्येकजण घरीं परतला. आणि त्याच क्षणीं हे 'वंदेमातरम् कैदी' सर्वतोमुखीं झाले!

बेळगावामधील एक प्रसिद्ध व्यक्ति अरदेसर नौरोजी आणि याळगी घराणें याचा पूर्वीपासूनचा संबंध. याळगी बंधु त्यांच्या 'ब्लू कॅमल' बंगल्यावर अधून मधून जात येत असत. दारुबंदी चळवळीच्या दिवसात अरदेसर नौरोजी स्वतः दारूचे मक्तेदार होते त्यांनीं आपल्या पारशी मराठीमध्यें गोविंदरावाना म्हटलें, 'गोविंदराव, तुमचे वडील तर अबकारी इन्स्पेक्टर होते. आणि तुमी पिकेटिंग करते?' गोविंदरावाना त्यांचा प्रेमळ स्वभाव माहीत होता. ते नम्रपणे म्हणाले, 'म्हणूनच मला अधिक जबाबदारीनें हे काम करणें जरूर आहे!' अरदेसर नौरोजी यांचा दिलदार स्वभाव आणि याळगी घराण्याशीं त्यांची झालेली मैत्री व घरोबा अगदीं शेवटपर्यंत टिकून होता. त्यात त्या चळवळीनें कोणताहि खंड पडला नाहीं. हें या दोघानाहि भूषणास्पद आहे! थोर मनें अशींच असतात!

**तरीहि गालबोट लागलें** : पुढें पुढें स्वयंसेवकाना कैदेची शिक्षा देणें सरकारनें सोडून दिलें. दंडाची रक्कमहि कमी होऊं लागली. अर्थात् कार्यकर्त्यांना वाटू लागलें कीं, याच्या चळवळीला यश येऊं लागलें. पण कांहीं अति उत्साही वृत्तीच्या तरुणाना दारुदुकानात प्रवेश केला व दारूचीं पिपें फोडलीं. कांहींनीं तर गुत्त्यात जाणाऱ्या लोकाना उचलून एकीकडे नेलें व त्याना यथेच्छ मार देण्याचा उपक्रमहि केला. एका तरुणानें तर दारु दुकानाला आग लावण्यासहि कमी केलें नाहीं. नारायण हणमशेट या नावाचा एक अति उत्साहि तरुण होता. तो सरळ दारू पिठ्यात शिरला, गुत्त्यातील दारुपिंपावर चढून त्यानें दारूमध्यें यथास्थित लघुशंका केली. आणि बाहेर येऊन सर्व दारुड्याना सांगितलें 'मी गुत्त्यातील पिपात लघुशंका करून आलों आहें, आता वाटल्यास खुशाल जाऊन दारू प्या!' अर्थात् तें मूत्र प्राशन करण्याला कोणीहि जाणें शक्यच नव्हतें. पण तो काळच असा होता कीं, स्वयंसेवकाच्या असल्या आचरट धाडसाचेंहि जनता मुक्तकरानें कौतुकच करीत होती.

असल्या गैरवर्तणुकीनें चळवळीची शिस्त मोडू लागली. तीमध्ये शिथिलपणा

आला आणि चळवळीचीं सूत्रें नेत्याच्या हातातून गळूं लागलीं. प्रत्येक अविचारी मनाला ही स्वयंसेवकाची चळवळ म्हणजे आपलाच कारखाना वाटूं लागला. त्यामुळें दोनचार चळवळ्यांना कडक शिक्षा झाल्या. अर्थात् ही चळवळ माग पडूं लागली. दारू सोडविण्याच्या कामीं पुढाकार घेताना ज्या कांहीं व्यक्तींनीं स्वतः दारू पिण्याचें सोडलें होतें त्यापैकीं कित्येक प्रमुख लोकांनीं वर्ष सहा महिन्यांतच पुन: पिण्यास सुरुवात केली. दारू पिणें हा आमच्या गुरुमार्गांतील एक धार्मिक विधी आहे अशी सबबहि कित्येकांनीं सांगितली. कांहींनीं कुलधर्म, जातिपरंपरा पुढें करीत दारूचे पेले ओठाला लावले. आणि या ना त्या कारणानें कोलांटी उडी मारून दारू पिण्याचें समर्थन होऊं लागलें. त्यामुळें मांजा तुटलेल्या पतंगासारखी चळवळ भरकटली, आणि निरोधनाच्या पायाखालचा आधारच गेला. तथापि कित्येक अट्टल दारूबाजांनीं त्या वेळीं जी दारू सोडली ती कायमचीच सोडली. अशीं उदाहरणें अनेक आहेत. त्यांची सांपत्तिक स्थिति त्यामुळें सुधारली. ते सुखांत राहूं लागले. हा फायदासुद्धां नैतिक दृष्टीनें कांहीं थोडाथोडका नाहीं. चळवळीच्या यशाच्या समाधानास तो पुरेसा आहे.

एवढ्या मोठ्या व्यापक चळवळीमध्यें एवढा अल्प अत्याचार किंवा एवढीशी हिंसाहि व्हायचीच, ती उपेक्षणीय आहे; अशीच विचारसरणी त्या वेळीं सामान्य जनतेंत होती. परंतु अशा प्रकारच्या थोड्यादेखील हिंसेस अथवा अत्याचारास फाटा दिला पाहिजे या आधुनिक विचारानें अद्यापि मूळ धरलेलें नव्हतें. त्यामुळें अशाचाहि समाजांत गौरव होत असे. त्या दृष्टीनें पाहिल्यास सार्वजनिक चळवळीच्या सहितेच्या बाबतींत आजचा आपला समाज पुष्कळच प्रगत झालेला आहे, यांत शंका नाहीं.



प्रकरण तेरावें

# स. १९०७चें कॉंग्रेस अधिवेशन आणि गोविंदराव

सन १९०७ चें कॉंग्रेस अधिवेशन विशेष गाजल्यामुळें तें खास इतिहासप्रसिद्ध झालें आहे. त्या वेळचें वातावरण समजल्याशिवाय त्यांतील गोविंदरावांचा व वेळगांवकरांचा भाग चांगल्या रीतीनें ध्यानांत येणार नाहीं. स. १९०७च्या सर्व बारीकसारीक घटना देण्यापेक्षां त्या प्रसंगीं हजर असलेल्या गंगाधरराव देशपांडे यांनीं आपल्या 'माझी जीवनकथा' नामक आत्मचरित्रांत त्याचा सुंदर सारांश दिलेला असून तोच मी या ठिकाणीं उद्धृत करीत आहें.

"स. १९०६ सालीं कलकत्याच्या कॉंग्रेसच्या वेळीं १९०७ सालची कॉंग्रेस नागपूर येथें भरविण्याचा ठराव पास झाला होता. पण नागपूर शहरांत आणि मध्यप्रांताचा मराठी भाग व वऱ्हाड यांत टिळकांचें व राष्ट्रीय पक्षाच्या मंडळींचें वजन जास्त असल्यामुळें कलकत्ता कॉंग्रेसपुढें नागपूरच्या कॉंग्रेसचें पाऊल पडेल अशी फेरोजशहा वगैरे नेमस्त पुढाऱ्यांना शंका येऊं लागली. तेव्हां स्वागत कमिटी आपल्याच लोकांच्या हातीं राहावी, असें त्या पक्षाच्या मंडळींना वाटूं लागलें..... बहुमत आपल्या बाजूनें होत नाहीं अशी खात्री झाल्यानंतर, कलकत्ता कॉंग्रेसनें मंजूर केलेले ठराव फिरवून पुनः कॉंग्रेसची गाडी जुन्या नेमस्त पद्धतीच्या वळावर आणण्याचा बेत फिसकटणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागतांच नेमस्त पुढाऱ्यांनीं नागपूरला कॉंग्रेस न भरवतां सुरतेस कॉंग्रेस भरविण्याचा घाट घातला. राजकीय दृष्ट्या गुजरात प्रांत त्या वेळीं अगदीं सुप्त स्थितींत होता, असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं...... म्हणून नागपूरहून सुरतेस कॉंग्रेस नेण्याचा विचार ठरला. मुंबई इलाख्यांत आपल्याच वजनाखालीं असलेल्या सुरत शहरांत कॉंग्रेस भरविण्याचा घाट घालण्यांत आला......पण सुरतेच्या कॉंग्रेसच्या पूर्वी लाला लजपतराय यांची

सुटका झाल्यामुळें त्यांना सुरतेच्या काँग्रेसचें अध्यक्षपद द्यावें, अशी सूचना राष्ट्रीय पक्षाकडून होऊं लागली. लालाजींचा स्वार्थत्याग, त्यांची कामगिरी, व त्यांची तुरुंगातून नुकतीच झालेली मुक्तता यामुळें त्यांना बाजूला सारून दुसऱ्या पुढाऱ्याचें नांव पुढें झाल्यास लोकांना रुचणार नाहीं, असें नेमस्तांना वाटू लागलें. त्यांच्या तर्फे कलकत्त्याचे सुप्रसिद्ध वकील डॉ. रासबिहारी घोष यांचें नांव पुढें आलें होतें. टिळकांनीं या अध्यक्षपदाच्या वादावर 'केसरींत' जोराचे लेख लिहिले होते. पण गोखल्यांच्या सांगण्यावरून आयत्या वेळीं लालाजींनीं आपण अध्यक्ष होण्यास तयार नाहीं, असें जाहीर केलें. लालाजींकडे टिळकांचा निरोप गेला होता. पण या सर्व भानगडीमुळें सुरतेच्या कॉंग्रेसला बरेंच महत्त्व आलें होतें सुरतेस राष्ट्रीय पक्षातील लोकांना उतरण्याकरिता गावात निराळी जागा नेमली होती तेथें सर्व तरुण मंडळींनिशीं मी उतरलो होतों. टिळकहि गावांतच होते. त्यामुळे त्यांच्याकडे जाण्यायेण्याला आम्हाला सोयीचें होत ..कलकत्त्याच्या कॉंग्रेसमध्यें राष्ट्रीय पक्षाच्या प्रयत्नानें मजूर झालेल्या स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य या चार विषयावरील ठरावात बदल करण्याचा नेमस्त पुढाऱ्यांचा बेत होता. हे ठराव जशाचे तसे पास करवून घेण्याची हमी नेमस्त पुढाऱ्यांनीं न दिल्यास कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या सुरुवातीसच स्वागत मंडळाच्या अध्यक्षाचें भाषण झाल्यानंतर व अध्यक्षाच्या निवडणुकीचा ठराव मांडण्यापूर्वी राष्ट्रीय पक्षातर्फे एक ठराव मांडण्याचा विचार राष्ट्रीय पक्षानें निश्चित केलेला होता. राष्ट्रीय पक्षाच्या सभा दररोज भरत असत व टिळकांचीं भाषणें होत असत. समेट करण्याबद्दल टिळकांनीं आटोकाट प्रयत्न केला. पण त्यांच्या प्रयत्नाला यश आलें नाहीं."

सुरत कॉंग्रेसच्या अधिवेशनाची ही पार्श्वभूमि होती. ज्या इलाख्यात कॉंग्रेस भरते त्या इलाख्यातील मनुष्याला अध्यक्ष निवडावयाचा नाहीं, असा कॉंग्रेसचा प्रघात आहे. म्हणून सुरतेस कॉंग्रेस भरविल्यास आपोआपच टिळकांना अध्यक्ष करण्याचा निरास होण्याचा प्रश्न मागें पडतो. ही वस्तुस्थिति लक्षात घेण्यासारखी आहे. दोन्ही पक्षाच्या सामर्थ्याची कसोटी पहाण्याचा प्रसंग होता. म्हणून दोन्ही पक्षाकडून आपापलें बहुमत करण्याच्या बाबतींत खूप तयारी चालली होती. बेळगाव शहरात व जिल्ह्यात गोविंदराव-गंगाधरराव यांनीं कित्येक सभा भरविल्या होत्या. प्रत्येक जिल्ह्यातून किती प्रतिनिधि असावेत या संबधानें कांहीं त्या वेळीं नियम नव्हते. फक्त जाहीर सभा करावयाच्या आणि त्यामध्यें प्रतिनिधींच्या निवडणुकी करावयाच्या अशी पद्धत तेव्हा असे. बेळगावहून शक्य तितके अधिक प्रतिनिधि घेऊन येण्यास टिळकांनीं एक पत्र गंगाधररावांना लिहून कळविलें होतें. बेळगाव जिल्ह्यातून कॉंग्रेसला

येणाऱ्या प्रतिनिधींना गोविंदरावांनीं टिळकांच्या लाल अगरख्यासारखा अगरखा—जणु गणवेशच—वापरावयास आदेश दिला होता.

राष्ट्रीय सभेच्या आदल्या दिवशीं राष्ट्रीय पक्षाला अनुकूल प्रतिनिधि किती आहेत याचा आकडा नक्की करण्याबद्दल टिळकांनीं गंगाधररावांना सांगितल्यामुळें त्यांनीं, गोविंदराव व आणखी तीनचार मंडळींच्या मदतीनें तशी यादी तयार केली. तीवरून दिसून आलें कीं, राष्ट्रीय पक्षाचे आटोक्यापेक्षा अधिक प्रतिनिधि उपस्थित होते. राष्ट्रीय पक्षाचें बहुमत होण्यास ही संख्या पुरेशी होती, असे नव्हतें. पण नेमस्तांशीं मुकाबला करण्याचा तसा प्रसंगच आला तर आपणहि कांहीं कमी नाहीं असा आत्मविश्वास उत्पन्न होण्याइतकें सामर्थ्य या संख्याबळाचें होतें हें उघड झालें.

राष्ट्रीय पक्षाला आपला स्वतंत्र ठराव अधिवेशनात मांडावाच लागला तर तो कोणीं मांडावा हा एक प्रश्न होता. आपल्याला अनुकूल असलेली प्रतिनिधींची संख्या विदित झाल्यानंतर पूर्वी ठरल्याप्रमाणें अध्यक्षाची सूचना पुढें येण्यापूर्वी मांडावयाचा ठराव आपण स्वतःच मांडावा असें टिळकांनीं निश्चित केलें. सुरतेच्या स्थानिक नेमस्त मंडळींनीं गुंड आणून ठेवले होते आणि टिळकांनीं किंवा त्यांच्या पक्षातर्फे कोणीं कांहीं ठराव वगैरे मांडल्यास तसें करू न देता, वेळच आल्यास दडेली करून, राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष वगैरे निवडण्याचें काम जबरदस्तीनें पार पाडावयाचें असें ठरविलें होतें. तेव्हा राष्ट्रीय पक्षातर्फे जो ठराव मांडावयाचा तो स्वतः टिळकांनीं न मांडता आणखी कोणीं तरी मांडावा अशी सूचना गंगाधररावांनीं टिळकांच्यापुढें खाजगी रीतीनें ठेवलेली होती. त्यांच्या मनातील हेतु असा होता कीं, टिळक स्वतः जर ठराव मांडण्यास व्यासपीठावर गेले व गुंडाकडून कांहीं अत्याचार झाला तर टिळकांच्या प्रतिष्ठेला कमीपणा येण्याचा संभव होता, तो येऊ नये. पण टिळकांना ही गोष्ट मान्य झाली नाहीं. आपला ठराव मांडण्याचा प्रसंग आल्यास तो आपल्याशिवाय दुसऱ्यानें मांडणें योग्य नाहीं. त्याचा परिणाम कांहींहि होवो. त्याबद्दलची सर्व जबाबदारी आपणच आपल्या शिरावर घेतली पाहिजे, असेंच त्या वेळीं टिळकांना वाटत होतें. त्यांनीं आपल्या मताप्रमाणेंच निर्णय घेतला व तसेंच घडून आलें.

सुरतेच्या काँग्रेसमधील सर्व दृश्य या ठिकाणीं येथें उभें करावयाचें नाहीं. परंतु टिळक प्लॅटफार्मवर गेल्यावेळीं नेमस्तांच्या गुंडाकडून जेव्हा दंगा झाला त्या वेळीं बेळगावाहून गोविंदरावांनीं नेलेले कांहीं प्रतिनिधि आणि वऱ्हाडचे कांहीं प्रतिनिधि टिळकांच्या भोंवतीं आजूबाजूला होते. काँग्रेस अधिवेशन उधळल्यानंतर लोकमान्य एका टांग्यातून आपल्या निवासस्थानीं गेले. त्या वेळीं त्यांच्या टांग्याबरोबर श्री. गोविंदराव याळगी व ह. भ. प. दत्तोपंत पटवर्धन पळत टिळकांच्या निवासस्थानापर्यंत गेले होते. याच वेळीं गोविंदरावांचा व बंगालच्या बारिंद्र वगैरे क्रांतिकारकांचा संबंध आला, तो पुढें वाढतच गेला.

प्रकरण चौदावें

# 'राष्ट्रमत' दैनिक

लो. टिळकाना राजद्रोहाच्या आरोपाखालीं ६ वर्षांची शिक्षा झाली. राष्ट्रजागृति व समाजात नवें चैतन्य निर्माण करणारा मुख्य पुढारीच उचलून दूर नेल्यामुळें सर्व अनुयायी व सहकारी लोकामध्यें एक प्रकारचा पोरकेपणा आला. व 'पुढे काय ?' हा प्रश्न सर्व लहानथोरापुढें उत्पन्न झाला. टिळक बाहेर असतानाच राष्ट्रीय जहाल पक्षाचे हातीं प्रचारसाधन म्हणून एक मराठी दैनिक मुंबईस असावें ही कल्पना निघून त्याला मूर्त रूपहि आलें होतें. 'राष्ट्रमत'या नावानें एक दैनिक सुरू झालें. त्यासाठीं मुंबईस एक जागा भाड्यानें घेतली. कोल्हापूरचे गणपतराव मोडक, वीर वामनराव जोशी, हरिभाऊ फाटक, गोपाळराव ओगले; पटवर्धन, दत्तोपंत आपटे, काकासाहेब कालेलकर, स्वामी आनंद, बाबासाहेब परांजपे, सीतारामपंत टामले, धामणकर वगैरे कार्यकर्ते त्यात काम करीत होते. वरील नावावरून कोणाच्याहि ध्यानात ही गोष्ट सहज येईल कीं, उमरावतीची राष्ट्रीय शाळा बंद पडल्यानंतर त्या संस्थेंतील बहुतेक शिक्षक या 'राष्ट्रमत' पत्रामध्यें येऊन सामील झाले आहेत.

या पत्राशी गंगाधरराव-गोविंदरावाचा संबंध आला. पहिलें एक वर्ष तें पत्र चालविल्यानंतर त्याची सर्व जबाबदारी व व्यवस्था सन १९०९ मध्यें गंगाधररावानीं आपल्या हातीं घेतली. गंगाधरराव जेथें जातील, ज्यात भाग घेतील तेथें गोविंदराव येणारच! 'कृष्ण तेथे धनुर्धर' हें ठरल्याप्रमाणेच आहे. गोविंदरावानीं आपल्या संबंधिताना त्यात पडेल तें काम करण्यासाठीं मुंबईस पाठवून दिलें. श्री. कृष्णराव याळगी याना सराफी दुकानातून काढून 'राष्ट्रमत' पत्रात पाठवून दिलें. शिरहट्टीचे दोन तरुण-हणमंत नरगुंदे व ओक-बेळगावात शिक्षण घेण्यासाठीं याळगी कुटुंबाच्या आश्रयाला येऊन राहिले होते. त्यानाहि गोविंदरावानीं मुंबईस 'राष्ट्रमत' पत्रात काम करण्यासाठीं पाठवून दिलें. गोविंदरावाच्या सहवासात बाळू कुलकर्णी या नावाचा एक विद्यार्थी होता. त्याला 'हडीबाग' नावानें संबोधलें जात असे.

त्यालाहि याच कामाकरिता मुंबईस पाठविण्यात आलें. हे सर्व तरुण विनावेतनच काम करीत असत.

या पत्राची एजन्सी गोविंदरावानीं आपल्या नावानें घेतलेली होती. ही एजन्सी घेण्यामध्यें गोविंदरावाचा हेतु होता. 'राष्ट्रमत' पत्राचे अंक घेण्यासाठीं त्याना स्टेशनच्या प्लॅटफार्मवर त्या निमित्तानें जाता येत होतें. त्यातूनच क्रांतिकारकाचे फोटो आणवून शहरात ते विकण्याचेंहि काम साधत होतें. परगावाहून कोण अधिकारी कशासाठीं बेळगावास येत आहेत त्यावर नजर ठेवण्यासहि हा फलाटप्रवेश गोविंदरावाना उपयोगी पडत असे. *गंगाधरराव-गोविंदराव याच्याविरुद्ध कोल्हापूर दरबार,* कोल्हापूरकर महाराज व कोल्हापूरचे पोलीस अधिकारी वगैरेंच्या हालचालीवर नजर राखण्यास गोविंदरावाना यामुळें अधिक सोईचें जात असे.

या 'राष्ट्रमत' पत्रात काम करणारी गंगाधररावाच्या नेतृत्वाखालीं वर उल्लेखिलेली सर्व मडळी या धंद्यात नवीन असल्यामुळें व्यापार आतबट्ट्याचा न होईल तरच नवल ! ! लोकमान्यानीं सुरू केलेलें वर्तमानपत्र बंद पडू द्यावयाचें नाहीं अशा चंग बाधूनच ही तरुण कार्यकर्ती मडळी अक्षरश अहोरात्र मेहनत करून तें दैनिक चागल्या प्रकारें चालविण्याची शिकस्त करीत होती परकीय सरकारच्या राजनीतीवर अत्यत निर्भीडपणें मार्मिक व जहाल टीका या पत्रातून केली जात असे व ती वाचकाना रोज वेळेवर वाचावयास मिळत असे. हजारों रुपये बेळगावहून नेऊन तें पत्र चालवावें लागत होतें. या कामीं गंगाधररावाना बारा हजार रुपये तरी खर्च करावे लागले आहेत. अखेर १९१० सालीं सरकारच्या रोषाला तें पत्र बळी पडले. सरकारनें त्या पत्राकडे जबर जामीन मागितल्यामुळें तें पत्रच बद करणें भाग पडलें

हें पत्र सन १९०८ ऑगस्ट ते १९१० मेपर्यंत चाललें. पण तेवढ्या अल्प काळातहि त्या पत्रानें आपली छाप जनमानसावर खूपच बसविली होती 'राष्ट्रमत' पत्राबद्दल गोविंदराव गंगाधररावाना विशेष आस्था वाटण्याचेंहि तसेंच एक बलवत्तर कारण होतें. *टिळकाचा खटला हायकोर्टपुढें निघण्यापूर्वी काहीं दिवस गंगाधरराव* मुंबईस खटल्याकरता व टिळकाना भेटण्याकरता गेले होते खटल्याचा निकाल लागेपर्यंत ते मुंबईसच होते. गंगाधरराव दोनतीन वेळा टिळकाना तुरुगात व हायकोर्टातहि भेटले होते. एका भेटींत टिळकानीं नवीन निघालेल्या 'राष्ट्रमत' पत्राकडे लक्ष देण्याबद्दल गंगाधररावाना सागितलें होतें. त्यामुळेंच 'राष्ट्रमत' पत्राचा व गंगाधररावाचा सबध आला. आणि गंगाधररावाचा त्या पत्राशीं संबध म्हणजे गोविंदरावाचा व त्याच्या मित्रमडळींचा संबध हें ओघानेंच आलें. 'राष्ट्रमत' निघत होतें त्याच इमारतींत *एका मजल्यावर कोल्हापूरचे गणपतराव मोडक राहात असत.* गणपतराव मोडक हे 'राष्ट्रमत' पत्राच्या सहसपादकापैकीं एक होते गंगाधरराव त्या मुक्कामात त्याच्याच घरीं उतरले होते. गंगाधररावाच्या स्वभावाप्रमाणें अनाठायीं

नाक खुपसण्याचें त्यांना कधींच आवडत नसे. आपली आवश्यकता सर्वांना भासू लागल्याचें दिसून आल्यानंतर योग्य समय जाणून मगच गंगाधरराव त्या पत्राची व्यवस्था आपल्या हातीं घेण्यास तयार झाले. तोंपर्यंत बाहेरूनच त्या पत्राला मदत पोंचवीत असत व त्या पत्राची भलाई चिंतीत असत.

मुंबईहून श्री. गणपतराव मोडकांकडून राष्ट्रमताच्या आर्थिक हलाखीविषयीं गंगाधररावांना आलेल्या पत्रांत पैशाच्या अभावीं हें पत्र बंद पडणार असल्याचें नमूद केलें होतें. आणि तेवढ्याचसाठीं तार करून गंगाधररावांना मुंबईस बोलावलें होतें. तेव्हां जोखमीची बाब आहे, हें ओळखून गंगाधररावांनीं आपल्या वडिलांचा आणि गोविंदरावांचा सल्ला घेतला होता. दोघांनींहि मुंबईस जाण्याचा सल्ला त्यांना दिलेला होता. पण दोघांची या बाबतींतील कारणपरंपरा अगदीं भिन्न होती. गंगाधररावांच्या वडिलांना वाटलें कीं, दुसऱ्या कोठल्यातरी क्रांतिकारकाच्या प्रकरणांत गुंतून राहण्यास चिरंजीवाला सवड देण्यापेक्षा वर्तमानपत्र चालविण्यासारख्या एखाद्या कामांत तो गुंतून राहिला तर वाईट नाहीं, मग त्यांत कांहीं आर्थिक ओझें सोसावें लागलें तरी चालेल. असा विचार करून कांहीं थोडी रक्कमहि देऊन त्यांनीं गंगाधररावांस मुंबईस जाण्यास परवानगी दिली. आणि 'राष्ट्रमता'च्या बाबतींत टिळकांची इच्छा काय होती हें माहीत असल्यामुळें 'टिळकांचें पत्र' बंद पडूं नये या हेतूनें गोविंदरावांनीं प्रोत्साहन दिलें होतें. गंगाधरराव मुंबईस गेल्यावर शेठ मनमोहनदास रामजी यांची जागा महिना २०० रु. भाड्यानें कोणतीहि मुदत वगैरेची अट न घालतां घेण्यांत आली. गंगाधरराव स्वतः त्या घरांत रहावयासहि गेले. जो नवीन माल किंवा मशिनरी घ्यावी लागेल ती रोखीनेंच घ्यावी असें गंगाधररावांनीं ठरविलें होतें. कंपनीच्या डायरेक्टर्सची सभा होऊन छापखाना व पत्र गंगाधररावांच्या स्वाधीन करण्याचा ठराव मंजूर झाला.

'राष्ट्रमत'मधील लेखनाच्या बाबतींत बदल करण्याची आवश्यकता भासू लागली. बॅ. बॅप्टिस्टा इंग्रजींतून मधूनमधून लेख लिहून देत असत. त्यांचें मराठी भाषांतर करून प्रसिद्ध केलें जात असे. 'केसरी'चे श्री न. चिं. केळकर किंवा श्री. कृ. प्र. खाडीलकर यांच्यापैकीं कोणीतरी मिळाले असते तर 'राष्ट्रमता'ला पाहिजेच होते. शिवरामपंत परांजपे यांच्या काळपत्राचे संपादक श्री. वासुदेव सोमण पुण्याहून आठवड्यांतून एकदोन दिवस मुंबईस येऊन 'राष्ट्रमता'साठीं लेख लिहून देत असत. श्री. सोमण हे 'काळ' पत्राचे संपादक असतांनाच गंगाधररावांचा व 'राष्ट्रमता'चा संबंध आला होता व तेवढ्यान हेतूनें ते पुण्यामधील 'काळ'चें काम आटोपून 'राष्ट्रमता'ला मदत करण्यासाठीं मुंबईस येत, पडेल तें लेखन करीत आणि पुन्हा आठवड्याअखेर 'काळ'कडे परत पुण्यास जात असत.

याच सुमारास वऱ्हाडांतील राष्ट्रीय शाळा सरकारनें बंद केल्या होत्या. त्यामुळें

त्या राष्ट्रीय शाळातील शिक्षक बेकार झाले होते. त्यापैकीं अमरावतीचे वामनराव जोशी—पुढे वीर वामनराव म्हणून प्रसिद्धि पावलेले—'राष्ट्रमत' पत्रात येऊन दाखल झाले. 'राष्ट्रमता'ची आर्थिक परिस्थिति चागली नसल्यामुळें लेखनासाठीं अधिक लेखक जोडून घेता येण्यासारखे नव्हते. पण 'आपण हौसेनें लेख लिहीत असल्यानें कोणत्याहि प्रकारच्या मोबदल्याची आपल्याला इच्छा नाहीं. माझे जे लेख सपादकाना पसत असतील तेवढेच त्यानीं प्रसिद्ध करावेत. सर्व गोष्टी सपादकाच्याच मर्जीवर आहेत' असे स्पष्टपणें वामनरावानीं सागून टाकल्यामुळे त्याचा प्रश्नच निकालात निघाला. सपादकवर्गाशीं वामनराव एकजीव व एकमत झाले इतिहाससशोधक श्री. दत्तोपत आपटे व श्री. हरिभाऊ फाटक याचीहि तीच स्थिति होती. शेवटीं श्री. आपटे याच्या नावानें डिक्लेरेशन करून 'राष्ट्रमत' चालू झालें. या मडळी पैकीं पगार असा कोणीच घेत नसे. खानावळींत भोजन चागलें मिळत नसल्यामुळें एक आचारी ठेवून स्वयपाक करण्याची व्यवस्था सुरू झाली. या 'राष्ट्रमता'च्या इमारतींत जागा भरपूर असल्यामुळें रा. ब. गणेश व्यकटेश जोशी, कृष्णाजीपत खाडीलकर, नरसोपत केळकर, वासुकाका जोशी, डॉ. बाबासाहेब पराजपे, काका पाटील, माधवरावजी अणे वगैरे मडळी तेथे येत, उतरत व रहात असत. लिहिण्याचें काम सपल्यानतर पत्राचें ध्येयधोरण ठरविण्यासाठीं सर्वच मडळी मिळून चर्चेला बसत असत. राजकीय क्षेत्रात पत्राचें धोरण अरविंदबाबूच्या 'वदेमातरम्' पत्राप्रमाणें असावें, याच निर्णयाला ही मडळी आलेली होती. पुढे या इमारतीला 'राष्ट्रमठ' असेच नाव ओघानें व यथार्थपणें पडले होतें

या 'राष्ट्रमत' पत्राशीं स्वामी आनद, व काकासाहेब कालेलकर याचा सबध आलेला आहे. वऱ्हाडच्या मडळींशीं स्वामी आनद याचा पूर्वीचा सबध होता. म्हणून ते 'राष्ट्रमठ' मध्ये राहावयास येऊ लागले. त्याना गुजराती व मराठी दोन्ही भाषा चागल्या येत. 'राष्ट्रमता'ची गुजराती आवृत्ति काढण्याची कल्पना निघून ती प्रत्यक्षातहि आली होती. काकासाहेब कालेलकर 'राष्ट्रमत'मध्ये आले त्या वेळीं ते बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाले असून एल्एल्. बी च्या टर्म्स भरीत होते. नाशिकच्या डॉ. विष्णुपत भट याच्या ओळखीमुळें ते 'राष्ट्रमत' पत्राकडे व गगाधररावाच्याकडे आकर्षित झाले. ते व त्याचें कुटुब बेळगावजवळील शहापूर गावचेंच असल्यामुळें त्याच्याविषयींचा आपलेपणा गगाधररावाच्या मनात वाढू लागला होता. काकासाहेब कालेलकर हे बुद्धिमान असून निश्चयी स्वभावाचे आहेत, असे गगाधररावाना दिसून आलें. असल्या बुद्धिमान तरुणानीं सरकारी नोकरींत किंवा वकिलीचा धदा करीत आपलें आयुष्य घालवू नये असें गगाधररावाना वाटत असल्यामुळें, काकासाहेबानीं वकील होण्याचा नाद सोडावा व आपणास येऊन मिळावें असे गगाधररावानीं त्यांना सुचविलें. काकासाहेबानींहि विशेष विचार न करता व वेळहि न लावतां आपलें

विन्हाड राष्ट्रमठात आणून ठेवलें आणि वकिलीच्या अभ्यासास कायमचा रामराम ठोकला.

आणखी एक संस्मरणीय आठवण सांगून हें प्रकरण संपवितों. 'राष्ट्रमता'ला आर्थिक टंचाई भासत होती. त्या वेळीं तपस्वी बाबासाहेब पराजपे वऱ्हाडांतून कांहीं पैसे जमवून घेऊन येतों असें सांगून वऱ्हाडात निघून गेले आणि दहापधरा दिवसांतच दोन हजार रुपये घेऊन परत आले. 'राष्ट्रमता'त काम करणाऱ्या गंगाधरराव व इतर सर्व यांना वाटलें कीं, लोकांच्याकडून निधि जमवून हे पैसे त्यांनीं आणले आहेत. स्वतः डॉ. पराजपे यांनीं याविषयीं कांहींच वाच्यता केली नाहीं. पण पुढें कांहीं दिवसांनंतर कळून आलें कीं, यांनीं आपली एक जमीन विकून ही रकम आणिलेली होती. अशा त्यागवृत्तीचे व कडव्या देशभक्तीचे व कार्यकनिष्ठ योग्यतेचे महाभाग या राष्ट्रमठात रहात असत.



प्रकरण पंधरावें

# याळगी बंधूंचा मातृवियोग

वडिलाच्या पश्चात् याळगी बधूवर आईचें छत्र असल्यामुळें घराकडे विशेष लक्ष देण्याची जरुरीच कोणास भासली नाहीं. घरामध्यें सर्व काहीं व्यवस्थित चाल्लें होतें. ती माउली घर उत्तम चाल्वीत असे. एवढेंच नव्हे तर आपल्या मुलाना कधीं नाउमेद करीत नसे. एकदा गोविंदरावाच्या एका सोनार मित्रानें त्याना व्यापारासाठीं खानापूर गावीं बोलावून नेलें. पाचशें रुपयाचा सौदा आहे असें त्यानें सागितलें होतें. त्या प्रसंगीं हातात रोख रक्कम नसल्यामुळें घरचे दागिने गहाण टाकून गोविंदरावानी रक्कम उभी केली. दादा आपल्या मित्राबरोबर तो सौदा पटवण्यासाठीं खानापुरास गेले. तेथें गेल्यावर एका घराचे कट्टयावर दादाना बसवून तो सोनार आत गेला. थोड्या वेळानें परत येऊन तो दादाच्याकडे दोनशें रुपये मागू लागला. पिशवी सोडून त्या वेळीं मोजत कोण बसतो! ती पाचशें रुपयाची थैलीच त्यानीं त्याच्या हवालीं केली. ती घेऊन तो मित्र आत गेला. बराच वेळ झाला तरी सोनार मित्र घराबाहेर येण्याचें चिन्ह दिसेना. दादाना सशय आला. त्यानीं आणखी थोडा वेळ त्या कट्टया वरच बसून काढला. तरी तो बाहेर आला नाहीं. दादा संशयातून जागे झाले आणि उठून आत शिरले. पण आत होते कोण? मागल्या दारानें मित्र केव्हाच पसार झाला होता. त्यानें प्रथमपासूनच दादाना फसविण्याचा घाट घातला असावा. एकदा आत जाऊन कोणाशीं तरी बाटाघाट करून बाहेर आल्याची ती केवळ बतावणी होती. सारा बनवानवी करण्याचाच प्रकार. थोडीच रक्कम प्रथम मागणें, रक्कम घेऊन आत जाणें, आणि जणु हा चोरीचाच मामला आहे या थाटानें धन्यासमक्ष काहींहि न करण्याची दक्षता व या सर्व व्यापारात दादाना विश्वासानें बाहेरच थोपवून धरणें या गोष्टी अट्टल भामट्याला शोभण्याजोग्याच होत्या. दादाच्या डोक्यात चक्क प्रकाश पडला. आपल्या विश्वासाचीं शिंगेंचआपल्या घाताला कारण झालीं, हें समजण्यास वेळ लागला नाहीं. पण एवढें होईतों चागले तास दोन तास गेले होते. आता

जवळपास त्याचा कोठें शोध लागणेंच शक्य नव्हतें. त्यांनीं ही हकीकत ताबडतोब फौजदार कचेरींत कळविली. आणि रेल्वे तिकिटासाठीं एका मित्राकडून पैसे घेऊन सन्ध्याकाळच्या गाडीनें गोविंदरावदादा बेळगांवास परत फिरले. आपण हातोहात फसलों, आपल्याजवळील मोठ्या रकमेचा अपहार झाला, याचें दुःख गोविंदरावांना अतोनात झालें, त्यापेक्षांहि आपण फसल्याची लाज अधिक वाटली. घरीं आल्यावर ते कोणाशींहि बोलले नाहींत. पण मातृहृदयाला मुलाचें अंतरंग त्याच्या चेहऱ्यावर वाचता येतें! दादा आज सकाळपासून बाहेर गेला होता, त्यानें कांहीं खाल्लें नव्हतें कीं घोटभर पाणीहि पोटांत घेतलें नव्हतें. तो व्यापारासाठीं मोठी रक्कम घेऊन बाहेर गेला होता. आणि आता परत आला तर असा अबोल आहे! माउलीला संशय आला. तिनें दादाच्याकडे चौकशी केली. नुसतें 'काय झालें?' या प्रश्नाचें उत्तर देण्याऐवजीं दादांना रडेंच कोसळलें. त्या अश्राप दुःखाश्रूंशीं माउलीच्या पोटात चर्र झालें. कांहीं तरी घोटाळा झाला आहे याची खात्री झाली. परंतु दादाच्या तोंडून सर्व हकीगत समजून घेतल्यावर त्या शांतपणें म्हणाल्या, 'अरे, तुम्ही सुखरूप असल्यावर असे रुपये किती आले काय नि गेले काय, त्याची परवा नाहीं. आपण एखाद्यावर विश्वास टाकावा आणि आपणाला त्यानें फसवावें, यांत आपला कांहीं दोष नाहीं. चूक आहे विश्वासाला पात्र न ठरणाराची. झालें तें झालें! आता विनाकारण मनाला लावून घेऊन कुढत बसण्यांत राम नाहीं. यापुढें मात्र कोणावरहि विश्वास टाकण्यापूर्वीं चांगला विचार कर म्हणजे झालें!!'

आईच्या तोंडचे हे मायेचे शब्द ऐकताच गोविंदरावांना धीर आला. त्यांनीं तिच्या पायावर भरल्या अंतःकरणानें आणि डबडबल्या नेत्रांनीं डोकें ठेवलें. यापुढें दादाची चोखंदळबुद्धि कधींहि झोपीं गेली नाहीं. गोविंदरावांनीं त्या सोनारावर विश्वासघाताची रीतसर फिर्याद कोर्टांत दाखल केली. त्याचा निकाल होऊन मॅजिस्ट्रेटनीं त्याला कैदेची शिक्षा दिली. त्यावर त्यानें अपील केलें. त्या वेळीं क्लेमट नावाचे न्यायाधीश होते. त्यांनीं न्यायदानाचें काम एका बाजूला ठेवून दिलें आणि गोविंदराव एक राजकीय चळवळे आहेत, हाच विचार तो खटला चालवीत असता आपल्या नजरेपुढें ठेवला आणि त्यांच्या विरुद्ध निकाल द्यावयाचा असें ठरवून त्यांनीं खालच्या कोर्टाचा निकाल फिरविला; आणि विश्वासघातक्याला सोडून दिलें. असा आंद घरचा नि दारचा न्याय!

ताराच्या म्हणजे आपल्या मुलीच्या मृत्यूचा धक्का त्यांच्या आईच्या मनावर बसलेला होताच. आपल्या मुलींच्यासंबंधानें आई सावलीसारखी असे. तिला ताराचा विशेष लळा तर होताच. पण सर्वांत लहान अपत्य जीवनरावच असल्यामुळे त्याचा जीवदृष्टि आईकडे आदं घेत असे. जीवनराव आईला सोडून शिक्षणासाठीं दूर जाईपर्यंत याची त्याला कल्पना नव्हती. हें लहान अपत्य कोल्हापूर येथें 'समर्थ

विद्यालया'त दाखल होण्यासाठीं प्रथमच घर सोडून आईवेगळें राहावयास गेलें त्या वेळीं त्याला वियोगाची तीव्र जाणीव झाली आईची आठवण वारवार येई, मन उदास होई, काहीं तरी चुकल्याचुकल्यासारखें वाटे. परंतु 'समर्थ विद्यालय' ही राष्ट्रीय संस्था आहे, ती आपल्या गावीं नको असें कोल्हापूर दरबारला वाटू लागलें. एका दृष्टीनें कोल्हापूरकर घाबरलेच. त्यामुळें तें विद्यालय दोनतीन महिन्यापुरतें मिरजेंत आलें. मिरजेच्या श्रीमंत बाळासाहेबांनीं कृष्णाबाईच्या घाटावरील आपला विशाल वाडा त्या शाळेसाठीं दिला. समर्थ विद्यालय मिरजच्या घाटावर आलें. विद्यालयाचा गणपति उत्सवहि मिरजेंत झाला. कृष्णामाईच्या तीरावर मुलांचा वेळ मोठ्या मजेंत गेला. अण्णासाहेब विजापूरकर, वामन मल्हार जोशी यांच्यासारख्या प्रेमळ व कळकळीच्या गुरुजनांच्या सहवासात मुलांचा उत्साह वाढत असे. पुढें तळेगाव येथें समर्थ विद्यालयासाठीं जागा मिळाली. विद्यालय शेम्याच्या हवेलींत गेलें. आणि तेथील एक देवालय स्वयंपाकासाठीं व भोजनासाठीं विद्यालयास मिळालें. सर्व मुलांना त्यांच्या त्यांच्या घरून बोलावण्यात आलें त्यामुळें जीवनरावानाहि घर सोडून तळेगावास जावें लागलें. तळेगावला येण्यासंबंधींचें पत्र आल्या दिवसापासून त्यांच्या घरीं गंभीर वातावरण निर्माण झालें. त्याला सरकारी शाळेंतून काढून परगांवीं म्हणजे कोल्हापुरास पाठविण्याचें ठरलें त्या वेळीं केवळ दादांच्या म्हणजे गोविंदरावाच्या शब्दासाठींच सर्वांनीं संमति दिली होती. घरीं आईनें किंवा इतर भावंडांनींहि आढेवेढे घेतले नाहींत. पण आता हा मुलगा तळेगावास जाणार हें कळल्यापासून आईच्या डोळ्याचें पाणी खळलें नाहीं. जणु काय पुन्हा या मुलाची भेट आपल्याला होईल किंवा नाहीं अशी शंकाच आईच्या चित्तात डाचत होती हा बाळजीव तळेगावीं जाण्यास निघाला त्या वेळीं तर आईच्या अंतःकरणाची फारच घालमेल झाली. त्याची सर्व व्यवस्था, सामानाची बांधाबांध आई व भावंडें अशी सर्वजणच करीत होती. त्याच्या स्नेह्यासोबत्यांना पुरण्याइतकें फराळाचें करून त्याच्याबरोबर देण्यात आलें. मुलगा तेथें पोहोंचला. पोंचल्याचें पत्रहि घरीं आल. तो आपल्या मित्रमंडळींत रमून रंगून गेला. शाळेचें काम व अभ्यास व्यवस्थित सुरू झाला. विद्यार्थी दोन महिने तळेगावात राहिले, मग संस्थेनें खरीदलेल्या जागेवर बांधविलेल्या झोपड्यामध्ये 'समर्थ विद्यालय' नेण्यात आलें. आजूबाजूला सह्याद्रीच्या सुंदर हिरव्यागार टेकड्या, थोड्याच अंतरावर पावन इंद्रायणीचें रम्य पात्र, पहाटेचें नित्य गंगास्नान, सायंकालीन टेकडीवरील सहल, आट्यापाट्या आणि हुतुतूसारखे खेळ, व्यायामशाळेंतील नमस्कार, कुस्ती आणि मल्लखांब, आगाशेगुरुजींच्या शिस्तींत कवाईत करणें आणि शाळेंत अभ्यास करणें यामुळें विद्यार्थ्यांचीं शरीरें व मनें सतेज राहत, तीं तरतरीत बनत व त्यांचा विद्यालयीन वेळ आनंदात व मजेंत जाई. जीवनराव काहीं यात अपवाद नव्हे, तोहि तिथें रमून गेला.

परंतु सन १९०८ च्या फेब्रुवारी महिन्यांत एके दिवशीं सकाळीं सुमारें आठ वाजतां गोविंदरावांचे स्नेही श्री. तात्या जोगळेकर तळेगावच्या विद्यालयांत आले. विद्यालयाचे व्यवस्थापक तात्यासाहेब करंदीकर यांच्याशीं त्यांचें बोलणें झालें. गोविंदरावांनीं व्यवस्थापकाच्या नांवें दिलेलें पत्रहि त्यांना देण्यांत आलें. नंतर श्री. तात्यासाहेब करंदीकरांनीं जीवनरावांना बोलावून कळवलें कीं, 'तुझी आई आजारी आहे, म्हणून तुला बेळगावास नेण्यासाठीं हे गृहस्थ आले आहेत. लौकर जेवण आटोपून घे. आपलें सामान, वळकटी घेऊन तू यांच्याबरोबर जा.' मुलाबरोबरच पाहुण्याच्या जेवणाची व्यवस्था करण्यांत आली. सार्टरबरोबरच हा मुलगा पुण्यांत आला. मेलच्या वेळेपर्यंत त्या सार्टरच्या ऑफिसमध्येंच त्याला वेळ काढावा लागला. आई आजारी आहे, हें कळल्यापासूनच त्या मुलाच्या डोक्यांत काय काहूर माजलें असेल याची कल्पना कोणीहि सहृदय मनुष्य करूं शकेल. त्याला घरीं नेण्यासाठीं घरचें कोणीहि माणूस मुद्दामच स्टेशनवर गेलें नव्हतें. कारण आईच्या मृत्यूची वार्ता स्टेशनवरच त्यास कळवावी लागली असती. मुलगा एकटाच घरीं येऊन पोहोंचला. घरांतील कोणीच त्याच्याबरोबर बोलेना. घरांतील सर्व खोल्या आईला शोधण्यासाठीं तो धुंडाळीत होता, शेवटीं घरांत आईचें अंथरूण नाहीं असें पाहून त्यानें वहिनींना विचारलें, 'आई कुठें आहे?' त्यांनीं एकदम हंबरडाच फोडला व म्हणाल्या, 'आतां आई कोठली? आतां मीच तुमची आई!' त्या मुलाला कांहींच सुचेना व कशाचाच उलगडा होईना. मग त्यानें दादाचा तपास केला. आपला लहान भाऊ कोणत्या गाडीनें पुण्याहून येणार आहे तें माहीत असतांहि, त्या लहान जिवलगाचें समाधान करणें कठीण काम आहे हें जाणून, त्याला आल्याबरोबर भेटण्याचें धैर्य गोविंदरावांना झालें नाहीं. पहिला धक्का झेलण्याचें दुर्धर काम वहिनीवर सोंपवून ते बाजूला राहिले होते. कांहीं वेळानें ते पुढें आले व त्या लहानग्याला जवळ घेऊन आईच्या आजाराची व मृत्यूची सर्व हकीगत हळूहळू त्याला सांगितली. आई शुद्धीवर असेपर्यंत आपल्या या लहान अपत्याच्या भेटीची इच्छा करीत होती ही गोष्ट कळल्यानंतर त्या मुलाला भडभडून आलें. तो ओक्साबोक्शी रडूं लागला. त्याच्या डोळ्यांपुढून आईची मूर्ति हालेना. अश्रू झरत होते पण मूर्ति विरत नव्हती. कितीतरी वेळ तो तिच्याच ध्यानांत होता. डोळ्यांपुढें मूर्ति होती पण मुखांतून शब्द फुटत नव्हता. शेवटीं एकच उसासा आला ' आई! आई!! आई!!!



प्रकरण सोळावें

# क्रांतिकारकांची जडणघडण

चळवळ राजकीय असो कीं सामाजिक असो ती जनतेमध्यें फोफावण्याला किंवा ती देशव्यापी होण्याला जशी जनतेच्या निकडीच्या प्रश्नाची गरज असते, त्यातून मार्ग काढण्यासाठीं आंतरिक तळमळ असावी लागते, त्याप्रमाणेंच सत्तेविरुद्ध प्रक्षोभ उत्पन्न होण्यासारखा कांहीं तरी प्रमाद सरकारकडून व्हावा लागतो. सन १९०५ नंतर बेळगांवांत प्लेग फैलावला. आणि मानवी सामर्थ्यापलीकडे असलेलें अस्मानी कारण सुद्धां त्याला उपयोगी पडलें होतें. हल्लीं बेळगांवांत जेथें जंगल खात्याची कचेरी आहे तेथें पूर्वीं नागरिक रुग्णालय होतें. म्हणून तेथूनहि लांब म्हणजे किल्ल्यासमोर जें तळें आहे त्या तुरकमट्टी माळाकडील बांधाच्या बाजूनें प्लेगचें क्वारंटाईन म्हणजे रोगनिवारा होता. त्या परित्राणालयांत प्लेगप्रतिबंधक लस टोचण्याची सोय केलेली होती. त्यासाठीं युरोपियन अधिकारी वेळीं अवेळीं बेदरकारपणें कोणाच्याहि घरांत शिरून, स्त्री–पुरुष असा भेद न करतां, प्रत्येक कुटुंबीय माणसाला धरून लस टोचण्यासाठीं सक्तीनें घेऊन जात. हा सुई मारण्याचा कार्यक्रम बेळगांव म्युनिसिपल मराठी मुलांची शाळा नं. १ येथेंहि होई. स्त्रियांना तो परपुरुषाचा स्पर्श असह्य होई. आपल्यावर तो अन्याय आहे, जाच आहे असें स्त्रियांना वाटूं लागलें. त्यामुळें त्या या जुलुमाविरुद्ध असत. 'स्त्रीरोदनं बलं बलम्' या न्यायानें लोकमत प्रक्षुब्ध होण्यास मदत झाली. संशयित लोकांना त्या रोगनिवाऱ्याच्या खातेऱ्यांत नेऊन टाकीत. पंढीवाऱ्यांत रुग्णांचे किती हाल होत असतील याकडे कोणाहि अधिकाऱ्याचें लक्ष नसे. कोणीं तक्रार केली तरीहि तो दाद घेत नसे. अशा स्थितींत रोगी दगावला तर त्या रुग्णाचें प्रेत जागच्या जागींच पडून असे. तो रोग सांसर्गिक असल्यामुळें त्याची वासलात त्याच्या नातेवाइकांनाहि अधिकारी लावूं देत नसत. शेवटीं नाइलाजानें त्या रुग्णसुरक्षालयाच्या झोपडीलाच आग लावून प्रेत अर्धेकच्चें जसें जळेल तसें जळूं देत. कांहीं वेळां तर तो मृत देह पशुपक्ष्याप्रमाणें तेथेंच टाकून कोल्ह्याकुत्र्यांच्या हवालीं

होई. रक्तामासाचे संबंध या प्लेगच्या कसोटीला या सत्ताधिकाऱ्यापुढें पार कोठल्या कोठें नाहीसे होत. जुलुमी सत्तेचा बेळगावकरांना हा पहिलावहिला अनुभव अंगावर शहारे आणणारा आहे. अशा प्रकारें रोज तीनशें लोकांचे बळी या प्लेगोबाला मिळत बेळगावातील अगदीं पहिला प्लेगबळी ऐन तुळशीच्या लग्नादिवशींच बकरीमंडईच्या बाजूला पडला होता. हा रोगी पुण्याहून लागण होऊनच आलेला होता असें म्हणतात. परंतु नार्वेकर गल्ली, रिसालदार गल्ली, व गवळी गल्ली याचे फाटे येथूनच फुटत असल्यामुळें हा भाग सरकारनेंच रहदारीला बंद करून टाकला. साहजिकच लोकांना थोड्याशा अंतरासाठीं दोनचार फर्लांगाच्या अंतराची वाटचाल करावी लागे गरजेपायीं रात्रंदिवस हाल होऊं लागले. तरी सरकारला त्याचें काय? जनतेच्या प्रक्षोभाला मात्र इंधन मिळत गलें!!

या बाबतींत नियतीचीसुद्धा ही ठरलेलीच योजना होती असें म्हणावें लागतें पुण्यामध्येंहि प्लेगचा कहर झाला. सरकारहि बेफिकीर वृत्तीनें बेरकार वागूं लागलें. जनता खवळली आणि जळत्या प्रक्षोभाचा परिणाम रँडसाहेबाच्या खुनापर्यंत गला. हा इतिहास सर्वश्रुतच आहे. जनक्षोभाच्या ज्वाळा धडधडत होत्या आणि सरकारविरुद्ध चेतावणीच्या कामीं लोकपुढाऱ्यांनींहि त्याचा होईल तेवढा उपयोग करून घेतला.

अशा रीतीनें तयार झालेल्या वातावरणातच बेळगावातील तरुण क्रांतिकारकांचा एक वर्ग निर्माण होत होता. त्याला स्वरूप येण्यास सुमारें दहा वर्षें लागलीं. त्या तरुणवर्गाची कार्यपद्धति आपोआपच घडत होती. बेळगावातील लोकमान्यांचें आगमन त्याला पोषकच होत असे हा लाभ बेळगावकरांना एकतीन वेळा झाला तथापि कोणत्याहि कामासंबंधीं विचार आला आणि कार्य झालें असें सहसा होत नाहीं. त्यासाठीं चांगला आठपंधरा दिवस खल होतो, उलटसुलट विचाराचें मंथन होतें व त्या विवेकाचें कृतात रूपांतर होण्यापूर्वी कोणत्या कामासाठीं कोण उपयोगी पडेल? कोणतें साधन हाताशीं असलं पाहिजे? कार्याचा परिणाम काय घडेल! यश येईल कीं अपयश येईल? याहि गोष्टींचा दूरवर विचार करून पहिले पाऊल टाकावें लागतें सामान्यतः गंगाधरराव देशपांडे, बाबासाहेब सोमण, गोविंदराव याळगी, हणमंतराव देशपांडे ही मंडळी रोज रात्रीं गंगाधररावाच्या घरीं चर्चेसाठीं जमत असे. तास दोन तास त्याचीं रोज बोलणीं होत. साधकबाधक विचार होई. चुसळ तापूं लागली कीं वेळेचेंच भान उडून जाई आणि रात्रीं बारा वाजल्यानंतरच प्रत्येकजण घरीं परत जाण्यासाठीं उठत असे. काम करायचें ठरल्यानंतर पुन. त्यात दोन भाग पडत एक भाग गंगाधरराव व बाबासाहेबांचा असे तर दुसरा भाग गोविंदराव–हणमंतराव यांचा असे. पहिला विभाग बौद्धिक बाजू सांभाळीत असे. योजना, युक्ति, आणि कायदा यांच्याविषयींच्या सर्व सूचना त्यांच्याकडून मिळत आणि त्या सूचना मिळाल्यानंतर

दुसरा भाग कार्याला लागे. त्याचा कार्यक्रम, कार्यपद्धति अथवा कार्याची चळवळ त्याची तो पाहून घेई.

अशा प्रकारें कार्याचा आराखडा तयार झाल्यानंतर गोविंदराव व हणमंतराव देशपांडे आणि त्यांचे कांहीं निवडक साथीदार खडे बाजारातील विठोबाच्या देवळातील माडीवर जमत. तेथें वासुदेवराव फडके व टेंगशे त्यांना मदत करीत. यांना उत्तम नकाशे करता येत. गोविंदराव त्यांना आपल्या योजना समजावून सांगत व त्यांच्या कडून त्या योजनांचे नकाशे तयार करवून घेत. मानचित्रें तयार करीत असतां सुचलेल्या नव्या कल्पना किंवा अडचणी पुन: गंगाधररावांच्यापुढें मांडून त्यांच्या मताचा अंदाज घेतला जाई. क्वचित् पुन: चर्चाहि घडे व योजना सुधारली जाई. अशा रीतीनें काम निश्चित झालें की गोविंदराव व हणमंतराव वेगवेगळ्या मार्गांनीं ती योजना प्रत्यक्षात आणण्याच्या कामाला लागत. त्यामुळें यश दृष्टीच्या टप्प्यात येत असे.

सरकार दरबारचें काम म्हणजे अधिकाऱ्यांच्या हालचाली, त्यांच्या ठिकठिकाणच्या नोंदी व टिपणें, कागदपत्रांच्या नकला घेणें, पुढाऱ्यांच्या चळवळींवर पायबंद घालण्या साठीं योजलेले सरकारी हुकूम, सूचना वगैरेंची इत्थंभूत माहिती रा. बैतमंगलकर, विनायकराव अर्जुनवाडकर आणि गुडी यांच्यामार्फत गोविंदराव मिळवीत असत. या स्थानिक बातमीखेरीज बाहेरच्या बातमीसाठीं म्हणून श्री. बळवंतराव काकतकर व त्यांचे साहाय्यक म्हणजे गोविंद व दत्तू पराजपे यांचें विशेष साहाय्य होत असे. हे दोघे त्या वेळीं रेल्वेमधील फराळाच्या डब्यात म्हणजे Refreshment Car मध्यें जी भट्टी असे तेथें काम करीत असत. तेथें मिळेल त्या माहितीचें टिपण घरीं जाण्यापूर्वीं ते गोविंदराव याळगी यांच्याकडे देऊन जात. कधीं कधीं गोविंदराव त्यांच्या गाडीवर जाऊन माहिती आणीत असत माहिती मिळवण्याचे असले मार्ग दिवसानुदिवस वाढतच राहिले. त्यामुळें अमुक एक माहिती आली नाहीं असें क्वचितच घडत असे.

याशिवाय फलखानचे गंगूमामा हुक्केरीकर, गुराख्या दवाखान्यात काम करणारे गोपाळराव पाचलग, सोनार, शिंपी अशीं कितीतरी माणसें माहिती मिळवण्यासाठीं गोविंदरावांनीं पेरून ठेवलेलीं होतीं या सर्व लहानमोठ्यांच्या विश्वासावर व मर्दानीवरच कोणतेंहि काम बेळगावात धडाडीनें व यशस्वीपणें करून दाखविणें गोविंदराव–गंगाधर-रावांना शक्य झालें.

**क्रांतिकारक चळवळीचा अंकुर :** बेळगावातील तरुणांनीं एक क्रांतिकारक संस्था चालविली होती. तिचं कार्य बाह्यतः वरीलप्रमाणेंच असलें तरी तिचें क्रांतिकार्य बारींद्रकुमार घोष यांच्यापासून स्फूर्ति घेऊन चालत असे. या संस्थेचे नाव 'मॅझिनी क्लब' असें होतें. या क्लबची पाऊलें स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्याच वळणानें पडत असावींत हें न सांगताहि कळण्यासारखें आहे. या क्लबात सावरकरांच्या 'मॅझिनी'चीं

पारायणें घडत. मातूर, गॅरिबाल्डी यासारख्या आत्माहुति देणाऱ्या वीरपुरुषांचीं चरित्रें अभ्यासिलीं जात. शिवाजी-उत्सवासारखे उत्सव साजरे होत. मागे सांगित लेल्या लक्ष्मी टेकडीमागील कालकुद्रीकराच्या आवारात तरुणांची निशाणबाजी चाले. त्यासाठीं लागणारीं पिस्तुलें व काडतुसें वगैरे दारुसामान बल्लारी व रायचूर भागातून मिळवण्यात आलें होतें. याचीं सर्व सूत्रें दे. भ. गोविंदराव याळगी या अत्यंत धाडसी व कसल्याहि अडचणीच्या प्रसंगावर मात करणाऱ्या तल्लख बुद्धीच्या तरुणाकडे होती. मॅझिनी वल्गानें 'बाँब कसे तयार करावेत?' या विषयावर सेनापति बापटांनी एक पुस्तक लिहिलें होतें, त्याची प्रत मिळवली आणि त्याच्याच मार्गदर्शनाखालीं हालचालीला सुरुवात केली. सेनापति बापटाकडून ती विद्या शिकून घेण्यासाठीं बेळगावहून १२ तरुण त्यांच्याकडे पाठविण्यात आले होते. 'अलार्म' नावाच्या बाँबची सिद्धताहि झाली. हे बाँब कुडचीच्या स्टेशनजवळील रेल्वेपूल उडविण्यासाठीं वापरूनहि पाहिले होते. पण त्या वेळीं क्रांतिकारकांना यश आलें नाहीं. पितळी फिरकीच्या तांब्यातून ते इकडे तिकडे हालविले जात. ते करवटींत बसविलेले असत. या प्रकारचे बाँब उडविण्याला वातीची जरूर असे. त्यामुळें त्या 'अलार्म' बाँबना 'वातीचे बाँब' असे म्हणत. बेळगावातील तरुण हातीं बाँब वागवू लागल्यामुळे क्रांतिकारकांच्या वातावरणात बेळगावकर मंडळीचा लौकिक वाढू लागला.

बेळगावला बाँब तयार करण्याचे प्रयत्न चालूच होते. त्यांत जी मंडळी असत त्यापैकी बेळगावहून जपानला जाऊन आलेले श्री. खटाव आणि निल्जकर हे दोघे तरुण होते. ते प्रत्यक्ष बाँब तयार करण्यात नसत. परंतु त्यांचा काड्याच्या पेट्या तयार करण्याचा कारखाना असल्यामुळें त्यांना रसायनाची माहिती होती. बाँब तयार करण्यासाठीं लागणारीं रसायनें त्यांच्याकडून मिळत असत. ही गोष्ट कोल्हापूरच्या दामू जोशी यास ठाऊक होती आणि म्हणूनच तो दुसऱ्या खेपेस कोल्हापुराहून बेळगावास आला तेव्हा त्यांच्याकडेच उतरला होता. त्या वेळीं त्यानें आपल्याबरोबर 'वातीच्या बाँबमध्यें वापरावयाचे स्फोटक एका पितळी फिरकीच्या तांब्यातून आणिले होते. ते गोविंदराव याळगी यांच्याकडे दिले. ती पूड तपासण्यासाठीं त्यांनीं खटाव यांच्याकडे पाठवावयाचें ठरविलें. त्यानंतर दोनतीन दिवसांनीं गंगाधरराव, गोविंदराव व दामू जोशी असे तिघेहि रा. निल्जकराकडे गेले. त्यांनीं त्या पुडीचा बाँबच्या कामीं उपयोग होईल अशी खात्री दिली. त्यातून एक चिमूटभर पूड घेऊन ती कागदांत गुंडाळली मग ती पुडी एका ऐरणीवर ठेवली व त्यावर एक घणाचा घाव घातला. त्यासरशीं त्याचा प्रचंड स्फोट झाला. हें प्रात्यक्षिक पाहिल्यानंतर गोविंदरावांनीं तो तांब्या, ती पूड आणि दामूनें आणलेलें एक पिस्तुल आपल्याजवळ ठेवून घेतलें. दामूचें काम यथासांग झालें. तो कोल्हापुरास परत गेला.

प्रकरण सतरावें

# पंढरीच्या वाळवंटांतील शपथ

पंढरपुरात कार्तिक शुद्ध ११ स महायात्रा भरते. त्या यात्रेस लो. टिळक याना बोलावून त्याच्या शुभहस्तें चतु सूत्रीपैकीं स्वदेशीच्या चळवळीस प्रारभ करावा असें पढरपूरच्या कार्यकर्त्यांनीं ठरविलें. सन १९०६ सालीं तेथे प्रदर्शन भरविण्यात आलें होतें. त्या वेळीं लोकमान्य प्रदर्शनाला आले होते. एकादशीला पढरपुरीं जाण्याचें लोकमान्यानीं कबूल केलें होतें. कोल्हापूरचे गणपतराव मोडक त्या वेळीं पढरपूरच्या इग्रजी शाळेचे हेडमास्तर होते. आणि कोल्हापूरचेच बापु सरदेसाई तेथील नगरसभेचे मुख्याधिकारी (चीफ ऑफिसर) होते. या दोघाच्या प्रोत्साहनानेंच लो. टिळकाना निमत्रण देण्याची कल्पना निघालेली होती. याच सुमारास दे. भ. गगाधरराव देशपाडे याचीं व्याख्यानें महाराष्ट्रात कित्येक ठिकाणीं गाजत होतीं. त्याचे अहवाल वृत्तपत्रातूनहि येऊ लागले होते. शिवाय लो. टिळक आणि दे. भ. गगाधरराव देशपाडे याची जोडी जमल्याचेंहि काहीं परिचिताना समजलें होतें. त्यामुळे या महायात्रेच्या वेळीं उपस्थित राहण्याचें निमत्रण त्यानाहि आलेलें होतें. गगाधरराव याच्याबरोबर हणमतराव देशपाडे हेहि पढरपुरास गेले होते. पुण्याहून पढरपुरास जाण्यासाठीं टिळक निघणार होते त्याच दिवशीं गगाधरराव व हणमतराव हे देशपाडेद्वय पुण्यास पोहोंचले. दोघानीं टिळकाच्याबरोबरच पढरपुरापर्यंत प्रवास केला. टिळकाच्याबरोबर चिंतामणराव वैद्य, डॉ. नानासाहेब देशमुख, वासुकाका जोशी, ठाण्याचे काका पाटील वगैरे मडळी होती. पढरपूर येथें थिएटरमध्यें भारताचार्य चिंतामणराव वैद्य याच्या अध्यक्षतेखालीं परिपत्रवजा एक सभा झाली. चिंतामणराव वैद्यानीं नुकताच राजकारणात प्रवेश करून लो. टिळकाच्या सल्ल्याप्रमाणें वागण्याचें ठरविलें होतें.

रात्रीं ब्रह्मचारी विष्णुबुवा जोग याच्या अध्यक्षतेखालीं चद्रभागेच्या वाळवटांत टिळकाचें भाषण झालें. 'देशातील कोट्यवधि लोकाची गरिबी दिसत असताना ती

दूर करण्याचा प्रयत्न न करता मुखानें नुसतें 'विठ्ठल विठ्ठल' म्हणत टाळ कुटीत राहिल्यानें विठ्ठलाची प्राप्ति होत नसते' अशा आशयाचें एक वाक्य लोकमान्यांच्या तोंडून आकस्मात निघालें. तें नकळत निघालेलें वाक्य काहीं हेतु ठेवून उच्चारलेलें नव्हतें. त्याला तादृश महत्त्वहि नव्हतें; परतु तेवढ्या साध्या वाक्यानेंहि वारकरी बिथरले. त्या भाविक लोकांमध्यें प्रक्षोभ उत्पन्न झाला. आपणा सर्वांना टिळकांनीं 'टाळकुटे' म्हटलें याचें त्यांना वैषम्य वाटलें. तेव्हा अध्यक्ष विष्णुबोवा जोगांना टिळकांच्या म्हणण्याचा भावार्थ त्या वारकरी बंधूंना समजावून द्यावा लागला. विष्णुबोवा जोग स्वतः वारकरी असून वारकरी संप्रदायात त्यांची प्रतिष्ठा होती. त्यांच्या शब्दाला मान होता. तेव्हा विष्णुबोवांनींच श्रोत्यांचें समाधान केल्यामुळें सभा शांतपणे पुढे चालू झाली. मग त्याच वाळवंटात गंगाधररावांचींहि व्याख्यानें झालीं. या परिषदेला लोकमान्यांचे जावई श्री. केतकर, विजापूरचे श्रीनिवासराव कौजलगी व आजरेकर वकील, नाशिकहून बाबासाहेब खेर आणि पंजाबचे काहीं पुढारी उपस्थित होते.

परिषदेचें काम संपल्यानंतर ही सर्व मंडळी मिळून टिळकांच्यासमवेत एकंदर देशस्थितीसंबधानें चर्चा करीत बसत. या चर्चेचा परिणाम म्हणून या लोकांनीं "'स्वराज्य' मिळविल्याशिवाय स्वस्थ बसावयाचें नाहीं, ब्रिटिशांना आपल्या देशामधून हाकललेंच पाहिजे. आणि आपसातील एकी अभंग राहिली पाहिजे व टिकविली पाहिजे. देशासाठीं आम्ही कसलेहि कष्ट सहन करण्यास तयार आहोंत, कोणतीहि गुप्त गोष्ट राष्ट्रहितासाठीं फोडणार नाहीं, व कोणालाहि कधींहि कपी देणार नाहीं," अशा आशयाच्या शपथा गीताग्रंथावर हात ठेवून घेतल्या होत्या. अशी शपथ वाहणान्यांमध्यें गंगाधरराव व हणमंतराव देशपांडे हे होते. या सुवर्णप्रसंगीं गोविंदराव याळगी तेथे नव्हते, पण गंगाधरराव व हणमंतराव पंढरपुराहून परत येताच त्यांच्या तोंडून ती हकीगत ऐकून गोविंदरावांना चुटपुट लागून राहिली. लौकरच त्यांनीं तशा प्रकारचा प्रसंग साधला आणि बेळगावच्या कार्यकर्त्यांकडून तशा प्रकारच्या शपथा घेवविल्या आणि आपणहि घेतली. त्या प्रसंगींहि गंगाधरराव व हणमंतराव देशपांडे पुन उपस्थित राहिले.

या शपथविधीचा परिणाम बेळगावच्या सार्वजनिक जीवनावर विशेष झाला. या शपथेची अमलबजावणी कशी करता येणें शक्य आहे याचा खल रोज रात्रीं गंगाधररावांच्या घरीं होत असे. आणि येथें जे विचार गोविंदराव ऐकत असत किंवा आपल्या मनाशीं नवी करीत असत त्यांची चर्चा व खल ते आपल्या मित्रमंडळीमध्यें करात असत. अशा विचारांनीं भारलेले कार्यकर्तेच शहरातील सार्वजनिक जीवनक्षेत्रात वावरत असल्यामुळें त्यांचा प्रतिध्वनि व प्रचार झाल्याशिवाय कसा राहील! जाहीर सभा हें प्रचाराचें साधन असलें तरी तें अगदींच वरवरचें आहे. घरोघरीं व परस्परांशीं आचरणानें जो प्रचार होतो त्याचेच संस्कार अधिक टिकाऊ व

परिणामकारक असतात. अशा प्रकारें प्रचाराचें भाडें काठोकाठ भरल्यानंतर जाहीर सभा व भाषणें आपोआप घडून येतात. त्यासाठीं वेगळे श्रम करावे लागत नाहींत. पंढरपुरातील वाळवटात शपथ घेणाऱ्या अन्य लोकांवर त्यांचा ठसा किती उमटला होता किंवा तो किती दिवस टिकला व त्यानीं आपल्या ठिकाणीं तो विचार किती रुजविला, त्याचा प्रत्यक्ष परिणाम काय दिसून आला या गोष्टींचा ऊहापोह करण्याचें हें स्थळ नव्हे.

बेळगावापुरता येथें विचार करावयाचा तर एवढें आपण खास म्हणू शकतों कीं, गोविंदराव बेळगावात असल्यामुळें, बेळगावावर मात्र त्याचा महत्त्वाचा पण टिकाऊ परिणाम झाला आहे यात शंका नाहीं. पंढरपुरातील त्या वाळवटात या प्रतिज्ञेमध्यें भाग घेणाऱ्या थोर लोकांचा परिचय जो गंगाधररावाना झाला होता त्याचा उपयोग बेळगावकराना त्यांच्या अनेक चळवळींमध्यें आणि अनेक प्रसंगामधून झालेला आहे. बेळगावच्या सार्वजनिक जीवनावर त्या वेळीं झालेले संस्कार आजहि दिसून येण्यासारखे आहेत. गोविंदरावानीं, ते पंढरपुरात गेले नसले तरी, आपल्या स्वतःच्या जीवनावर त्या प्रतिज्ञेची मुद्रा खोलवर उमटवलेली होती. गोविंदरावानीं स्वतःपुरतें तरी सुविचाराचें अपचन कधींच होऊ दिलेलें नाहीं. कोणत्याहि सुविचाराकडे साधनेच्या दृष्टीनेंच गोविंदराव पहात असत. कारण ते साहित्यिक नव्हते पण व्यवहारी साहित्याचे उपासक होते. त्यामुळें जो विचार कधींच प्रत्यक्षात येण्यासारखा नसेल किंवा ज्या सुविचाराचा उपयोग व्यवहारात होत नसेल, त्याला ते विशेष महत्त्व देत नसत. त्याची किंमत त्याना शोभेच्या वस्तूपेक्षा अधिक नव्हती. दिखाऊपणाला त्यांच्या स्वभावात स्थान नव्हतें, याचाहि कदाचित् तो परिणाम असेल.



परिणामकारक असतात. अशा प्रकारें प्रचाराचें भाडें कांटोकाट सरल्यानंतर जाहीर सभा व भाषणें आपोआप घडून येतात. त्यासाठीं वेगळे श्रम करावे लागत नाहींत. पंढरपुरांतील वाळवंटांत शपथ घेणाऱ्या अन्य लोकांवर त्याचा ठसा किती उमटला होता शिवा तो किती दिवस टिकला व त्यांनीं आपल्या ठिकाणीं तो विचार किती रुजविला, त्याचा प्रत्यक्ष परिणाम काय दिसून आला या गोष्टींचा उहापोह करण्याचें हें स्थल नव्हे.

प्रकरण अठरावें

# लोकमान्याची वेळगावातील दुसरी फेरी

बेळगावाच्या पहिल्या फेरीमध्यें लोकमान्यानीं बेळगावकराचीं मनें जिंकून घेतलेलीं होतीं. त्याचेंहि बेळगावाविषयींचे आकर्षण वाढू लागलें होतें. बेळगावच्या जनतेनें व कार्यकर्त्यांनीं त्याच्या राजकीय तत्त्वज्ञानाची वाटचाल सुरूच केलेली होती. त्यामुळें हा भाग सर्वस्वी आपल्या राजकीय पावलावर पाऊल टाकील व आपल्या पाठीशीं राहील याची दक्षता घेणे टिळकानाहि आवश्यक वाटत होतं. म्हणूनच दुसऱ्या म्हणजे पुढल्याच वर्षी टिळक पुनः बेळगावास आले. त्याचें आगमन गगाधरराव देशपाडे याच्या बदलत्या मतप्रणालीला पोषकच ठरलें. यानतर गगाधररावहि ना. गोखल्याचे अनुयायी म्हणून न राहता टिळकाचे भक्त बनले.

या खेपेस टिळकाची उतरण्याची सोय रा. रा. शामराव कालकुद्री यांच्या सुळेभावी माळावरील लक्ष्मीटेकामागील बगल्यात झाली होती. याचें खरें कारण असे होतें कीं, तेथे २०।२५ तरुण रात्रीच्या वेळीं लाठीगोथाटीचें शिक्षण घेत आणि क्रांतिकारकाच्या चळवळीचे मार्ग आक्रमीत. ते सर्व लोकमान्य टिळकाच्या नजरेस आणून देण्याचें काम बेळगावच्या पुढऱ्याना साधावयाचें होतें

बेळगावला आल्यानतर लोकमान्य धारवाड मार्गानें चिदबर स्वामीच्या उत्सवा करता गुर्लहोसूर येथें गले. त्याच्याबरोबर ३०।४० छकड्यातून तरुणाचा एक ताफाहि बेळगावहून निघाला. ही सर्व सघटना गोविंदराव याळगी यानींच केलेली होती. टिळकाचीं तेथील व्याख्यानें मराठी भाषतून झालीं आणि श्री. मुदवेडकर यानीं कानडीतून त्याचा अनुवाद केला. त्याच्याबरोबर या खेपेस श्री. शि. म. परांजपे होते. तथापि इकडील भागात त्याचें एकहि भाषण झालें नाहीं. टिळकानीं मात्र बहुतेक ठिकाणीं व्याख्यानें दिलीं. 'सरकारी शिक्षण व राष्ट्रीय शिक्षण' या विषयावरील त्याचें भाषण मात्र अनेकाच्या स्मरणात राहण्यासारखें झालें होतें. त्या व्याख्यानांत त्यांनीं स्पष्टपणें सागितलें होतें कीं, "महर्षि दादाभाई नौरोजी यानीं कॉंग्रेसच्या मुखानें

हिंदुस्थानचें ध्येय 'स्वराज्य' असल्याचें घोषित केलें. त्यामुळे लोकामध्ये विचार-क्रांति झाली. विचारामध्यें वीस वर्षांच्या प्रगतीइतकें अंतर एकाच वर्षात जनतेला कापता आलें. विचारातच का होईना आम्ही कितीतरी पुढें सरकलों. हा वेग अगाच रासावयाचा असेल तर राष्ट्रीय शिक्षणाचा अवलंब आवश्यक आहे. दादाभाई आणि रमेशचंद्र दत्त याच्या ग्रंथातून प्रतिपादलेले सिद्धान्तच आम्हीं आचरले पाहिजेत. तसें न झालें तर चालू सरकारी पद्धतीचें शिक्षण रगडे विद्वानच तयार करीत राहील त्याना स्वत च्या पायावर उभे राहता येणार नाहीं. आणि मग साहजिकच परावलंबन उर्फ नोकरी पत्करण्याखेरीज अन्य मार्ग त्या विद्यार्थ्यांना दिसणार नाहीं. उलट, राष्ट्रीय शिक्षण घेणारा विद्यार्थी 'मी स्वावलंबी कसा होईन' याकडे दृष्टि ठेवून आपलें शिक्षण पुरे करील. त्याला सरकारी नोकरीसाठीं पायपीट करावीच लागणार नाहीं. मारवाडी किंवा या भागातील लिंगायत यानीं कोणतें शिक्षण घेतलें आहे? हे लोक कितीसे नोकरींत आहेत? त्याना कधीं पोटाची पचाईत पडली आहे का? स्वत ला भाकरी मिळवून देणारें हें ज्ञान आपण आत्मसात् केले पाहिजे. असें शिक्षण देणाऱ्या राष्ट्रीय शाळा ठिकठिकाणीं चालू केल्या पाहिजेत." असे अत्यत कळकळीचें टिळकाचें भाषण झालें.

टिळक तेथून घमणी गाडीतून बेळगावकडे प्रवास करीत असताना वाटेंत त्याना 'केसरी' व 'टाइम्स' पत्रें वाचावयास मिळालीं. त्यातील एका प्रसगाच्या बातमीनें ते अत्यत अस्वस्थ झाले होते. वाटेच्या प्रवासाचा शीण, गाड्या उशीरा पोहोंचल्यानें झोपावयास झालेला उशीर, असे असूनसुद्धा त्याना गावापासून दूर असलेल्या त्या निवांत बगल्यातहि झोप येईना. ते अथरुणातच तळमळत होते. डोकें भणाणून गेलें. डोक्यातला विचार त्याना चैन पडू देईना. ते अथरुणातून उठून बाहेर गार वाऱ्याला आले. बाहेरच्या मोकळ्या पडवींत पण अधारातच ते विचारक्रान्त होऊन येरझारा घालू लागले. किती तरी वेळ ते तसेच फिरत होते. सहजगत्या गगाधररावहि झोंपेतून जागे झाले आणि निसर्गविधि उरकण्यासाठीं बाहेर आले. तों काळोखातच लोकमान्य शतपावली करत आहेत असे दृश्य त्यानीं पाहिलें. त्याना झोप लागली नाहीं व येत नाहीं हें उघडच दिसत होतें. तथापि गगाधररावानीं विचारलें, 'येथें नीट झोप नाहीं का येत?' त्यावर टिळक एवढेंच म्हणाले, 'आज वर्तमानपत्रात आलेली वीरनवालीची हकीगत वाचलीत ना?' गगाधररावानीं 'हो!' म्हणताच टिळक पुढें म्हणाले कीं, 'एका गोऱ्या अधिकाऱ्यानें व त्याच्या शिपायानें असहाय गरीब हिंदू स्त्रीची विटबना केली, तिच्यावर बलात्कार केला, शासनकर्तेच असे दुबळ्या प्रजेवर जुलूम करू लागले तर स्वस्थ कसे राहावयाचें? चीड येते, अगाचा तिळपापड होतो. मग झोप कशी येईल?' टिळकाच्या क्रोधाचा हा इगळ 'केसरी'नें या प्रकरणीं लिहिलेल्या लेखात अत्यत ज्वलतपणें चेतविला आहे. ते लिहितात,

"अमेरिकेसारख्या देशात असला प्रकार झाला असता तर लोकांनीं चौकशीची वाट न पहाता गुन्हेगाराचे हालहाल करून त्यास जिवंत जाळलें असतें. एका मडमेची अब्रू घेण्याचा प्रयत्न केल्याबद्दल एका हिंदी माणसास वीस वर्षें सक्तमजुरीची शिक्षा होते आणि वीरनवालीच्या जन्माचा सत्यानाश करणारे गुन्हेगार अजीबात दोषमुक्त होतात!! हा न्यायदेवतेचा उपमर्द नव्हे तर प्रत्यक्ष खून आहे." बिचारी वीरनवाली! तडा गेलेलें शील साधण्यापेक्षा तिनें आत्मत्याग पसंत केला! तिचा तळमळणारा आत्मा हें स्वाभिमानशून्य जग सोडून गला!!

*एका सामान्य भारतीयावर झालेला अन्याय म्हणजे स्वतःवरच झालेला जुलूम* होय; ही एकात्मता ज्या महात्म्याची, ही व्यापक देशभक्ति ज्या उदारमनस्क महापुरुषाची त्याच्यापुढे मस्तक नम्र केल्याशिवाय राहील असा कोण नतद्रष्ट असेल बरें!!

तरुणाना दांडपट्टा, लाठीबोथाटी वगैरे खेळाचें शिक्षण देण्यासाठीं गोविंदरावांनीं बळ्ळारीहून एक मुसलमान आणविला होता. त्याच्या दिग्दर्शनाखालीं रोज रात्रीं या खेळाचें शिक्षण कालकुंद्रीकराच्या बंगल्याच्या बाजूस असलेल्या मोकळ्या जागेत दिलें जात असे. त्यासाठीं १५।२० जवान आपला कामधंदा आटोपून गावाबाहेरच्या या ठिकाणीं जमत असत व खेळ खेळून संपल्यानंतर रात्रींच आपापल्या घरीं परत येत. हा कार्यक्रम टिळकांच्या नजरेस येण्याला व त्याच्या नजरेंत भरण्याला वेळ लागला नाहीं. त्यांना या तरुणांचें कौतुक करून समाधान व्यक्त केलें. निशाणबाजीचें शिक्षणहि येथेंच दिलें जात असे. पिस्तुलें व काडतुसेंहि गोविंदरावांकडूनच पुरविलीं जात.



प्रकरण एकोणिसावें

# एक अग्निदिव्य!

**महाराष्ट्रांतील राजकीय परिस्थिति आणि इंग्रज :** महाराष्ट्रातील अनेक जहाल चळवळींना ठेचून काढण्याचा व नामवंत देशभक्तांना दाबून टाकण्याचा प्रयत्न इंग्रज सरकार, मुंबई इलाखा सरकार करीतच होतें. त्याला कोल्हापूरच्या शाहूमहाराजांची प्रच्छन्न किंवा ज्वलजवळ उघड व हिरीरीची मदत मिळत असे, ही प्रसिद्ध गोष्ट आहे. शाहूमहाराज वास्तविक सर्व राष्ट्रीय चळवळींकडे सहेतुक दुर्लक्ष करीत होते. कोल्हापूरचा 'शिवाजी क्लब' शाहूमहाराजांच्या प्रेरणेनेंच काम करीत होता, असें म्हटल्यास तें सत्याला सोडून होणार नाहीं. परंतु कोल्हापुरातील जिरगे प्रकरणामुळें शाहूमहाराज अशा पेचांत सापडले होते कीं, त्यांनीं आपलें राज्य तरी गमवावें किंवा राष्ट्रीय चळवळ हाणून पाडण्यास इंग्रज सरकारला तनमनधनानें ते सांगतील त्या अटींची अगर त्यांच्या आवडीनिवडी व आशाआकांक्षा ओळखून मदत करावी, त्यांच्या तालावर नाचावें! या दोन *मार्गांव्यतिरिक्त शाहूमहाराजांना गत्यंतर उरलें नव्हतें. हें जिरगे प्रकरण काय* होतें? ती आडकथा येथें नको. त्या वेळीं मुंबईस सिडनहॅमसाहेब गव्हर्नर होते. महाराष्ट्रातील चळवळी कशा मारावयाच्या, या कामीं शाहूमहाराज हे एक उत्तम व समर्थ हस्तक त्यांना लाभले होते. वेदोक्त प्रकरण, ताईमहाराज प्रकरण, टामू जोशी बॉंब प्रकरण, विजापूरकर–मोडक–बाबूराव गोखले प्रभृतींना कोल्हापूर सोडावें लागणें वगैरे अनेक घडामोडींचे धागेदोरे वर वर्णन केलेल्या परिस्थितीला जोडावे लागतील. एवढेंच नव्हे तर, त्याशिवाय त्या चळवळींचा अर्थच लागू शकणार नाहीं. ब्राह्मण–ब्राह्मणेतर चळवळ यापूर्वींहि थोडीशी चालू असली तरी ती याच वेळीं एकदम फोफावण्याचें खरें कारण आपल्याला याच संदर्भामध्यें पहावें लागेल. परिस्थितीनें जिरगे प्रकरणामुळें असें वळण घेण्यापूर्वीं सर्व देशभक्तांना व जहाल देशसेवकांना शाहूमहाराज आपले व आपल्या चळवळीचे सहाय्यक

आहेत, असेंच विश्वासपूर्वक वाटत होतें. अनेक प्रसंगीं तसा अनुभवहि त्याना येत होता.

**वावटळीची धूळ बेळगांवपर्यंत पोहोंचली :** दामू जोशी याच्या बॉंब प्रकरणामुळें या वावटळीची धूळ बेळगावपर्यंत येऊन पोहोंचली. त्या वेळीं अगावर कामें व सकटें ओढून घेऊन काम करणारे गगाधरराव व गोविंदराव हे दोनच टिळकपक्षीय पुढारी बेळगावात होते. दामू जोशी याचा हा बॉंब पोलिटिकल एजंट मि. फेरिस याला मारण्यासाठीं तयार झालेला होता. त्यात बेळगावच्या पुढाऱ्याचा, दूरान्वयानें का होईना, हात होता. निदान तसा समज कोल्हापूर पोलीस, पोलिटिकल एजंट आणि मुंबई सरकार याचा झालेला होता. दामू जोशी याच्या कबुलीजबाबानें हा समज दृढ झाला आणि प्रत्यक्ष पुरावा मिळविण्यासाठीं याची चौकशी बेळगाव व आजूबाजूचा सबधित भाग यामध्यें होणार आहे, ही गोष्ट गोविंदराव याळगी याना समजलेली होती. शाहूमहाराजाचीं सर्व प्रकरणें उघडकीस आणण्यास पोलिटिकल एजंट मि. फेरिस हाच खरा कारणीभूत होता, असें शाहूमहाराजास वाटत होतें. फेरिसशिवाय हीं सर्व कुलगडीं इग्रज सरकारास कळलींच नसतीं असा त्याचा ठाम ग्रह झालेला होता. तें वाटणेंहि अगदींच निराधार नव्हतें. फेरिसला मारण्यात महाराजाचीहि मदत असावी, नव्हे, असलीच पाहिजे असें लोक मानीत होते. वास्तविक कोल्हापूर सस्थानच नव्हे तर इदूर, बडोदें यासारखीं कांहीं मोठीं सस्थानेंहि त्या काळीं इग्रजाविरुद्ध कांहीं उठाव व्हावा, असें वाटणारीं व प्रत्यक्षाप्रत्यक्ष सर्वतोपरी साह्य देण्याच्या विचाराचीं व खुमखुमीचीं होतीं अशीच साक्ष त्या वेळच्या इतिहासलेखकाला द्यावी लागल. बडोदा संस्थानाधिपताना नाइलाजानें भारताबाहेर जावें लागल होतें. मुंबई सरकारलाहि या सर्व परिस्थितीची जाणीव होतीच. आणि म्हणूनच या पोलिटिकल एजटाची म्हणजे मि. फेरिसची बदली करण्यात आलेली होती.

कोल्हापूर सोडून फेरिससाहेब निघून जाण्याच्या वेळीं, त्याच्याच गाडीनें जाऊन घोरपडी स्टेशनवर रिव्हाल्व्हर झाडून त्याला मारावें अशी योजना होती. त्यासाठीं दामू जोशी पिस्तुल घेऊन घोरपडीपर्यंत गेला होता. गोविंदरावाच्याजवळून कांहीं काडतुसें व एक पिस्तुल त्यानें मागून घेतलें होतें आणि त्याच्याच इच्छेप्रमाणें बेळगावमधील व्हेटरिनरी हॉस्पिटलमध्यें काम करणारे गोविंदरावाचे अत्यत विश्वासुक स्नेही गोपाळराव पाचलग त्याच्या मदतीस होते. या दोघाना पोंचविण्यासाठीं स्वत. गोविंदराव स्टेशनवर गेले होते. परतु घोरपडी विश्रामस्थ ऐनवेळीं पिस्तुलामध्यें कांहीं बिघाड झाला आणि त्यातून गोळी बाहेर निघूच शकली नाहीं, असें सांगत दामू जोशी व पाचलग बेळगावास परत आले. कदाचित् ऐनवेळीं पिस्तुल उडवून फेरिससाहेबास मारण्याचें धैर्यच त्याला झालें नसावें, असेंहि झालें असण्याचा दाट

संभव आहे. अर्थात् दामूच्या कार्याकडे डोळे लावून बसलेल्या बेळगावच्या मंडळीचा विरस झाला. गोविंदराव–गंगाधररावांना यापुढें जास्त सावध राहणें भागच होऊन बसलें. तीं काडतुसें व तें पिस्तुल गोविंदरावांच्याकडे सुपूर्द करून दामू परत निघून गेला. तो हनुमज्जयंतीचा दिवस होता. दामूची ही वागणूक संशयास्पद वाटते. त्यामुळेंच दामू हा सरकारचा हस्तक असावा अशी शंका येऊं लागली. गंगाधरराव–गोविंदराव यांच्यासारख्या असल्या कामांत मुरलेल्या माणसांना सावधानतेचा इषारा मिळाला. गोविंदरावांनीं तीं काडतुसें, पिस्तुल व रिव्हॉल्व्हर पितळी फिरकीच्या डब्यातील वातीचा 'अलार्म' बॉंब तात्काळ आपले सहकारी श्री. हणमंतराव देशपांडे यांच्याकडे मजगांव मुक्कामीं पाठविला, व त्या सर्व वस्तूंचा नाश करण्याची सूचनाहि देऊन ठेवली.

**कोल्हापूर दरबारचा बेळगावच्या देशभक्तांवरील डोळा :** फेरिस साहेबावरील हें संकट टळलें तरी सरकार आणि जहाल कार्यकर्ते दोघेहि जागे झाले. घेऊं नये तेथें संशय घेऊन, अत्यंत सावधानतेनें वागल्याशिवाय जगणें परकीय अमलांत वावरणाऱ्या देशभक्तांना मुष्कील होऊन बसतं. कोठें व कशी दीर्घ सावधगिरी ठेवावी लागे याचें एक ल्हानसें उदाहरण येथें सांगता येईल. बेळगावहून कोल्हापूरला पार्सलनें बटाटे पाठविण्यात आले होते. खरोखरी बटाटे पाठविलेले असूनहि *बटाट्याचा अर्थ बॉंब असा करून पोलिसांनीं त्याचें प्रकरण करणें शक्य आहे. वाघाचें* भूत व्हायला एवढा संशय पुरेसा आहे. गोविंदरावांना असा संशय मात्र आला. त्यांनीं लगेच पार्सलला लागलेल्या खर्चाची नोंद ज्या हिशोबाच्या वहींत होती तेवढीं वहींतील पानें त्यांनीं फाडलीं. काम तेवढ्यावर भागण्यासारखें नव्हतें. त्यामुळें उलट अधिकच गोंधळ झाला व त्यांनीं ती वहीच पुन: अथपासून इतिपर्यंत लिहून काढली. आणि ते निर्धास्त झाले. सन १९०८ साल्च्या सुप्रसिद्ध टिळक खटल्यानंतर मुंबईमध्यें आठ दिवस जो दंगा झाला, त्यांत अनेक युरोपियनांनाहि दंग्याचा प्रसाद मिळालेला होता. काहींना परधामाला जावें लागलें होतें. दामू जोशी आणि इतर अनेक मंडळी त्या वेळीं मुंबईसच होती. दामू मुंबईहून परत कोल्हापुरास येताच त्याला अटक झाली. इतर लोक मुंबईस होते ते मग कोल्हापुरास आलेच नाहींत. तेव्हांपासून कोल्हापूर दरबारची नजर बेळगावच्या देशभक्तांवर अधिकच खिळून राहिली.

***गोविंदरावांची धडाडी :*** *कोल्हापूर दरबार व त्याचे पोलीस खातें यांना बेळगावचे पोलीस व काहीं लब्धप्रतिष्ठित सरकारचे बातमीदार यांची जोड व सहकार लाभला यांत काहींच आश्चर्य नाहीं. या सर्वांवर बुद्धि व संघटना यांच्या बाबतींत* मात केल्यावाचून गंगाधरराव–गोविंदराव यांना जगताच येण्यासारखें नव्हतें. गोविंदराव *यांची धडाडी, समयसूचकता, दीर्घदृष्टि आणि लोकसंग्रहवृत्ति हे सर्व गुण* त्या काळीं कसाला लागले होते. त्यांत ते शंभर टक्के तावून सुलाखून निघाले

होते. त्या वेळीं प्रत्येक गाडीवर 'स्टेशनड्यूटी' पोलीस नेमलेला असे. परंतु हा 'स्टेशनड्यूटी पोलीस' म्हणजे गोविंदरावांचाच मनुष्य असावयाचा; कोणतीहि बातमी बेळगावच्या पोलीस कचेरींत कळण्यापूर्वी प्रथम ती गोविंदराव याळगींनाच कळत असे. तेव्हा स्टेशनवर फलाट तिकीट अस्तित्वातच नव्हतें. वर्तमानपत्राचीं पार्सलें पाहून घेण्यास त्याला विश्रामप्रवेश असे, तो मनुष्यहि गोविंदरावांचाच होता. काहीं चौकशीच्या कामासाठीं कोल्हापुराहून कोणी आल्यास त्याची बातमी प्रथम गोविंदरावांना व नंतरच बेळगावपोलिसांना कळत असल्यामुळें forewarned is forearmed या न्यायानें कोल्हापूर पोलिसांचे सर्व डाव किंवा कारस्थानें हाणून पाडण्यास गोविंदराव गंगाधररावांना अधिक सोपें जात असे. ही 'शास्त्री आणि शस्त्री'ची बुद्धिमान जोडी इंग्रज सरकार व कोल्हापूर दरबार यांना पुरून उरली होती. या दोघांच्यावर दोन्ही सरकारांनीं अधिकच दात धरला होता. जी गोष्ट अशा बातम्यासंबंधींची तीच गोष्ट टपाल व तार याची. सर्व पत्रें व तारा ज्याच्या त्यांना पोहोंचविण्यापूर्वी प्रथम गोविंदरावांना कळत. मारुतीगल्लीमध्यें बळवंतराव नाव या नावाचे एक फराळ दुकानदार रहात असत. त्यांच्या घरीं सर्व महत्त्वाचें टपाल व तारा गोविंदराव 'सेन्सॉर' करीत. यामुळें कोल्हापूर दरबारच्या सर्व कारवाया आणि त्याचे अनेक व्यूह यावर त्याची मात होऊं शकली, त्यांना तोडीस तोड काढणें सोपें झालें. प्रत्येक बाबतींत कोल्हापूर दरबारला नामोहरम व्हावें लागलें, माघार घ्यावी लागली. याचा परिणाम असा झाला कीं, गंगाधरराव—गोविंदराव यांच्याविषयींची अढी कोल्हापूर दरबारच्या मनात अधिकाधिक वाढत गेली, व धाडसाला तेज चढत गेलें.

*गफलत दुर्दैवी पण नशीब सिकंदर! :* दामू जोशी यानें कोल्हापूर पोलिसांपुढें कबुलीजबाब दिल्यानंतर एक पिस्तुल व एक फिरकीचा डब्या (बॉम्बचा मसाला असलेल्या) व तयार बाँब प्रत्यक्ष कोठें टेविले व कोणाच्या हातीं दिले हें पाहण्यासाठीं, दामू जोशीला घेऊन कोल्हापूरचे पोलीस रात्रीच्या गाडीनें बेळगाव स्टेशनवर उतरले, ते थेट मजगावला रवाना झाले. दुर्दैवानें त्याच दिवशीं त्याच गाडीला गोविंदरावांचा मनुष्य पावसामुळें गाडीच्या वेळेवर स्टेशनवर हजर राहू शकला नाहीं. थोडा वेळ झाला. यामुळें कोल्हापूर पोलीस दामू जोशीसह मजगांवला पोहोंचल्यानंतर ती बातमी बेळगावला गोविंदरावांना समजली. गोविंदरावांचीं माणसें पोलिसांच्या आधीं मजगावला जाऊं शकलीं नाहींत. दामू जोशीला बेळगावला आणणार आहेत ही बातमी गोविंदरावांना अगाऊ माहीत असतांना अशा प्रकारची गफलत व्हावी याचें सर्वांना दुःख झालें व लाजहि वाटली. श्री. हणमंतराव देशपांडे यांना त्याच रात्रीं मजगावला अटकहि झाली. आदल्या दिवशीं किंवा त्याच दिवशीं रात्रीं बेळगावात गंगाधरराव गोविंदराव यांना पकडून अटकेंत ठेवलें आहे, असें

मजगांवमध्यें पोलिसाच्या बोलण्यावरून श्री. हणमतराव देशपांडे याना समजताच त्यानीं बेळगावकडे जासूद पाठविले. अटक झाल्यामुळें श्री हणमतराव घाबरलेले तर नव्हतेच पण पोलिसाच्या वेटाळ्यात बसून अनेक महत्त्वाची सूत्रें ते हलवीत होते. त्या सबंध रात्रभर बेळगावात गोविंदरावाना झोप नव्हती. त्याच्या डोक्यातील चक्रें इतक्या वेगानें फिरत होतीं कीं, सामान्य मनुष्य तेवढ्या धक्क्यानें मटकन् खालीच बसला असता. पण गोविंदरावाच्या धीरवृत्तीनें अशाहि विषम परिस्थितींतून मार्ग काढला. त्यानी सहकाऱ्याना व बेळगावातील कार्यकर्त्यांना या प्रकरणाची कल्पना आणून दिली, त्याना आगें केलें व धीर दिला.

**पिस्तुल आणि फिरकीचा तांब्या :** पिस्तुल आणि फिरकीचा तांब्या मजगावमध्यें श्री. हणमतराव देशपांडे याच्या घरींच त्याच्या अटकेच्या वेळींहि होता. पोलिसाच्या गराड्यात असतानाच कोणत्या ना कोणत्या हिकमतीनें ते झडतीला विलंब लावीत होते. त्या अवधींत ते पिस्तुल व तो तांब्या लंपास करण्याची व्यवस्था हणमतरावानीं सावधपणें केली. पिस्तुल एका रयतेच्या घरीं गेलें आणि फिरकीचा तांब्या त्याच्या घरातील नोकर नागेश यानें लांबविला. एतावता झडतींत हणमतरावाच्या घरीं कांहींच मिळू शकलें नाहीं. मजगावात त्याच्या घराची झडती पुन: पुन: करून घेण्यात आली. भात भरून ठेवलेले तट्टे फोडले, भात चाळून तपासलें. पण तेथें कांहीं नव्हतेंच तर मिळणार कोठून? त्याच्या बेळगावच्या घराचीहि झडती झाली. तेथें एक जुना फिरकीचा तांब्या सापडला. तो तांब्या आपोआप भातातून गडगडत येताना पाहून, पोलीस अत्यंत भयभीत होऊन घराबाहेर पळाले, ते पुन: घरात येण्यास धजेनात. त्याना वाटे कीं, मलताच एकदम स्फोट झाला तर काय करा! श्री. शामराव काल्कुंद्रीकर याच्या घरीं एका नारळाच्या करवटीमध्यें सेतूची वाळू भरून ठेवलेली होती. ती यात्रेला जाताना काशीमध्यें न्यावयाची व सेतू गंगत सोडावयाचा म्हणजे यात्रा पूर्ण झाली, या समजुतीनें ठेवलेली होती. पण त्याला बॉम्ब समजून कोणताच पोलीस त्याला हात लावण्यास पुढें झाला नाहीं. अशा अनेक गमती रेखाटतां येण्यासारख्या आहेत. पण मी तो मोह आवरून आपल्या कथानकाकडे वळतों.

**कुडबुडे जोशी श्री. गंगूमामा हुक्केरी :** या सर्व गोंधळाच्या आधल्या दिवशींच श्री. गंगाधरराव मुंबईस गेले होते. त्याचे वडीलच फक्त (श्री. भाऊमाहेर) घरीं होते. गोविंदरावाना अटक झाली आहे कीं काय? गंगाधररावाना पकडलें तर नाहीं ना? अशी चुटपुट उगाच हणमतरावाना लागून राहिली होती. ती दूर करण्या साठीं गोविंदरावानीं एक नामी युक्ति योजिली. श्री. गंगूमामा हुक्केरी या नावाचे एक चलाख हिकमती व बहुरंगी गृहस्थ गोविंदराव याळगी याच्या संग्रहात होते. त्याना कुडबुडे जोशीचें सोंग देऊन मजगाव येथें म्हणजे हणमतराव देशपांडे याचे घरीं—

गावीं–पाठविले. गगूमामानीं आपलें काम अत्यंत चोख बजावलें. कुडबुड्ग जोशीचें सोंग घेऊन गगूमामा मजगावांत घरोघर भीक मागत आणि कुडबुडें वाजवीत, भिक्षेच्या त्या क्रमांत हणमंतरावांच्या दारीं आले. कुडबुडें किंचित् वेगानें पण जोरात कुडकुडलें. कानडी भाषेत सर्व बातमी हणमंतरावांना ऐकू जाईल अशा आवाजात गगूमामानीं सांगितली. कोल्हापूरच्या पोलिसांना कानडी भाषा समजत नव्हती. सोंगाची बतावणी गगूमामानीं आपल्याकडून अगदीं बेमालूम केली असली तरी त्यांना हणमंतरावानीं ओळखलें होतें ही त्यांतील खरी मौज आहे. नंतर हे कुडबुडे जोशी त्या पोलिसांतच तंबाखू ओढीत बसले आणि सहज गप्पा मारीत असतांना कोल्हापूर पोलिसांकडून काढतां येईल तेवढी बातमी काढून परत आले. गोविंदराव किंवा गंगाधरराव यांना अटक झालेली नाहीं व होणारहि नाहीं ही कुडबुड्याची बातमी ऐकून हणमंतरावांची काळजी दूर झाली.

कुडबुड्या जोशीनें आपल्या भाषेत सांगावें कीं, एक हत्ती येणार आहे व उगाल दूर नेणार आहे. हणमंतरावांना हें ज्योतिष समजत होत व त्या ज्योतिषांतील खरेपणाची ग्वाही ते पोलिसांना सांगत होते. साहजिकच पोलिसांनाहि कांहीं प्रश्न त्या जोशीबुवाला विचारावेसे वाटू लागले. त्यांनीं कांहीं प्रश्न त्या कुडबुड्याला विचारले आणि त्याचीं उत्तरें पोलिसांना दुभाषी हणमंतरावांमार्फत मिळू लागलीं. यांतील खरें कौशल्य हणमंतरावांच्या वाक्चातुरीचें आहे. कुडबुड्याला ते आपणास हवे ते प्रश्न विचारून कानडी भाषेतून उत्तरें मिळवीत आणि पोलिसांना रुचतील अशा भाषेत त्यांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें हणमंतराव मनसोक्त देत. असा हा कुडबुड्या जोशीचा खेळ आटोपून गगूमामानीं मजगांव सोडलें.

**हुदली कुमरींनहि एकसाथ झडती :** गोविंदराव गंगाधरराव यांना या कोल्हापूरच्या मानगडींत गुंतवण्यासाठीं, बेळगावमध्यें हणमंतरावांचें बेळगावांतील घर, गंगाधररावांचें घर, गोविंदरावांचें घर, गोपाळ पाचलग यांचें घर, कॅंटोन्मेंट गुराचा दवाखाना, हुदली खेड्यातील गंगाधररावांचा वाडा, आणि 'कुमरी' या नांवानें प्रसिद्ध असलेलें शेतमळ्याचें ठिकाण, इतक्या सर्व जागीं एकाच वेळेला झडती घेण्याचा व्यूह बेळगाव पोलीस व कोल्हापूर पोलीस यानीं रचला. या सर्व बातम्या गोविंदरावांना आगाऊच कळलेल्या असल्यामुळे पोलिसांच्या योजनेंतून पार होण्यासाठीं आगाऊ तयारी करून ठेवण्यास गोविंदरावांना पूर्ण सवड मिळाली होती. अर्थात् या पोलिसांना कोठेंच कांहींहि मिळू शकलें नाहीं. गंगाधरराव आदले दिवशींच मुंबईस गेले असल्यामुळें त्यांच्या घराची झडती पोलिसांना सहज घेतां आली. झडतींत महत्त्वाचें असें कांहींच मिळालें नाहीं. या घटना घडत असतां कोल्हापूरचा सी. आय. डी. अधिकारी मि. वालिंजर श्री. गंगाधररावांच्या घरीं बसून होता. गोविंदराव यांच्या घरीं श्री. गुडी यांची नेमणूक झडतीसाठीं झाली होती. मजगांव हा गांव संस्थानी

प्रदेशांतला असल्यामुळें तेथेंहि झडती रात्रींच घेतां आली. श्री. कालकुंद्रींच्यावर पोलिसांची फारशी भिस्त नव्हती. तरी तेंहि घर त्यांनीं रात्रींच पूर्वयोजनेप्रमाणें पाहून घेतलें. हुदली येथें कुमरी मळ्यामध्यें एक तलवार सांपडली होती. परंतु त्या मोडक्या तलवारीसाठीं पोलिसांची झडती नव्हतीच मुळी! झडतीमध्यें कोठेंच कांहींहि न मिळाल्यामुळें पोलीस व कोल्हापूर दरबार हे गंगाधरराव व गोविंदराव यांच्याविषयींचा अधिक जाज्वल्य द्वेष करूं लागले.



प्रकरण विसावें

# श्री. हणमंतराव देशपांडे यांच्यावरील बॉबखटला

दामू जोशी याचा संशय येताच गोविंदरावानीं आपल्याजवळील काडतुसे, पिस्तुलें, रिव्हॉल्हर, फिरकीच्या तांब्यातील स्फोटक पदार्थ श्री. हणमंतराव देशपांडे यांजकडे मजगाव मुक्कामीं पाठवून, या सर्व वस्तूंचा नाश करण्यास, हणमंतरावांना बजावलें होतें व त्याप्रमाणें सर्व व्यवस्था त्यांनीं आपल्याकडून होईल तितकी त्वरित केली. बॉम्ब तयार करणें व उडवणें यासंबंधींचें पुस्तक त्यांनीं जाळून टाकलें. पिस्तुलें मोडून तोडून टाकलीं. पितळेच्या तांब्यातील पूड तडागस्तृप्यतु केली. परंतु तो पितळेचा तांब्या नवाच होता. तो तांब्या मात्र घरचा गडी नागेश यानें नाहींसा केला नाहीं. उलट तो चांगला घासून पुसून स्वच्छ केला आणि आपल्या घरीं नेला. स्वतः करावयाच्या गोष्टी हणमंतरावांनीं विश्वासू नोकराकडून करवून घेतल्या आणि त्या चुकीचा परिणामहि हणमंतराव यांना भोगावा लागला.

बेळगावात एकाच वेळीं घेतल्या जाणाऱ्या झडत्याची सरकारी योजना अमलांत यावयाची होती, त्याच्या आधल्याच दिवशीं श्री. गंगाधरराव मुंबईस गेले होते. वाटेंत मिरजेच्या स्टेशनावर श्री. पागे व त्याच्या हाताखालचे कांहीं पोलीस अमलदार गंगाधररावांनीं पाहिले होते. श्री. पागे सुपरिंटेंडेंट कोल्हापुरास जात–येत असतात व कोल्हापुरास चाललेल्या खटल्यासंबंधानेंच ही कांहींतरी गडबड असावी असा कयास त्यांनीं त्या रात्रींच केला होता. सन १९०७ सालीं लो. टिळक गुर्लहोसुरास आले होते त्या वेळीं पागेहि आले होते. तेव्हा गंगाधरराव व पागे यांची ओळखहि झाली होती. अर्थात् हें प्रकरण काय आहे? ते कोठें चालले आहेत? याची सहज चौकशी करावी असें गंगाधररावांच्या मनांत आलें; पण पोलिसतपासात विनाकारण आपण कां ढवळाढवळ करावी अशा विचारानें त्यांनीं कांहींच चौकशी केली नाहीं. बेळगांवि येथें झालेल्या झडत्याचा वृत्तांत दुसऱ्या दिवशीं गंगाधररावांना वर्तमानपत्रांतून वाचावयास मिळाला.

बेळगावांत गंगाधररावांच्या घरामध्यें झडतींत मुद्याचें असें कांहींहि मिळालें नव्हतेंच. कांहीं दिवसापूर्वी पाध्ये, फर्नांडिस वगैरे मंडळी त्यांचेकडे आली होती त्या वेळचें एक टिप्पण गंगाधररावांनीं करून ठेवलें होतें. तेवढेंच पोलिसांनीं जप्त केलें. याशिवाय गणपतराव मोडकांनीं बटाट्याचें बियाणें गंगाधररावांकडे मागितलें होतें त्याबद्दलचें एक कार्ड आणि बखले यांनीं आवळे पाठवून देण्याबद्दल लिहिलेलें एक पत्र पोलिसांनीं जप्त केलें होतें. आवळे व बटाटे यांचा कांहीं भलताच अर्थ लावून बॉम्बचाच तो निर्देश आहे असें ठरविण्याची आशा पोलिसांना वाटत होती, पण दुसऱ्याच दिवशीं सरकारी फार्मवरून बटाटे पाठविल्याचा दाखलाहि त्यांना मिळाला. त्यामुळें पोलिसांना तेथेंहि निराश व्हावें लागलें. श्री. बखले यांच्याविषयीं संशय घेण्यास तरी जागाच नव्हती. म्हणून तोहि बार फुकट गेला. गंगाधररावांच्या घरीं प्रो. भानूंचें एक पत्र सापडलें होतें, त्यांत वेदांताचा कांहीं मजकूर होता. त्यांतून बॉंबचा अर्थ काढणें वा शोध लावणें पोलिसांच्या कुवतीच्या बाहेरचें काम होतें. गंगाधररावांच्या चारहि घरांत एकाच वेळीं झडत्या झाल्या होत्या.

गंगाधररावांनीं पागे वगैरे मंडळींना मिरज स्टेशनवर पाहिलें होतें त्याच रात्रीं ते बेळगाव स्टेशनवरून परस्पर मजगावला गेले. त्या वेळीं बेळगावांत प्लेग असल्यामुळें श्री. हणमंतराव देशपांडे मजगावास रहावयास गेले होते. रात्रीं एकदोन वाजण्याच्या सुमारास हणमंतरावांच्या घराला मजगावमध्यें पागे वगैरे पोलीस अधिकाऱ्यांनीं गराडा घातला व घराची झडती घेतली. पागे व पोलीस अधिकारी यांच्याबरोबर बुरख्यामध्यें एक व्यक्ति होती. ती व्यक्ति म्हणजे दामू जोशीच होय ही गोष्ट पुढें उघड झाली. हणमंतराव व त्यांचा नोकर नागेश यांच्या घराच्या झडतीमध्यें एक पितळेचा फिरकी तांब्या मिळाला. तो जप्त करून श्री. हणमंतरावांना अटक करण्यांत आली. मजगाव हा गाव कुरुंदवाड संस्थानांतील वडगाव तालुक्यापैकीं आहे. तथापि मजगावांत रात्रीं घातलेल्या छाप्यासंबधानें वडगावच्या पोलिसांना माहिती नव्हती. हणमंतरावांना पकडल्यानंतर त्यांना मारहाण करून गंगाधररावांचें नांव त्यांच्या तोंडून वदविण्याचा प्रयत्न झाला. पण पोलीस अधिकाऱ्यांना त्यांत यश आलें नाहीं.

**श्री. हणमंतराव आणि वार्लिजरसाहेब** : हणमंतरावांना कोल्हापूरला मि. वार्लिजर रहात असे तेथें 'कावळ्याचा बंगला' म्हणून प्रसिद्ध असलेल्या ठिकाणीं आणून ठेवण्यांत आलें होतें. तेथें ते एक आठवडाभर होते. कैदी या नात्यानें कोल्हापुरांत स्टेशनसमोरील ज्या खानावळीमध्ये रोज त्यांना भोजनासाठीं नेण्यांत येत होतें त्याच खानावळींत गोविंदरावांचीं माणसें—श्री. विनायकराव अर्जुनवाडकर, गोपाळराव रांगोळीकर, गोपाळराव देशपांडे, त्र्यंबकराव मुटवेडकर वगैरे— बाहेरचे व्यापारी म्हणून भोजनास मुद्दाम जात आणि कानडीमध्यें आपापसांत बोलून हणमंतराव

याच्या कानावर आपला आवाज जाईल असे करून त्याना बातम्या पुरवीत असत. याच खानावळींत दामू जोशी यासहि मोजनास आणीत असत. खानावळवाल्यानाहि अनुकूल करून घेण्यात आलें होतें. बातम्याची देवघेव करण्याचें तें एक वाहन किंवा साधनच होतें. हणमंतरावानीं वालिंजरचा विश्वास संपादन केला होता. म्हणून त्याच्या बंगल्यात हणमंतरावाना वाटेल तेथें जाण्यायेण्याची पूर्ण मुभा होती. हणमंतरावानीं आपलें निर्दोषत्व व प्रांजलपणा वालिंजरसाहेबास पटवून दिला होता. वालिंजरसाहेबानें हा बॉम्बकेस केवढा मोठा आहे व त्यात कोणकोणते प्रसिद्ध लोक गुंतलेले आहेत आणि यावर उपाय काय केला पाहिजे, यासंबद्दल एक गुप्त अहवाल लिहून त्याच्या काहीं प्रती काढविल्या होत्या. हणमंतरावानीं वालिंजरच्या ऑफिसमधून त्याची एक प्रत मिळविली. श्री. विनायकराव अर्जुनवाडकर, वालिंजरसाहेब बाहेर गेल्यावेळीं, त्याच्या बंगल्याच्या आजूबाजूलाच घिरट्या घालीत असत. त्याना वारंवार लघुशंकेला जावें लागे. त्याच्या लघुशंकेची जागा हणमंतरावाना ज्या कोठडित ठेवलें होतें तिच्या खिडकीखालींच होती. वालिंजरच्या ऑफिसातून चोरलेल्या अहवालाची एक प्रत खिडकींतून हणमंतरावानीं श्री. विनायकराव अर्जुनवाडकराना दिली. त्यामुळें सरकारचे पुढील बेत गंगाधररावाना कळून आले. इतकेंच नाहीं, तर त्याचा अप्रत्यक्ष उल्लेख व अंदाजहि 'राष्ट्रमत' पत्रामध्यें प्रसिद्ध झाला. ही गोष्ट वालिंजरसाहेबाच्या नजरेस आली. एके दिवशीं हणमंतरावाना त्यानें आपल्याबरोबर फिरावयास नेऊन विचारलें कीं, 'हणमंतराव, आमच्या ऑफिसातील बातम्या बाहेर कशा जात असतील बरें?' 'कोणालाहि या बाबतींत शिक्षा करणार नाहीं असे आपण मला वचन देत असाल तर मी आपल्याला तें सर्व सांगू शकेन.' अशी प्रस्तावना करून व त्याच्याकडून तसे स्पष्ट वचन घेऊन, बातम्या कशा फुटतात व कोण फोडतात त्याचीं नावें हणमंतरावानीं वालिंजरसाहेबास सांगितली. आपल्याला त्रास देणारे पोलीस व त्याचे अधिकारी म्हणजे जमादार नारायण कामत, तेंडोलकर, फर्नांडिस इ. नावें त्यात होती. वालिंजरसाहेब बंगल्यावर परत आल्यावर भयंकर चवताळला आणि कोल्हापूरच्या सर्व पोलिसाना त्यानें शिवीगाळ करून आपल्या बंगल्यावरून हाकलून दिलें. कोल्हापूरचा एकहि अधिकारी माझ्या बंगल्यावर येता कामा नये असेंहि त्यानें फर्मावलें.

'गंगाधररावानीं तुमच्यावर कोणती कामगिरी सोपविली होती?' या वालिंजरच्या प्रश्नाला हणमंतरावानीं उत्तर दिलें कीं, 'जाहीरसभेची सर्व तयारी— खुर्च्या, टेबलें व दिवे वगैरे वाहून नेणें, असलीं कामें गंगाधरराव आमच्यावर विश्वासानें सोपवीत असत.'

'तुम्ही अशा मोठमोठ्या चळवळी करतां मग गुप्त बातम्या काढण्यासाठीं कोणाची योजना तुम्हीं केली होती?' साहेबानें विचारलें.

'गुप्त बातम्या काढण्याची व्यवस्थाहि आमची आहे. बेळगावात एक विष्णु गाडगीळ नावाचा मनुष्य आहे, त्याच्याकडेच हें काम आहे. त्यानें सरकारचा मनुष्य म्हणूनच राहावयाचें व बातम्या मात्र आम्हाला पुरवावयाच्या अशी व्यवस्था आहे !' असा जबाब हणमतरावानीं दिला.

असल्या भाषणानीं हणमतरावाविषयीं वालिंजरची खात्री होऊन चुकली कीं, हणमतराव हा अगदी निर्दोष व साधाभोळा मनुष्य आहे. त्याला कशाकरता धरून आणलें आहे, हेच त्याला समजेना. वालिंजर एक प्रकारें त्याची स्तुतीच करीत होता. त्यानें पुढे आपल्या बगल्यावर राहावयासहि त्यास नेलें. पकडलेंच आहे तर काहींतरी निमित्तानें खटला भरावा व त्यात त्याला निर्दोषी म्हणून सोडावें असेंच वालिंजरसाहेबास वाटू लागलें.

**हणमंतरावांची सुटका :** हणमतरावाना पकडून नेल्याची बातमी अगदीं गुप्त ठेवण्यात आली होती. हणमतरावाच्या वडिलानीं वडगावचे मॅजिस्ट्रेट व पोलीस याच्याकडे तपास केला, पण त्याना काहीं माहिती मिळाली नाहीं. कुरुदवाड संस्थानचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट याच्याकडूनहि काहीं माहिती मिळेना. ही हकीकत गगाधररावाना समजल्यानतर त्यानीं मुंबईहून काका पाटील व बॅ. बॅप्टिस्टा याना कोल्हापुरास पोलिटिकल एजन्टकडे पाठविलें. तेथेंहि दाद लागली नसती तर हेबियस कॉर्पस कायद्याप्रमाणें दाद मागण्याचा विचार होता. ही सर्व गडबड चालली असता गोविंदराव याळगींनीं आपले गुप्त बातमीदार कुरुदवाड व कोल्हापूर येथ पाठविले होते. त्याच्यामार्फत कोल्हापुरास हणमतराव अटकेंत आहेत हें समजलें होतें. पण कायदेशीररीत्या ही गोष्ट उघडकीस येणें बाकी होतें, व तें जरूरहि होत. म्हणून काका पाटील व बॅ. बॅप्टिस्टा हे कोल्हापुरास पोलिटिकल एजटाच्या कानावर या गोष्टी घालून दाद मागावी म्हणून तिकडे गेले. कोल्हापुरच्या गडबडीचा इग्रजी अमलाखालील लोकाशीं सबध येत असल्यामुळें काहीं ब्रिटिश पोलीस अधिकारी कोल्हापूरच्या मदतीला देण्यात आले होते. त्यातच पागे हे एक अधिकारी होते. त्याच्याशिवाय वर उल्लेखिलेले वालिंजरसाहेब हेहि एक युरोपियन अधिकारी नेमण्यात आले होते ते कोल्हापूरच्या आहारीं सर्वस्वी गेले नव्हते व स्वतत्र विचारानें काम करीत होते असे म्हणतात. कोल्हापूरमध्यें वालिंजर याना भेटावयास प्रथम काका पाटील व बॅ बॅप्टिस्टा त्याच्या बगल्यावर गेले. त्याच वेळीं कर्मधर्मसयोगानें पोलिसानीं हणमतरावाना त्याच्या बगल्यात काहीं जबाब घ्यावा म्हणून आणिलेले होत. ही बातमी हणमतरावाचे वडील तेथें होते त्याना कळलेली होती, व ती त्यानीं काकाना सागितली. काका पाटील व बॅ. बॅप्टिस्टा हे वॉलिंजरशीं बोलत असता हणमतरावाच्या वडिलानीं बगल्याच्या एका औरहौसच्या दारावर लाथ मारून दार उघडलें. आत हणमतराव त्याना दिसले. ही हकीगत काकाना व बॅप्टिस्टाना त्यानीं कळविली. तेव्हा पोलिसाचा नाइलाज झाला.

आणि कुरुंदवाडच्या चौकशीकरता पाठविण्यासाठीं त्याना इकडे आणिल्याची बतावणी त्याना करावी लागली. समक्षासमक्षच या गोष्टी झाल्यामुळें हणमतरावाना कुरुंदवाडच्या अधिकाऱ्याच्या स्वाधीन करावें लागलें व हत्याराचा कायदा कलम १९ फ प्रमाणें त्याच्यावर खटला भरण्यात आला. हा गुन्हा जामिनाचा असल्यामुळें कुरुंदवाड मॅजिस्ट्रेटनें त्याना जामिनावर सोडले.

या खटल्यासाठीं हणमतरावाना कोल्हापुराहून बेळगावास आणलेल्या दिवशीं गोविंदराव मुद्दाम स्टेशनवर गले व गाडीच्या पलीकडे पण प्लॅटफार्मसमोरच्या बाजूस ते उभे राहिले. तेथून हणमतरावाची दृष्टादृष्ट होताच त्यानीं हाताच्या खुणेनें 'काय झालें ? मारपीट करून तुमच्याकडून काहीं वदवून घेतलें काय ?' असे विचारलें. त्या शिमग्यातील सोंगाप्रमाणें डाव्या हातातील तळव्यात धरलेलें उजव्या हाताचें मनगट हलवून खुणेनेंच हणमतरावानीं उत्तर दिले, 'मी त्याना काय घंटा सागणार !'

या खुणेचे दोघानीं दोन अर्थ केले होते. गोविंदरावाना वाटलें, 'काहीं भिण्याचें कारण नाहीं. हणमतरावाची मूर्ति भगलेली नाहीं.' पण गंगाधररावाचे वडील श्री. भाऊराव देशपांडे यानीं त्या खुणेचा अर्थ घेतला कीं, 'घात झाला. मी सर्व काहीं सागणार. तुम्हाला काय करायचें असेल तें करा.' श्री. गंगाधररावानीं आपलें मत दिलें कीं, 'गोविंदरावानीं लावलेला अर्थच बरोबर आहे !'

या खटल्याच्या कामीं अप्पा शिंपी व बाबू सोनार यानीं बातम्या काढण्याचें काम चोख बजावलें आहे.

**खटल्याचे पंख कातरले :** सरकारच्या व संस्थानिकाच्या हिंमती व कारवाया फोल ठरतात याचें खरें कारण गंगाधरराव-गोविंदराव याची संघटना, लोकसंग्रह आणि बुद्धिमत्ता होय असे कोल्हापूर दरबार व पोलीस याना वाटू लागलें, नव्हे, तसे प्रत्ययास आलें. गोपाळ पाचलग हा कॅन्टोन्मेंट पशुदवाखान्यामध्यें कापाउंडर म्हणून काम करीत होता. त्याला गंगाधरराव गोविंदराव यांच्या छत्राखालून काढून दूर नेल्यास त्याच्याकडून काहीं माहिती मिळू शकेल असा कयास पोलिसानीं बाधला, आणि त्याची रदनी चिक्कोडीस करी. तेथें त्यानें पोलिसापुढें माराच्या भीतीनें कबुलीजबाब दिला. त्यात त्यानें गंगाधरराव गोविंदराव हणमतराव या सर्वांचीं नावें सागितलीं होतीं. बाँबचा मसाला त्याच्याकडूनच त्यानीं मिळवला होता, याचीहि त्यानें कबुली दिली होती. परंतु नंतर त्याला पश्चात्ताप झाला. आपण ही घोडचूक केली, निमकहरामी केली असे त्यास वाटू लागलें. तशा अर्थाचें एक पत्रहि त्यानें श्री. गोविंदराव याळगी याना लिहून पाठवलें. श्री. हणमतराव यांच्यावर भरलेल्या खटल्यामध्यें सदर गोपाळ पाचलग हाहि एक महत्त्वाचा साक्षीदार म्हणून वापरला जाणार होता. श्री. गोपाळ पाचलगनें कितीहि काकुळतीनें गोविंदरावांना पत्र लिहिलें

असलें तरी त्याची पूर्ण परीक्षा पाहिल्याशिवाय गोविंदराव त्याच्याशीं एक शब्दहि बोलणार नाहींत, हें पक्कें होतें. त्याचा पश्चात्तापहि पक्का व्हावा म्हणून गोविंदरावहि प्रयत्न करीत राहिले. त्या दिवसामध्यें अनेक ठिकाणीं अशा प्रकारचे राजकीय खटले भरले जात होते. कित्येक ठिकाणीं माफीचे साक्षीदार—नरेंद्र गोसावीसारखेहि—सरकारला लाभले होते. तसल्या माफीच्या साक्षीदाराना त्यांचे इतर सहकारी आरोपी काय व कशी शिक्षा देत असत, लोकामध्यें त्याची कशी छी' थू होत असे, याचीं वर्णनें 'माला' पत्रामधून तेव्हा छापून येत असत. त्याचीं कात्रणें काढून तीं सर्व त्यानीं या पाचलगाकडे पाठविलीं. तीं वाचून त्यानें पुन: एक पश्चात्तापाचें पत्र गोविंदराव याना लिहिलें.

श्री. लक्ष्मणराव मास्तर या नावाची आणखी एक चीज गोविंदरावाच्या संग्रहीं होती. या लक्ष्मणरावाला त्यानीं गोपाळ पाचलगाकडे पाठवलें. तो चिकोडीस पशुदवा खान्यात काम करीत होता. तीन दिवसाची रजा घेऊन गोपाळ पाचलग दवाखान्यातून बाहेर पडला तो अद्यापि परत आलेला नाहीं. त्याला गोविंदरावानीं हरिद्वारकडे पाठविलें. त्याच्या पत्नीलाहि पुढें कांहीं दिवसानीं कै. बाबासाहेब सोमण हरिद्वारला पोहोंचवून आले. त्याची एक मुलगी गोविंदरावाच्या घरीं होती. ती सन १९१६ मध्यें बेळगाव येथेंच प्लेगनें वारली. श्री. गोपाळराव पाचलग कांहीं वर्षे मध्यप्रांतात पुराणिक म्हणून उदरनिर्वाह करीत होते. त्या वेळीं तेथें ते दुसऱ्या नावाखालीं वावरत असताना अटक होणार होती. परंतु पोलिसाच्या हातावर तुरी देऊन तो तेथून फरारी झाला, आणि पुढें कधींहि पोलिसाच्या हातीं लागला नाहीं. श्री. हणमतराव देशपांडे यांच्यावरील खटल्यामध्यें पोलिसानीं गोळा केलेल्या पुराव्याचे पत्ते अशा प्रकारें गोविंदराव यशस्वी रीतीनें छाटत असत. त्यामुळें हणमतरावाच्या खटल्यात जीवच शिल्लक राहिला नाहीं.

**दोन पिस्तुलें व 'विद्याविलास'चा अंक :** हणमतरावाच्या घरझडतींत कांहींच न मिळाल्यामुळें कोल्हापूर पोलिसानीं दुसरींच दोन पिस्तुलें एका वर्तमानपत्रात गुंडाळून व वर एक कापड बांधून एका रयताकरवीं तीं पोलिसाकडे हजर करविलीं; आणि 'हणमतरावानीं तीं माझ्याकडे ठेवण्यास दिलीं आहेत,' असें त्याच्याकडून वदविलें. परंतु कोर्टामध्यें हा बनावट पुरावा पोलिसाच्या अंगावर आला. ता. ४ मे १९०९ रोजीं हणमतरावाना अटक झाली. आणि 'अटक होण्यापूर्वीं हीं दोन पिस्तुलें अशींच याच वर्तमानपत्रामध्यें गुंडाळून व असेच फडकें बांधून माझ्याकडे दिलीं आहेत,' असें रयताच्या तोंडून वदविलें होतें. पण या निर्बुद्ध पोलिसाच्या ध्यानात ही गोष्ट आली नाहीं कीं, त्या पिस्तुलावर गुंडाळलेला 'विद्याविलास'चा अंक ता. ९ मे १९०९ चा होता. अर्थात् ता. ९ मे १९०९ च्या अंकात गुंडाळलेलीं पिस्तुलें ता. ४ मे १९०९ रोजीं हणमतरावानीं दिलीं कशीं ? हा प्रश्न कोर्टात उभा राहिला.

हणमतरावाचे वकील काका पाटील व बॅ. बॅप्टिस्टा यानीं या पुराव्याच्या चिंधड्या उडवल्या, खटला एक महिना पुढें ढकलला. तेवढ्या अवधींत तो 'विद्याविलास'चा अंक व तें फडकें सरकारच्या ताब्यातून चोरीला गेलें असे दाखवून ज्याच्या ताब्यातून ही चोरी झाली, त्याला फक्त आठ आणे दंड झाला. हणमतरावाच्याबरोबर त्याचा नोकर नागेशहि पकडला गला होता. पण तो शौचाला म्हणून साडेसातला गला व तेथून जो निसटला'तो पोलिसाच्या हातीं हणमतरावावरील खटला निकालात निघेपर्यंत लागलाच नाहीं. नागशला गोविंदरावानीं होसूर, धारवाड, गदग या ठिकाणीं ठेवून त्याचा मुक्काम बदलता राखला होता श्री. गोपाळराव देशपाडे यांच्याकडे त्याला कांहीं दिवस बम्मनहळ्ळी येथें नेऊन ठेवले होते नागश या गावात आहे, त्या गावात आहे, तो गोव्यात अमुक ठिकाणीं आहे, अशा भुमका उठवल्या जात. त्यामुळें पोलिसाची व्यर्थ धावपळ होऊन विनाकारण खर्च मात्र होत असे. हणमतरावावरील खटल्यात हा एक प्रमुख साक्षीदार म्हणून सरकारकडून वापरला जाणार होता. पण त्यालाच पळविल्यामुळें सरकारचा पुरावा लगडा पडला.

सरकारनें या नागेशाला पकडून बेळगावला ठेवलें होतें. त्याची साक्ष हणमतरावाविरुद्ध व्हावयाची होती. बेळगाव लष्कर पोलिसाच्या ताब्यात त्याला देण्यात आलें होतें. त्याला प्रत्यक्ष अटक अशी नव्हती तरी त्याच्यावर नजर असे. तो एके दिवशीं नजर चुकवून पोलिसाच्या ताब्यातून निसटून गेला, त्यामुळें त्याची साक्ष होणें अशक्य झालं. पितळी फिरकीच्या ताब्यात बॉंब होता असा दामूचा जबाब होता, पण हणमतरावाच्या घरीं जो ताब्या सापडला त्यात कांहींच नव्हतें. तथापि तो ताब्या केमिकल अनलायझरकडे पाठविण्यात आला. त्यावर कांही ॲसिडचे डाग होते असे एक सर्टिफिकेट पोलिसानीं मिळवलं होतें. खरोखर त्या ताब्यात जर बॉंब होता आणि तो जर नाहींसा करण्यात आला होता तर ताब्यावर डाग राहण्याइतपत हलगर्जीपणा कोणीं केला असता काय? आणि ही गोष्ट कोल्हापुरास या लोकांच्या विरुद्ध कांहीं तरी चाललें आहे असे समजल्यानंतरहि तो ताब्या स्वच्छ ठेवण्याची दक्षता न घेण्याइतके कोणी गाफील राहील असे वाटत नाहीं हणमतरावाकडे मुद्देमाल कांहींहि मिळाला नाहीं. पोलिसानीं सर्व उपायाचा अवलंब केला होता तरी हणमतरावाचा कबुलीजबाब मिळाला नाहीं. नागेशची साखळीहि तो फरारा झाल्यामुळे तुटली होती त्यामुळे खटल्यातच कांहीं राम राहिला नाहीं.

या सर्व नाटकाचें मुख्य पात्र म्हणजे दामू जोशी. तेथूनच सर्व उगम तेव्हा त्याची साक्ष होईल असे वाटले होतें. पण आश्चर्य हें कीं, पोलिसानीं साक्षीसाठीं त्याला पुढें आणिलें नाहीं. दामूला साक्षीदाराच्या चौकात उभ केले असतं तर कोल्हापुरास काय व्यूह रचले जात आहेत, हें बाहेर आलें असतें तो पोलिसाच्या ताब्यात होता तरी त्याला साक्षीला आणण्याचें धैर्य पोलिसाना झालें नाहीं. हा खटला चालू असता

काका पाटील यांचे नांवें टपालांतून एक पत्र आलें. तें दामूनें कोल्हापूरच्या तुरुंगांतून पाठविलें होतें. त्या पत्राचा फोटो गंगाधररावांनीं काढवून ठेवला होता. टिळक मंडालेहून परत आल्यावर त्यांच्या गैरहजेरींत कोल्हापुरांत काय काय कारस्थानें चाललीं होतीं हें त्यांना समजावें म्हणून त्यांच्याकडे त्या पत्राचा फोटो दिला होता. तें पत्र न. चिं. केळकरकृत 'लो. टिळकांचें चरित्र' खंड ३ रा, भाग ४ मध्यें १२ पानावर दिलें आहे.

पुराव्यावरून हणमतरावांवर आरोप शाबीत होण्यासारखा नव्हता, तरीहि पागेसारख्या ब्रिटिश अमलदारानें हा खटला उभा केला होता म्हणून असो किंवा इतर कांहीं अतस्थ कारण असो, हणमतरावांना दोषी ठरवून कांहीं शिक्षा देणें अपरिहार्य होतें. किती शिक्षा किंवा दंड करावयाचा एवढाच प्रश्न होता. खटल्याचा पाहिजे तसा निर्णय—निकालपत्र—मॅजिस्ट्रेटनें एके दिवशीं रात्रीं विश्वंभरराव अष्टेकर यांचे घरींच लिहिले एवढें सांगितलें म्हणजे यांत सर्व कांहीं आलें. त्यावर श्रीमंतांकडे (संस्थानिकांकडे) अपील झालें, पण अपीलांतहि शिक्षा कायम झाली. केवळ अगदीं मामुली दंडावर हें प्रकरण संपलें.

तथापि या खटल्याचा प्रसाद म्हणून हणमतराव देशपांडे व गंगाधरराव देशपांडे यांचें देशपांडेगिरीचें उत्पन्न खालसा करून त्यावर भर आकार घेण्यांत आला. या दोघांचे वडीलहि त्या वेळीं हयात होते व प्रस्तुत खटल्यांत त्यांचा कांहींच संबंध येत नव्हता म्हणून या दोघा चिरंजीवांच्या देशपांडेगिरी वतनांतील अर्धा हिस्सा आहे असें मानून त्यांच्या वडिलांच्या हयातींतच उत्पन्नाचा तेवढा हिस्सा खालसा करण्यांत आला होता.



प्रकरण एकविसावें

# बेळगांवांतील एक अजब वली

बेळगावातील राष्ट्रीय व क्रांतिकारक चळवळीचा इतिहास गुर्लेहोसूर येथील श्रीधर हरि खेर यांच्या परिचयावाचून अपुराच राहील. गुर्लेहोसूरमध्यें गोविंदराव याळगी व गंगाधरराव देशपांडे यांना श्री. खेर यांचा परिचय सहज झाला होता. वर्तमानपत्रांत लेख लिहिण्याची त्यांना हौस व नाद होता, इतकेंच नव्हे तर त्यांनीं 'मित्र' या नावाचें एक वर्तमानपत्रहि कांहीं काळ मुंबईस चालविलें होतें. हे गृहस्थ धाडसी असून धूर्तहि होते. गोविंदराव–गंगाधरराव यांच्याकडे त्यांचें जाणें-येणें त्यांच्या परिचयाबरोबर वाढत गेलें. ते खानावळींतच आपलें भोजन करीत असत. युरोपियन आणि हिंदी अधिकाऱ्यांना भेटून आपल्या कांहीं घरगुती अडचणी निवेदन करून ते आपला उदरनिर्वाह भागवीत असत. कोल्हापूरच्या शिवाजी छत्रांचा आणि त्यांचा संबंध होता, त्या छत्रच्या सभासदांना ते चांगले परिचित होते. कोल्हापुरातील कांहीं मोठमोठ्या मंडळींची व महाराजांची देखील कुलगडी त्यांना माहीत होती. ते गोविंदराव–गंगाधररावांकडे येत जात असल्यामुळें, त्यांच्याविरुद्ध कोल्हापुरास कांहीं कारस्थानें चालू आहेत ही गोष्ट त्यांना पर्णोपर्णी माहीत झाली होती. फर्नांडिस वगैरे मंडळी सत्यासत्याकडे न पाहणारी उलट्या काळजाची आहेत, हेंहि त्यांना माहीत होतें. म्हणून या प्रकरणांत आपणहि कांहीं कर्तबगारी करून दाखवावी आणि या लोकांच्या विरुद्ध रचण्यांत येत असलेला व्यूह उलथून पाडावा, अशी कल्पना त्यांच्या मनात आली. त्यांनीं ती कल्पना गोविंदराव–गंगाधरराव यांना स्पष्टपणें बोलूनहि दाखविली होती. अगल्या फंदापासून त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न गोविंदरावांनीं केला, पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं.

आपली कल्पना प्रत्यक्षांत आणण्याच्या नादाला ते लागताच त्यांनीं गोविंदराव–गंगाधरराव यांच्या घराकडे जाण्याचें बंद केलें. गुप्त रीतीनें कोटवरी भेटून आपली वाटचाल कोटवर आलेली आहे याची माहिती तेवढी ते गोविंदरावांना पोंचवीत

असत. कोल्हापूरच्या कारस्थानाला मदत करणारे बेळगावातील मुख्य गृहस्थ म्हणजे विष्णुपंत गाडगीळ आहेत, ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत येण्यास वेळ लागला नाहीं. कोल्हापूरच्या प्रकरणाशी गोविंदराव-गंगाधरराव यांचा संबंध असल्याबद्दलच्या गोष्टी ते अशा रीतीनें व अशा लोकांजवळ व्यक्त करूं लागले कीं, त्या विष्णुपंत गाडगीळ यांच्या कानावर सहज जातील. अर्थात् विष्णुपंताचें लक्षहि त्यांच्याकडे गेलें. त्यामुळें त्या दोघांचा संबंध आला, व तो जास्त निकट करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. विष्णुपंत गाडगीळ यानांहि अशा एखाद्या माणसाची जरुरी भासत होतीच. कोल्हापूरचे दामू जोशी, प्रसादे, पाध्ये यांच्यासंबंधींच्या कांहीं ऐकींव गोष्टीत आपल्या पदरचें कांहींतरी घालून त्यांनीं त्या विष्णुपंताना सांगितल्या. आणि गोविंदराव-गंगाधररावांचा संबंध त्यांच्याशीं आहे असें पुराव्यासह गुप्त गोष्ट म्हणून निवेदन केलें. विष्णुपंतानें या खेरांना कोल्हापूर प्रकरणांत बेळगांवच्या मंडळींच्या विरुद्ध साक्षीदार करण्याची सूचना केली. खेर यांनीं ती गोष्ट मान्य केली. त्यामुळें विष्णुपंताचा त्यांच्यावर विश्वास बसला. खेरांचें बिऱ्हाड अर्थात् यानंतर विष्णुपंतांच्या घरींच गेलें. जेवणखाणहि त्यांचेकडेच होऊं लागलें. याप्रमाणें येथपर्यंचा भाग श्री. खेरांनीं अगदीं आपल्या योजनेप्रमाणें (According to plan) व्यवस्थित पार पाडला. यांत विष्णुपंतांना त्यांच्याविषयीं थोडीदेखील शंका आली नाहीं.

विष्णुपंतांच्या हालचालींच्या बातम्या आतां म्हणजे या घटनेनंतर गोविंदराव-गंगाधररावांना नियमित व व्यवस्थेशीरपणें वेळेवर कळूं लागल्या. कोल्हापुराहून कांहीं पिस्तुलें आणवून तीं खेरांच्या मार्फत गोविंदराव--गंगाधररावांच्या घरीं ठेवण्याचा बेतहि चालला होता. कोल्हापूर पोलीस सुपरिंटेंडेंट फर्नांडिस यांजकडे विष्णुपंत गाडगीळ रिव्हाल्व्हर मागण्यास गेले, व रा. खेराकडून मीं तें गंगाधरराव देशपांडे यांच्या घरामध्यें ठेवविण्याची योजना केली आहे असें त्यांना सांगूं लागले. त्या वेळीं फर्नांडिस यानें त्यांना रिव्हॉल्व्हर देण्याचें नाकारलें व म्हटलें कीं, खेर अत्यंत हुषार, धाडसी आणि भानगडी मनुष्य आहे. तो तुम्हाला केव्हांतरी पेंचांत घालील. विष्णुपंतांनीं या इशाऱ्यापासून शहाणपणा घेतला नाहीं. इतका खेरांविषयीं त्यांना दृढ विश्वास होता. खेर विष्णुपंतांच्या घरीं असतांना गाडगीळ आपला पत्रव्यवहार कोठें व कसा ठेवतात, याचें निरीक्षण करीत असत. त्यांच्या घराच्या माडीवर एका फडताळांत एका पेटींत विष्णुपंत आपला पत्रव्यवहार ठेवीत असत. खेर त्याच माडीवर झोंपत असत. विष्णुपंत बाहेर कोठेंहि गेले तरी खेरांना त्या माडीवर राहाण्यास सवलत होती. तें पाहून खेरांच्या मनांत हा पत्रव्यवहार लांबवावा असें आलें व तसें त्यांनीं ठरविलेंहि, परंतु विष्णुपंत बेळगांवांत असतांना तें साध्य होणें कठीण आहे, हें त्यांना दिसून आलें, म्हणून खेरांनीं विष्णुपंतांना सल्ला दिला कीं, गोविंदराव--गंगाधररावांचें हें प्रकरण पार माळ मिरज

ठेवणें योग्य होणार नाहीं. याचा काहींतरी एकदा लवकर निकाल लावला पाहिजे पत्रोपत्रीं हीं कामें लांबणीवर पडत जातात. म्हणून विष्णुपतांनीं स्वत. कोल्हापुरास समक्ष जाऊन सर्व व्यवस्था करूनच यावें. हा सल्ला विष्णुपतांना पटला आणि त्यांनीं कोल्हापुरास जाण्याचा बेत ठरविला. ही गोष्ट गोविंदराव-गंगाधररावांना खेरांनीं कळविली होती. त्या वेळीं ते म्हणाले होते कीं, 'एकदोन दिवसांत विष्णुपत व कोल्हापूरचे पोलीस यांच्या तगड्या त्यांच्याच गळ्यात अडकवितों, पहा तर खरें!' खेर यांची विशेष माहिती गोविंदराव गंगाधररावांनाहि नव्हती. त्यांचा व्यूह धोक्याचा आहे, असें त्यांना प्रथमपासून वाटत होतें. त्यांच्या बोलण्यावर कोणाचा विश्वासहि बसेना. तो काळच असा होता कीं, अगदीं सुरक्षित जागेबद्दलहि संशय घेतघेतच पुढचें पाऊल टाकावें लागत होतें. खेरांबद्दलहि जास्त सावधगिरीनें रहावें, असें गोविंदरावांनीं ठरविलें. तशा बंदोबस्तातच ते त्यांच्याशीं वागू लागले. या गोष्टीचा अंदाज किंवा वासहि खेरांना येऊं न देण्याची खबरदारी गोविंदरावांनीं पूर्णपणें घेतली होती. आपल्या व्यूहरचनेचा हा दुसरा टप्पाहि खेरांनीं यशस्वीपणें गाठला.

ठरल्याप्रमाणें विष्णुपत एके दिवशीं सकाळच्या गाडीनें कोल्हापुरास गेले. खेर त्यांना पोंचविण्यास स्टेशनवर गेले होते. विष्णुपत गाडींत बसल्यावर ते परत कोणत्या गाडीनें बेळगावला येणार तें खेरांनीं नक्की ठरवून घेतलें. गाडी स्टेशनातून सिग्नलच्या बाहेर गेल्यावर खेर प्लॅटफॉर्मच्या बाहेर पडले व घरीं परत आले. विष्णुपत बेळगावहून गेल्यानंतर कधींकधीं लहरीनुसार मधूनच बेळगावास परतावयाचे. या विष्णुपतांच्या प्रवृत्तीची खेरांना पूर्ण कल्पना होती. म्हणून ते बेळगावाहून निघाल्यानंतर निदान पाचसहा तासांच्या आत तरी बेळगावकडे परतू शकणार नाहींत, असें आगगाडीचें वेळापत्रक पाहूनच खेरांनीं त्यांच्या जाण्याची वेळ ठरविलेली होती. स्टेशनहून परत येतांच खेरांनीं आपली योजना अमलात आणण्याचा उद्योग आरंभला. गाडगिळांच्या घरातील फडताळाच्या फळीचे स्क्रू काढून तें फडताळ त्यांनीं उघडलें. आंतील पेटीचें कुलूप खोललें व पेटींत असलेले कागदपत्र घेऊन ते गोविंदरावांच्या घरीं गेले. मग ते दोघे मिळून गंगाधररावांच्या घरीं गले.

ते कागदपत्र वाचतांच, गोविंदराव-गंगाधररावांचा 'क्रांतिकारक कट' किंवा 'फेरीसचा खून करण्याचा कट' (?) उघडकीस येण्याऐवजीं विष्णुपतांचा व कोल्हापूर पोलिसांचा गोविंदराव-गंगाधरराव यांच्यावर कांहींतरी संकट आणण्याचा कट उघडकीस येण्याची खात्री वाटली. बेळगावच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचीहि कांहीं पत्रें त्यांत होतीं. तीहि त्यांच्या न्यायबुद्धीला धक्का आणण्यासारखीं होतीं. अशा प्रकारचीं साधनें गंगाधरराव-गोविंदराव यांच्या हातीं लागली असलीं तरी त्यांचा उपयोग केव्हा कसा करावयाचा याचा विचार ते करीत होते. पण खेर यांनीं अगाऊच सर्व युक्ति व योजना नक्की करून ठेवलेली होती. हीं पत्रें खेरांच्या हातीं लागतांच, फोडलेली पेटी

व फडताळ जसेंच्या तसेंच म्हणजे फोडलेल्या स्थितींतच ठेवून माडील कुलूप लावून खेर बाहेर पडले होते. वास्तविक फडताळ व पेटी जशीच्या तशी पूर्वीप्रमाणें त्याना करता आली असती. हा पत्रव्यवहार घेऊन, मॅजिस्ट्रेटकडे जाऊन घडलेली सर्व हकीकत त्याना कळवून, घरफोडीचा व चोरीचा गुन्हा आपण केला आहे असा अर्ज करण्याचें त्यानीं ठरविलें होतें, नव्हे तसा अर्ज करूनहि ते मोकळे झाले होते. गोविंदराव-गगाधरराव व त्याचे स्नेही याच्यावर कुभाड रचण्याच्या उद्देशानें काय काय प्रयत्न चालले आहेत, हें उघडकीला आणण्याच्या हेतूनें आपण हा गुन्हा केल्याचें कबूल करून तसे स्पष्टपणें त्यानीं अर्जात लिहिले होतें. हें त्याचें धाडस व ही कल्पकता पाहून सर्वच आश्चर्यचकित झाले. पत्रव्यवहार पाहून मॅजिस्ट्रेट बुचकळ्यात पडले. तथापि पोलिसाना घराची स्थिति पाहून पचनामा वगैरे रीतीप्रमाणे करण्यास त्यानीं सागितलें. पोलिसानीं गाडगिळाच्या घरीं जाऊन सर्व स्थिति पाहिली. पण खरोखर खटला केल्यास भलत्याच गोष्टी बाहेर येतील म्हणून त्याच्यावर खटला भरण्यात आला नाहीं. खेर एवढ्यावरच स्वस्थ बसले नाहींत. विष्णुपताना कोल्हापुराहून पिस्तुलें आणण्याकरिता त्यानीं सागून ठेवलें होतें. त्याप्रमाणें तीं त्याच्याबरोबर येण्याचा सभव होता. ही गोष्टहि त्यानीं पोलिसाना कळवून ठेवली होती. यामुळे गाडगीळ कोल्हापुराहून येत असता, पोलिसाना त्याची झडती घ्यावी असे वाटून त्यानीं वाटेतच त्याची झडती घेतलीहि. पण गाडगिळाच्याजवळ काहींहि सापडलें नाहीं. म्हणून ते बचावले.

गाडगीळ घरीं जाऊन पाहतात तों सर्व स्थिति त्याना दिसली. खेरानीं आपल्याला दगा दिला हेंहि त्याना समजलें. 'मी तुमच्या घरातील कपाट फोडून जरूर तेवढे कागदपत्र चोरून नेले आहेत. वाटल्यास माझ्यावर फिर्याद करा' असे खेर यानीं विष्णुपताना सागून टाकलें होतें. त्यामुळें विष्णुपत डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट याच्याकडे गेले होते. पण या प्रकरणात काय करावयाचें तें डि. मॅजिस्ट्रेटनी पूर्वीच ठरविलेलें असल्यामुळें विष्णुपताना मुकाट्यानें घरीं यावें लागलें. तेव्हापासून त्याचें वजन कमी होऊन डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडील त्याचें जाणेंयेणेंहि बद झालें. मॅजिस्ट्रेटपर्यंत हात पोंचल्यावर ते पोलिसाना कमी लेखू लागले होते. पोलिसाविरुद्धहि ते वरिष्ठाकडे कागाळ्या करीत असत. तेव्हा विष्णुपताचा खोटेपणा उघडकीला आणणारी ही आयती चालून आलेली सधि पाहून पोलिसानाहि बरं वाटलें. या नाचक्कीनतर कोल्हापूरचें कारस्थान थाबेल व सर्व काहीं निवळेल, असें मानण्यात आलें होतं, पण तसें मात्र घडलें नाहीं. कोल्हापूरकराच्या पदरात त्याच्या खोटेपणाचें पूर्ण माप अजूनहि पडावयाचें राहिलं होतें; यासाठीं खेर आता तिकडे वळले.

**खेराचें आणखी एक धाडस :**—कोल्हापूरच्या पोलिसाच्या विरुद्ध खेरानीं जे कांहीं केलें होतें त्याची वित्तबातमी विष्णुपत गाडगिळाच्या मार्फत कोल्हापुरास

पोहोंचली होतीच. तशा परिस्थितींत कोल्हापुरास जाण्याचा त्याचा विचार गोविंदराव-गगाधरराव याना अत्यत धोक्याचा वाटला. परतु कोणाचा सल्ला मानण्याची त्याची वृत्तीच नव्हती. सकटात उडी घेण्याची, अगावर येईल तें शिंगावर घेण्याची आणि आपत्तींतहि येणान्या अडचणींना आनदानें सामोरे जाण्याची त्याना मनस्वी हौस होती ही साहसी वृत्तीच त्याना कोल्हापूर पोलिसाची खबरगात आणण्याला उद्युक्त करीत होती. त्याच्या मनानें कोल्हापूरला जायचें नक्की घेतलें.

कोल्हापुरात 'कावळ्याचा बगला' त्या काळीं प्रसिद्ध होता. आरोपींना 'समज' देण्याची किंवा 'समजून सागण्याची' ती कोल्हापूर पोलिसाची जागा होती.

राजकीय आरोपी म्हणून कोणासहि पकडावें, चौकशीशिवाय महिनेच्या महिने त्या बगल्यात अटकेंत ठेवावें व अतोनात हाल करून त्याच्या तोंडून आपल्याला वाटेल त्याप्रमाणे वदवावें हा कोल्हापूर पोलिसाचा क्रम तेथें सर्रास चालत असे. तेव्हा कोल्हापूर पोलिसाच्या विरुद्ध बेळगावला इतक्या भानगडी करून तेथे गेल्यास पोलीस खेराना 'कावळ्यांचा बगला. दाखविल्याशिवाय कसे राहतील ? 'धाडस हेंच खरें जीवन' मानणाऱ्या खेराना त्याचें काय होय ? त्याच्या मनात कोल्हापूरला जाऊन हा प्रसिद्ध 'कावळ्याचा बगला' एकदा पोलिसाच्या मार्फत पहावा, तेथें चालत असलेला सर्व कारभार चव्हाट्यावर आणावा, असा हेतु धरून स्वारी कोल्हापुरास गेली.

अपेक्षेप्रमाणें त्याना अटक झाली. पोलिसाच्या तपासणीला (!) प्रारभ झाला! पण अटकेंत असता खेरानीं अशी वागणूक ठेवली होती कीं, पोलिसाची त्याना हात लावण्याची छाती झाली नाहीं. आपल्याला पुष्कळच गोष्टी सागावयाच्या आहेत व आपण त्या सर्व महाराजानाच सांगणार आहोंत, असे त्यानीं पोलिसाना गभीरपणें सागितलें. म्हणून पोलिसानीं त्याना महाराजासमोर आणलें. त्यानीं महाराजाना त्याच्या व इतराच्या काहीं गुप्त गोष्टी सागितल्या व बोलता बोलता बजावलें कीं, 'आपल्यावर खटला भरल्यास आपण वकील बॅरिस्टरामार्फत सर्व तऱ्हेचा बचाव करण्याची तजवीजहि केली आहे कोर्टांत आपणास सागितलेल्या सर्व गोष्टींचा उघड पाढा वाचावा लागल व तसे करताना आपलें स्वत चें काय होईल तें होवो !' याचा परिणाम असा झाला कीं, खेराची त्या अटकेंतून तातडतोब सुटका झाली. कोल्हापूर सोडून हा गृहस्थ केव्हा एकदा जाईल असे दरबार व पोलीस याना झालें. नव्हे त्यानींच त्याला कोल्हापूर हद्द लौकर सोडावयास कळवलें

आपला जीव धोक्यात घालण्यात खेराचा स्वार्थी हेतु कधींच नव्हता. गोविंदराव-गगाधरराव काहीं विशेष देशसेवा करीत आहेत व ते लोकमान्याच्या कृपेला पात्र झाले आहेत म्हणून त्याच्या कार्यांत आपणहि आपल्या कुवतीप्रमाणें

अल्पस्वल्प मदत करावी हाच हेतु त्यांच्या वरीलसारख्या धाडसांत असे. खेराना लो. टिळकांविषयीं अत्यंत आदर व पूज्यभाव वाटत होता. स्वतःची आर्थिक परिस्थाति विकट असली तरी त्यांनीं गोविंदराव-गंगाधररावांच्याकडून कदापि पैशाची अपेक्षा बाळगली नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यांनीं अंशतः भरपाई म्हणून देऊं केलेली चांगली रक्कमहि त्यानीं स्वीकारली नाहीं, ती साफ निक्षून नाकारली. भारताच्या कुशींत अशीं धाडसी नि स्वार्थत्यागी रत्नें निपजलीं म्हणूनच इतक्या लौकर स्वातंत्र्य मिळालें.



प्रकरण बाविसावें

# नवा जोम आणि नवा व्यूह

त्या काळीं मुंबई इलाख्याचे गव्हर्नर सर जॉर्ज सिडनहॅम क्लार्क हे होते. त्यांना कोल्हापूरच्या शाहूमहाराजांचा संशय आला होता. महाराष्ट्रातील टिळकांच्या चळवळीला महाराजांची सहानुभूति व मदत आहे असा त्यांच्यावर वहीम होता. तो दूर करण्याचा उपाय म्हणून महाराजांनीं आपल्या कारस्थानाला सुरवात केली होती. आपण स्वतः साम्राज्यनिष्ठ आहोंत. बेळगांवचे कांहीं उपद्यापी लोक ही गुप्त चळवळ करीत असल्याचें आपल्यास माहीत आहे. त्यांना मुद्देमालासहित पकडून देण्याचें आश्वासनच जणु शाहूमहाराजांनीं गव्हर्नरांना दिलें होतें. ब्रिटिश गुप्त पोलिसांची करडी नजर गंगाधरराव, गोविंदराव, हणमंतराव वगैरे मंडळींवर होतीच. आतां त्यांत कोल्हापूर पोलिसांची भर पडली इतकेंच! तथापि त्यांच्या सर्व कारवाया गोविंदरावांना जशाच्या तशा समजत असत. त्यांनींहि गुप्त कार्यकर्त्यांचें एक जाळें तयार केलें होतें. त्यामुळें पोलीसअधिकाऱ्यांच्या बाटाघाटींची व गुप्त हालचालींची बातमी गोविंदरावांना इत्थंभूत असे. या मिळणाऱ्या वित्तबातमीमुळें ते फारच सावधगिरीनें वागत व आपल्या परिसरातील कोणासहि ते अव्यवस्थित व मोंगळपणें वागू देत नसत. वर्षभर डोळ्यांत तेल घालून कोल्हापूरच्या व इंग्रजांच्या गुप्त पोलिसांनीं खूप खटपट केली, पण ती सर्व व्यर्थ ठरली. त्यांना पाहिजे होता तसा पुरावा ते मिळवू किंवा बनवू शकले नाहींत. तेव्हां शाहूमहाराजांनीं आतां निराळाच मार्ग अवलंबिला.

बेळगांवातील विष्णुपंत गाडगीळ यांना हाताशीं धरून त्यांच्याशीं संधान बांधलें. परंतु त्यांतहि त्यांना यश आलें नाहीं. श्री. खेर यांच्या युक्त्याप्रयुक्त्यांनीं सर्वच पितळ उघडें पडलें. सुदैवानें त्या दिवशीं कोल्हापूरच्या पोलीस अधिकाऱ्यांना एखादें रिव्हाल्व्हर देण्याचें धाडस झालें नाहीं म्हणूनच विष्णुपंत गाडगीळ, झडतींत कांहीं न सापडल्यामुळें अपुट वाचले.

एवढ्यावरच कोल्हापूर प्रकरण संपले नाहीं. कोल्हापुरचे पोलिटिकल एजंट याचा खून करावा या हेतूनें दामू जोशी यानें खटपट चालवली होती. ही हकीकत कोल्हापूरच्या पोलिसाना समजली होती. दामू जोशीनें तसा केलेला एक प्रयत्न फसलेला होता. त्याचे धागेदोरे बेळगावला आणून पोहोंचवावेत अशी योजना कोल्हापूर दरबारनें आखली व त्या दृष्टीनें गंगाधरराव, गोविंदराव व हणमंतराव याना पकडून त्या कटात गोवण्याचा प्रयत्नहि झाला होता. ही बातमी गोविंदरावाना समजली आणि आपल्या दूरच्या नातेवाइकांपैकींच एका सज्जनास-गोपाळ पाचलग यास-साक्षीदार बनवून पोलिसानीं त्याचा जबाब मॅजिस्ट्रेटपुढें १६४ कलमाखालीं करविला होता. त्या आधारावर गोविंदरावाना पकडणार आहेत ही बातमीहि वेळेवर मिळाली होती. अशा प्रसंगीं मोठ्या कौशल्यानें गोविंदरावानीं त्या गृहस्थाना भेटून चौकशी केली आणि त्यानें आपली चूक कबूल केल्यावर त्याच्याच इच्छेप्रमाणे त्यानी त्याला तीर्थयात्रेस पाठविलें. पोलिसाना त्याचा पत्ताहि नाहीं. अशा रीतीनें अगदीं ऐनवेळीं कोल्हापूर पोलिसाच्या तोंडचा घास पळविल्यामुळें त्याचा फारच विरस झाला.

झडत्याच्या सत्रामध्यें गोविंदराव गंगाधरराव यांच्या घरामध्यें कांहीं सापडलें नसल्यामुळें पोलिसाना हात चोळत परतावें लागले होतें, परंतु हणमंतरावाचे बाबतींत मात्र निराळाच प्रकार झाला. मजगावमध्यें पोलिसानीं रिव्हॉल्व्हर मिळवला व साक्षीदारहि तयार केले. त्याना अटक होऊन 'कावळ्याच्या बंगल्या'ची हवाहि खावी लागली. कावळ्याच्या बंगल्यात हणमंतरावाचा अनन्वित छळ करण्यात आला. त्याच्याकडून गोविंदरावाचें व गंगाधररावाचें नाव तथाकथित कटात गोवण्याचा पुष्कळच प्रयत्न झाला. परंतु सर्व व्यर्थ गेलें. हणमंतराव कणखर राहिले. वाकले नाहींत किंवा माराखालीं पिचलेहि नाहींत. त्यांच्यावरील खटल्यातहि ते जवळजवळ सुटल्यासारखेच होते. आतापर्यंतच्या झटापटींचें हें सिंहावलोकन किंवा साराश आहे.

इतका खटाटोप करूनसुद्धा गोविंदराव-गंगाधरराव कोठेच अडकले नाहींत याचें कोल्हापूरकर महाराजाना अत्यंत वाईट वाटलें. त्यामुळें जातीनें स्वत: त्यात लक्ष घालून त्यानीं खटपट सुरू केली. कोल्हापूर पोलीस व दरबार अशा रीतीनें अयशस्वी व नामोहरम झाले असले तरी ते नाउमेद झाले नव्हते. गोविंदराव किंवा गंगाधरराव यांच्यापैकीं कोणाच्या तरी घरीं 'कांहीं तरी' ठेवून त्याना लागलीच अटक करण्याचा *प्रयत्न किंवा उद्योग कोल्हापूर दरबार करीतच होता. गोविंदराव व गंगाधरराव यांच्या* जागरूकतेमुळें व प्रयत्नामुळें, आपल्या कोणत्याहि कारवायाना यश येऊ शकत नाहीं, अशी सर्वांची नालनाल खात्री झालेली होती. पण नेहमींप्रमाणें ही सर्व वित्तबातमी पोलिसाना किंवा विष्णुपंत गाडगीळ याना कळण्यापूर्वी ती गोविंदरावाना कळत असे. त्यानीं आपल्या लोकसंग्रह वृत्तीनें असें एक गुप्त जाळें पसरून ठेवलें होतें कीं, असल्या प्रकरणींची सर्व बातमी इतरापेक्षा त्यानाच प्रथम समजावी. आपल्यामोंवतींचें

वातावरणच त्यानीं अशा प्रकारें तयार केलें होतें कीं, असल्या गोष्टींतील कोणतीहि हकीकत कोणाच्याहि कानावर आली तरी ती प्रथम गोविंदरावाना सांगून ठेवावी असेच कोणाहि अनोळखी मनुष्यास वाटू लागलें होतें. बेळगावच्या पोलिसांचीहि आस्ते आस्ते खात्री होत चालली कीं, कोल्हापूर पोलीस हा सर्व खोटा बनाव गोविंदराव गंगाधरराव यांच्या विरुद्ध मुद्दाम बनवीत आहेत. कोल्हापुराहून जीं पत्रं बेळगावला या प्रकरणीं येत असत तीं सर्व गोविंदराव आधीं वाचून नंतर मालकाकडे पाठवीत असत.

गोविंदराव–गंगाधररावांना स्वस्थता मिळूच द्यावयाची नाहीं, असा कोल्हापूर दरबारनें चंगच बांधला होता. कोल्हापूरच्या मंडळीचे व श्री. पागे यांचें बेळगावला येणेंजाणें चाललेंच होतें. काहींतरी युक्तीनें गंगाधररावांना कोल्हापूरच्या हद्दींत नेण्याबद्दल खटपट चालली होती. गोविंदराव–गंगाधररावहि अत्यंत सावध होते. विष्णुपंत उघडा पडल्यापासून बेळगाव पोलीस मात्र स्वस्थ होते. कोल्हापूरच्या कारस्थानामुळें पूर्वी त्यांना कांहीं संशय आला असला तरी खेराच्या अचाट प्रयत्नानें तो दूर झाला होता. पोलिस इन्व्हेस्टिगेशन खात्याच्या मुख्य अधिकाऱ्यांना दामू जोशी यांच्या जबानीवर रचलेल्या डोलाऱ्याचें डळमळीत स्वरूप आधींच कळून चुकलें होतें. अशा स्थितींत पुढील व्यूहाचा सर्व भार कोल्हापूरकरांवरच पडला. शाहूमहाराजांच्या स्वभावाचा लौकिक प्रत्यक्षअप्रत्यक्षपणें पुष्कळांना अनुभवून व ऐकून माहीत आहे. ते महत्त्वाकांक्षी पण दीर्घद्वेषी असल्यामुळें हातीं धरलेलें काम शेवटाला पोंचवल्याखेरीज स्वस्थ राहणारे नव्हते. गंगाधररावांच्या बाबतींत दोनतीनदा केलेले प्रयत्न फसले होते व कोल्हापूर पोलिसांची नाचक्की झाली होती. तिचा परिणाम लोकदृष्टीनें थोडाबहुत तरी स्वतः महाराजांवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. 'बेळगावकर पोलिसानीं कोल्हापूर पोलिसांना दाद लागू दिली नाहीं. उलट त्यांचेच दांत त्यांच्याच घशांत कोंबले गेले' अशा अर्थाची भाषा कोल्हापुरांत निघू लागली. गोविंदराव गंगाधरराव यांच्याविरुद्ध कोल्हापूर दरबार व पोलिसांचा जो प्रचार चालला होता त्याला कोल्हापुरांतील जनता विरुद्ध होती; हें महाराजांना समजून आल्यानंतर त्यांच्या स्वभावाप्रमाणें त्यांना चीड येणें स्वाभाविक होतं. म्हणजे आतां ही गोष्ट कोणा सामान्य अधिकाऱ्यांच्या हातीं न सोपविता सर्व सूत्रें शेवटचा रामबाण समजून महाराजांनीं स्वतःच्या हातीं घेतलीं.

**स्वारीशीं सामना :** गणपतराव मोडकांना कोल्हापुरांत अटकेंत ठेवून बरेच दिवस झाले होते. त्यांच्याबरोबर श्री. के. डी. कुलकर्णी या नांवाचे आणखी एक आरोपी होते. ते फरारीच होते. या दोघांवर फेरासचा खून करण्याच्या कटाचा आरोप होता, पण तेवढ्यासाठीं तो खटला लांबणीवर टाकला जात आहे ही बातमी खरी नव्हती. गणपतराव मोडकांच्याबरोबर गंगाधररावांना अडकविल्याशिवाय कार्यभाग यथासांग होणार नाहीं असें वाटून त्यांच्या बाबतींत आणखी एक प्रयत्न

करून पहावा असें महाराजांनीं ठरवून तेवढ्यासाठींच मोडकांच्यावरील हा खटला वारला पुढें पुढें ढकलला जात होता, हें गोविंदरावांना कळलेलें होतें. अशा प्रकारें महाराज स्वत:च या आखाड्यांत उतरल्यामुळें सर्वांनाच अधिक काळजी वाटू लागली असल्यास नवल नाहीं. गोविंदराव–गंगाधरराव यांनां यापूर्वीच टक्के धोपटले असल्यामुळें त्यांना आतां अधिक सावधान राहावें लागलें. कोल्हापूर दरबारच्या यापूर्वींच्या अनेक व्यूहांमध्यें महाराजांचा हात नव्हता असें म्हणतां येत नसलें तरी त्याबद्दल नक्की सांगण्यासारखें साधन नव्हतें; परंतु आतांचा जो नवीन व्यूह रचण्यांत आला त्यांत मात्र महाराजांचा प्रत्यक्ष हात असल्यामुळें त्या प्रसंगीं जे डाव प्रतिडाव झाले त्यांचा सविस्तर वृत्तांत येथें दिला तर निराळा पुरावा देण्याची जरूरच नाहीं.

कोल्हापुरांत शाळिग्राम नांवाचा एक गृहस्थ होता. त्याचें सर्व कुटुंबीय कोल्हापुरामध्यें राहात असत. त्याची स्थावरजंगम मिळकतहि कोल्हापुरांतच होती. ते जपानला जाऊन रसायनशास्त्र शिकून आले होते. कोल्हापूर संस्थानांतील जंगलांतून रॉकेलसारखीं तेलें व इतर रासायनिक द्रव्यें काढण्याचा कारखाना चालू करण्याच्या खटपटींत ते होते. त्यांची व गोविंदराव–गंगाधरराव यांची ओळखहि नव्हती, पण अशा परदेशांत जाऊन रसायनशास्त्राचें शिक्षण घेऊन आलेला एक माणूस तेथें आहे एवढें त्यांना माहीत होतें. या माणसाला हातीं धरून त्याच्यामार्फत गोविंदराव गंगाधरराव यांना गोत्यांत आणण्याचा घाट कोल्हापुरांत रचला गेला. शाळिग्रामाच्या भावी कारखान्यास पुढें महाराजांकडून कांहीं मदत मिळू शकेल या आशेनें तो महाराजांच्या हातचें बाहुलें होऊन नाचू लागला होता. स्फोटक बॉंब, डायनामाइट यासारखे पदार्थ तयार करण्याची माहिती देणारें एक पुस्तक त्याला देण्यांत आलें. आणि तें श्री. मोडकांनीं आपल्याला अटक होण्यापूर्वीं माझ्याकडे (शाळिग्रामकडे) दिलें व नीट सुरक्षितपणें तें गंगाधररावांच्या घरीं त्यांना पोहोंचेल अशी व्यवस्था करण्यास बजावून सांगितलें आहे, असा बनाव शिजवला. तें पुस्तक गंगाधररावांना द्यायचें अगर त्यांच्या घरीं पोचवायचें आणि लगेच त्याबद्दलची माहिती डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांना द्यावयाची, गंगाधररावांच्या घराची झडती करवून पुस्तकासहित गंगाधररावांना पकडावयाचें आणि कोल्हापूरला अटक करून न्यावयाचें असा सर्व बेत ठरला होता. याचा सुगावा गोविंदरावांना अगाऊच लागलेला होता. कोल्हापुरांत शिजत असलेलें राजकारणी कारस्थान, इतकेंच नव्हे, तर आपल्या कामगिरीबाबत पत्ते मिळवून आणण्याचा विडा शाळिग्रामनें उचलला आहे हेंहि गोविंदरावांना समजलें होतें. त्यामुळें तो कोल्हापुराहून निघाल्यापासून त्याच्या हालचालीवर गोविंदरावांची करडी नजर होती.

ही बातमी देणारे गृहस्थ कोल्हापूरच्या हालचालींची चांगली माहिती असणारे होते, महाराजांच्या विश्वासांतले होते. ते याच सुमारास बेळगांवला आले होते. आणि समान व्यसनांत गुरफटलेल्या, गंगाधररावांच्या एका स्नेह्याचे घरीं उतरले होते. त्यांचें

नाव विश्वंभरराव अष्टेकर. त्या स्नेह्यानें थोडा वेळ सावधपणा राखून ऐन खाण्या पिण्याच्या रंगात कोल्हापूरच्या गोष्टी काढल्या. त्यातच मोडक्याच्या खटल्याची माहिती विचारली. त्या गृहस्थानें अर्धवट झिंगलेल्या स्थितींतच माहिती दिली. 'गंगाधररावाच्या घरीं कांहीं जिनस ठेवण्याचा प्रयत्न शाळिग्राममार्फत होणार आहे.' ते अर्धवट हुषारींत व अर्धवट नशेंत असताना गैरसावधपणें असे बोलून गेले. दुसऱ्या दिवशीं गंगाधररावाच्या स्नेह्यानें ही बातमी गंगाधररावाच्या कानीं घातली. तथापि कोल्हापूरच्या गृहस्थानीं झिंगलेल्या स्थितींत या बातमीला वाचा फोडलेली असल्यामुळें गंगाधरराव प्रथम त्याच्यावर विश्वास ठेवण्यासच तयार होईनात पण आपल्याकडून सावध राहण्यास या उद्गाराचा फारच उपयोग आहे, हेंहि त्याच्या ध्यानात येण्यास वेळ लागला नाहीं

शाळिग्राम हे शहापुरास श्री. गावडे याच्या घरींच उतरले होते. त्या अनुरोधानें गोविंदराव-गंगाधरराव आणि त्याचे स्नेही याच्या कोल्हापूरच्या या नवीन व्यूहा विषयाच्या वाटाघाटी चालू होत्या, तर्कवितर्क चालू होते. इतक्यात शाळिग्राम व दोन पोलिस ऑफिसर बेळगावात आल्याची बातमी गोविंदरावाच्याकडून गंगाधररावाना समजली. त्यानीं आपल्याबरोबर एक कसलें तरी पुस्तक आणिलें असल्याबद्दलची वार्ताहि गोविंदरावानीं नक्की काढून घेतली होती. तें पुस्तक गंगाधररावाच्या घरीं ठेवण्याचा प्रयोगहि त्याच दिवशीं होणार असल्याचेंहि कळलेलें होतें. बेळगाव जवळील शहापूर गावीं श्री. गावडे या नांवाचे एक व्यापारी राहात असत. कोल्हापूर हद्दींतील जंगलचा हिरडा त्यानीं खरेदी केला होता. त्या ओळखीनें शाळिग्राम त्याच्याकडे राहावयास गले होते. कोल्हापूरचे पोलीस गंगाधररावाच्या हालचालीवर नजर ठेवण्याकरता बेळगावात आले. त्यापैकीं एक पोलीस गंगाधररावाच्या घरासमोर घिरट्या घालू लागलेला पाहून सर्व गोष्टी अधिक स्पष्ट झाल्या. या सर्व लोकावर नजर ठेवण्यासाठीं गोविंदरावानीं आपले गुप्तचर ठेवले होते. गावड्याच्या घरावर पाळत ठेवण्याची व्यवस्थाहि गोविंदरावाकडून करण्यात आली होती.

याला कसे तोंड द्यावयाचें याचा विचार गोविंदराव गंगाधरराव करीत होते. बेळगाव पोलिसाना बातमी देऊन त्यापैकीं एखाद्या पोलीस अधिकाऱ्याला गंगाधरराव याच्या घरीं लपून बसवावें आणि शाळिग्राम गंगाधररावाच्या घरीं येऊन बोलत असताच पुस्तकासहित त्याला पकडावें असा विचार प्रथम ठरला होता पण न जाणों कदाचित् शाळिग्राम आला नाहीं किंवा आला तरी त्याने येतेवेळीं आपल्याबरोबर पुस्तक आणिलें नाहीं, तर हातीं कांहींहि न लागता व्यर्थ नभ्रा मात्र होईल असें गोविंदरावाना वाटलें. परंतु गंगाधररावाना वाटत होतें कीं, बेळगावच्या पोलिसावर तरी कितपत विश्वास ठेवावा ? त्यापेक्षा पोलिसाना वर्दी देण्याची घाई न करता शाळिग्राम आल्यानंतर काय काय होतें तें पाहून पुढें काय करायचें तें ठरवावें असें गोविंदराव-

गंगाधरराव यानीं ठरविलें आणि शाळिग्रामाची वाट पाहत सर्वजण आपापल्या जागीं डोळ्यात तेल घालून उभे होते.

**गंगाधररावांच्या घरीं शाळिग्राम :** या वेळीं उभयपक्षाची मन स्थिति इतकी गंभीर होती की, कोणीहि थोडा जरी गाफीलपणा किंवा गल्थानपणा करील तर त्याचा कडेलोट झाल्याशिवायच होता. सायंकाळीं गावडे व शाळिग्राम दोघेच गंगाधररावाच्या घरीं आले. गावडे व गंगाधरराव यांची ओळख होतीच. पण त्या बिचाऱ्याला या कपटनाटकाविषयीं कांहींच माहीत नव्हतें. त्यानीं शाळिग्रामची ओळख गंगाधररावांना करून दिली. त्या वेळीं शाळिग्रामावर करडी नजर ठेवण्यासाठीं गोविंदराव तेथें उपस्थित होतेच. इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर, शाळिग्राम जपानला जाऊन रसायन विद्या शिकून आल्याबद्दल गंगाधररावांनी त्याचें अभिनंदन केलें व स्तुतिहि केली. गंगाधररावाच्या ज्या खोलीमध्यें ही बैठक झाली, ती खोली इतकी स्वच्छ आणि झळझळीत ठेवली होती कीं, एक सुताचा तुकडा जरी त्या खोलीमध्यें कोणीं आणून ठेवला असता तरी तो लागलीच डोळ्यात भरल्याखेरीज राहिला नसता. शिवाय गोविंदराव त्या शाळिग्रामावर तीक्ष्ण नजर रोखून उभे होतेच. गंगाधरराव जणु त्याच्यावर पूर्ण विश्वास ठेवूनच बोलत आहेत असा भाव शाळिग्रामाच्या मनात उत्पन्न व्हावा अशा धोरणानेंच गंगाधररावाचें बोलणें चालणें चालू होतें.

'आपणहि गुप्त चळवळ करणाऱ्यांपैकींच एक आहोंत, आपल्याला विश्वासात घेतल्यास पुष्कळ फायदा होईल' वगैरे गप्पा शाळिग्राम मारू लागला होता. गंगाधररावाच्या बोलण्याच्या पद्धतीमुळें शाळिग्रामला त्याच्याबरोबर बोलण्यास धीर वाटू लागला व हल्केंच त्याने पुस्तकाची गोष्ट काढली. "आपण अत्यंत प्रयासानें ते पुस्तक मिळवून मोठ्या शिताफीनें हिंदुस्थानात आणिलें आहे. मोडकाचा व आपला स्नेह असल्यामुळें त्याच्याकडे पुस्तक राहिल्यास तें सुरक्षित राहील असें वाटून आपण तें त्याच्याजवळच ठेवून दिलें होतें. परतु कोल्हापुरात जेव्हा गडबड सुरू झाली, त्या वेळीं त्यानीं तें पुस्तक मला परत केलं आणि प्रसंग पडल्यास तें गंगाधररावांच्याकडे ठेवण्यास हरकत नाहीं असेहि त्यानीं सांगितलें आहे." अशी हकीकत शाळिग्रामानें गंगाधररावांना निवेदन केली. गंगाधररावाच्या घरीं येताना शाळिग्रामानें तें पुस्तक या पहिल्या भेटीच्या वेळीं जाणूनबुजूनच बरोबर आणिलें नव्हते. गंगाधररावाचा अदाज घ्यावा. पहिल्याच भेटींत असल्या बॉबच्या गप्पा करणें, बॉबच्या कृतीचें पुस्तक बरोबर घेऊन हिंडणें आणि सर्वस्वी अनोळखी माणसाच्या देखत गंगाधररावांना ते दिल्यास आपल्याविषयीं नसता संशयच त्याच्या मनीं येईल आणि मग आपल्या सर्व कारस्थानी आशाचें मूळच खुटून जाईल अशा दीर्घ सूत्रानें त्यानें त्या पुस्तकासंबंधीं नुसती प्रस्तावनाच करून ठेवली. गंगाधरराव तें पुस्तक ठेवून घेण्यास तयार होतील तर तो लागलीच तें घेऊन येण्यास उत्सुकच होता, नव्हे

त्यानें तसें गंगाधररावांना बोलूनहि दाखविलें. गंगाधररावांना त्यामागील हेतु कळण्यास वेळ लागला नाहीं. त्यांना असल अनुभव काहीं कमी नव्हता. कोल्हापूर दरबारची फजिती करण्यास ही चांगली संधि आहे हें जाणून, तें पुस्तक ठेवून घेण्यास आपण तयार असल्याचें गंगाधररावांनीं शाळिग्रामाला सांगितलें आणि दुसऱ्या दिवशीं तें पुस्तक घेऊन येण्यास त्यास बजावून कळविलें आणि त्यास त्या दिवशीं परत पाठविलें.

शाळिग्राम परत गेला. आता पुढें काय करायचें या विचारात गोविंदराव गंगाधरराव यांनीं रात्र घालविली. या सर्व घडामोडीची वर्दी बेळगाव पोलीस अधिकाऱ्यांना द्यावी आणि गावड्यांच्या घराची झडती घेववावी असा विचार त्यांनीं नक्की ठरविला. पण यानूनच एक जबाबदारी उत्पन्न झाली व ती गंगाधररावांनीं अंगावर घेतली. ती जोखीम अशी—

दुसऱ्या दिवशीं पोलीस डेप्युटी सुपरिंटेंडेंटला ही हकीगत गंगाधररावांनीं कळवली. कोल्हापूरकरांचा काय बेत आहे याची कल्पना दिली. कोल्हापूर पोलिसांच्या उपद्रवाला बेळगावचे पोलीस कंटाळलेलेच होते. आपल्या हद्दींत काहीहि गडबड नसताना हे कोल्हापूरचे पोलीस येथें येऊन व्यर्थ धादल करीत आहेत, असें त्यांना वाटत होतें. याशिवाय संस्थानी पोलिसांच्या सांगण्याप्रमाणें येथील पोलिसांना वेळीं अवेळीं नाचावें लागे, त्यामुळें त्यांच्याविषयीं एक प्रकारची अढी बेळगाव पोलिसांच्या मनात उत्पन्न झालेली होती. त्यामुळें गंगाधररावांकडून ही हकीगत समजल्यानंतर डेप्युटी पोलीस सुपरिंटेंडेंटनें ती आपल्या वरिष्ठाकडे कळवली आणि मग दोघांनीं मिळून ती गोष्ट डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या कानावर घातली. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें गंगाधररावांचा लेखी जबाब घेतला. आणि ही बातमी खोटी ठरल्यास पोलिसांना खोटी बातमी दिल्याच्या आरोपाखालीं खटला भरण्यात येईल असा इशाराहि त्यांनीं गंगाधररावांना दिला. या जबाबाच्या आधारावर मॅजिस्ट्रेटांनीं गावडे यांच्या घराची झडती घेण्याबद्दल आणि गावडे व शाळिग्राम यांना अटक करण्याबद्दलचा हुकूम दिला. पण शहापूरगाव सांगली संस्थानच्या हद्दींत असल्यामुळें तेथील पोलिसांची मदत व संमति घेणें आवश्यक होतें. म्हणून त्या खटपटीला डेप्युटी सुपरिंटेंडेंट लागले

इतके होईतों एक लहानसा प्रमाद म्हणा की घटना म्हणा घडून आली. गावड्यांच्या घरीं राहून शाळिग्रामवर नजर राखण्यास गोविंदरावांनीं ज्या गृहस्थास ठेविलें होतें त्यांचा व गावड्यांचा स्नेह असल्यामुळें आणि गावड्यांवर काहीं तरी संकट येईल तर त्यांचा त्यातून बचाव व्हावा या सद्हेतूनें 'शाळिग्रामवर नजर ठेवण्यासाठीं आपली योजना झाली आहे' असें गावड्यांपाशीं ते बोलले. ही बातमी गावड्यांनीं शाळिग्रामला सांगितली. शाळिग्राम सावध झाला व ते पुस्तक बुकपोस्टानें त्यानें रजिस्टर करून महाराजांच्या नांवें कोल्हापुरास पाठविलें.

शालिग्रामच्या हालचालीवर गोविंदरावाची पाळत होतीच. शालिग्रामनें पार्सल फोटें घाघलें व पोस्टामध्यें कोणत्या नंबरनें रजिस्टर झालें आहे याची बातमी लागलीच काढून ती हकीकत कलेक्टरची भेट घेऊन त्याना गोविंदरावानीं कळविली. रीतीप्रमाणें गावडे याच्या घराची झडती झाली, पण मुद्देमाल काहीं मिळाला नाहीं. गावडे व शालिग्राम याना बेळगाव पोलिसानीं अटक करून डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटपुढें त्याना हजर केलें. त्यानीं दोघाच्या जबान्या घेतल्या. शालिग्रामानें कोल्हापूरपासूनची सर्व खरी हकीगत सांगितली. गावडे यानीं ते व शालिग्राम गंगाधररावाच्या घरीं आल्यापासूनची कथा निवेदन केली. त्यात पुस्तक कोल्हापूर महाराजाच्या नावानें रजिस्टर करून पाठविल्याचा उल्लेख आला आणि डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें कोल्हापूर पोस्टमास्तराना तार करून ते रजिस्टर बुकपोस्ट अडवून ठेवण्यास कळविलें. त्या बुकपोस्टाची डिलिव्हरी घेण्याचा प्रयत्न कोल्हापुरास झाला. पण त्यात यश न येता डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या तारेमुळें तें पोस्टमास्तराच्या ताब्यातच राहिलें. कोल्हापूर महाराजाचें नाव आणि संबंध, शालिग्रामच्या हकीगतीमध्यें निघाल्यामुळें बेळगाव डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें वरिष्ठाकडे रिपोर्ट केला. गावडे व शालिग्राम याना तसेंच अटकेंत ठेवलें. दोन दिवसा नंतर पुण्याहून पोलीस डेप्युटी इन्स्पेक्टर जनरल गायडर बेळगावास आले व त्यानीं गंगाधररावाना बोलावून घेतलं. गंगाधररावाची व गायडरची भेट हॉटेलात झाली. तेथेंच शालिग्रामहि होता. गंगाधररावाना पाहिल्याबरोबर शालिग्रामला रडू आलें व 'याचाच गळा मी कापणार होतों' असे उद्गार त्याच्या तोंडून निघाले. गायडरनें गंगाधररावाच्या तोंडून सर्व हकीगत ऐकून घेतली. त्याच दिवशीं शालिग्रामला घेऊन ते पुण्यास गेले. गावडे याना मुक्त करण्यात आलें. शालिग्रामलाहि मुक्त केलं असलें तरी तो गायडरच्या आश्रयानें पुण्यामध्येंच राहिला होता.

कोल्हापूर दरबार व कोल्हापूरकर महाराज याच्या अनेक तऱ्हाच्या खटपटी-नंतर हें प्रकरण दाबून टाकण्यात आलें. बेळगाव येथील अधिकाऱ्याना खरी हकीगत समजल्यामुळें त्याचा कोल्हापूर पोलिसावरील विश्वास अजिबात उडाला. कोल्हापूरचे पोलीस बेळगाव येथें आल्यास बेळगावचे पोलीस त्याच्यावर पाळत ठेवू लागले. त्यानंतर कोल्हापूरकराचे चाळे बंद पडले. शाहूमहाराज असेपर्यंत गंगाधरराव आणि गोविंदराव याना कोल्हापूर संस्थान वर्ज्य होतें. कसेंहि करून याना आपल्या हद्दींत आणून पकडावें व त्याच्याविरुद्ध काहीं तरी कुभांड रचून त्याना गोत्यात आणावें असले विचार कोल्हापूरमध्यें अखेरपर्यंत कायम होते. रेल्वेनें पुण्यामुंबईस जातायेताना रायबाग स्टेशन लागतें. तेथें चुकून सुद्धा रेल्वेगाडींतून ते दोघेहि रायबाग स्टेशन प्लॅटफार्मवर देखील कधीं उतरले नाहींत



प्रकरण तेविसावें

# नॅ. फि. अॅंड वॅ. कार्पोरेशन आणि गोविंदराव

पोलिसाच्या कटकटींतून आणि कोल्हापूर प्रकरणांतून बेळगावचे कार्यकर्ते थोडे मोकळे झाल्यानंतर अनेक तऱ्हेनें पुढील बेत व कार्यक्रम निश्चित करून कामाला लागण्याची बेळगावच्या कार्यकर्त्यांची धडपड सुरू झाली होती राजकारणाच्या क्षेत्रांत वाव किंवा माया राहिलेली नव्हती. जो तो टिळकांच्या सुटकेची वाट पहात बसलेला होता. टिळकांच्या सुटकेच्या वावड्याहि वारवार उठत असत. पंचम जॉर्ज बादशाहाच्या राज्यारोहण-उत्सवाच्या वेळीं टिळकांची मुक्तता हमखास होणार असे पुष्कळ लोक बोलत होते. मुंबईचें गव्हर्नर सिडनहॅमसाहेब मध्यें आडवे पडले नसते तर त्यांची मुक्तता कदाचित् झालीहि असती. राष्ट्रीय सभा मवाळांच्या हातांत होती. नवीन संस्था काढण्याची युक्त कोणामध्येंहि नव्हती. राष्ट्रीय सभेमध्यें घुसून तेथें आपल्या विचाराचा प्रभाव पाडणारा कोणी पुढारी नव्हता. एवंच राजकीय क्षेत्रांत काम करण्याची हौस असूनहि वाव किंवा संधि मिळण्यासारखी नव्हती.

मुंबईमध्यें डेक्कन स्टोअर्स व 'राष्ट्रमत' याच्या निमित्तानें मुंबईत राहाण्याचा योग गंगाधररावांना आलेला होता. भारतांतील कोणत्याहि प्रांतांतील लोकांपेक्षा दक्षिणी किंवा महाराष्ट्रीय लोक बुद्धीनें मुळींच कमी नसले तरी ते बहुतेक लोक कारकुनी पेशामध्यें राहूनच आपला उदरनिर्वाह करीत होते. अद्यापिहि बहुतांशीं त्या स्थितींत विशेष बदल झालेला आहे असे नाहीं. महाराष्ट्रीयामधील विचाराची दिशा मात्र अलीकडे बदलू लागलेली आहे. थोड्याशा भांडवलावर जरा व्यापार केला तरा किती फायदा होऊ शकतो याचें प्रत्यक्ष उदाहरण श्री. गोविंदराव याळगींचें होतेंच. बेळगावांत वकील व डॉक्टर, जमीनदार व सावकार वगैरे लोक कांहीं कमी कमावीत नाहींत, परंतु त्यांच्या संपत्तीचा उपयोग सार्वजनिक कार्याला गोविंदरावांच्याइतका होत नव्हता. राजकारण करावयाचें म्हणजे त्याला मनुष्यबळ आणि द्रव्यबळ यांची आवश्यकता भासतेच. म्हणून असा कांहींतरी उद्योग मोठ्या प्रमाणावर मुंबईमध्यें

काढावा असा बूट निघाला. अशा विचारांना गोविंदरावांकडून उत्तेजन मिळणार हें ठरल्यासारखेंच होतें. स्वतः गोविंदरावांनीच मुंबईस जाऊन राहावें व आपला धंदा मोठ्या प्रमाणावर वाढवावा व त्यांत होतकरू तरुणांचा शक्य तितका भरणा करावा असे बेत गोविंदराव–गंगाधरराव यांचे चालू होते. अशा वेळीं बेळगांवातील कार्यकर्त्यांना डॉ. वामनराव कुलकर्णी यांची गांठ पडली. त्यांना वाटत होतें कीं, लोकांनीं मीठ भरपूर खावें. या आपल्या तत्त्वनिष्ठेसाठींच पुढें त्यांनीं जेव्हां संन्यास घेतला तेव्हां आपलें त्या चतुर्थाश्रमांतील नांव 'स्वामी लवणानंद' असेंच ठेवून घेतलें. त्यांच्याहि मनांत कांहीं व्यापारउदीम करावा असें आलें होतें. पुरुषोत्तम मावजी या नांवाचे एक गृहस्थ होते. त्यांना व्यापारी वृत्तीपेक्षां इतिहाससंशोधनाचा नाद किंवा व्यसन अधिक होतें. त्यांच्या मनानें मुंबईस एक बँक उघडावयाची होती आणि बेळगांवकर मंडळींच्या मनांतहि हा विचार घोळत होता. अशा वेळीं त्यांची गांठभेट झाली. पुरुषोत्तम मावजी यांनीं या कामासाठीं एक ऑफिस उघडलें होतें. त्यांत बेळगांवकरांना सुपरिचित असलेले श्री. दा. वि. तथा बाबूराव गोखले काम करीत होते.

पुरुषोत्तम मावजींची माहिती काढण्याचा प्रयत्न झाला. ते सालस व सुसंस्कृत असल्याची माहिती मिळाली. बँकेचे केवळ शेअर्स घेऊन नफा मिळवावा या दृष्टीनें ही मंडळी धडपडत नव्हती तर त्यांच्याप्रमाणेंच बँकेच्या व्यवस्थेमध्यें या मंडळींना आपला संबंध पाहिजे होता. दक्षिणी सुशिक्षित लोकांचा प्रवेश असल्या व्यापारक्षेत्रांत व्हावा यासाठीं हे लोक या उद्योगांत पडलेले होते. याच सदर्भांत श्री. लक्ष्मण हरी छत्रे या नांवाच्या गृहस्थाशीं बेळगांवकरांचा संबंध आला. श्री. छत्रे यांनीं श्री. छोटालालजी यांची अशी समजूत करून दिली कीं, या बेळगांवकर मंडळींचा व त्यांचा संबंध आल्यास महाराष्ट्र–कर्नाटकांत बँकेचे शेअर्स पुष्कळ खपू शकतील श्री. छत्रे यांचा विजापूरचे श्री. श्रीनिवासराव कौजलगी यांच्याशीं पूर्वीपासूनच स्नेह होता.

कांहीं नेहमींचे करारमदार होऊन या बेळगांवकर मंडळींच्या बँकेचा जन्म झाला. आणि या बँकेची कर्नाटक भागाची एजन्सी त्यांना मिळाली. त्यांच्यामध्यें गंगाधरराव, कौजलगी, शामराव काल्कुंद्री व काका पाटील असे चौघे पोटभागीदार झाले. या बँकेचें नांव 'नॅशनल फिनान्सिंग अँड बँकिंग कार्पोरेशन लि०' असें होतें छत्रे यांच्या खटपटीनें हें सर्व जुळून आलें. म्हणून त्यांना बँकेंत एक जागा दिली. त्याशिवाय काम शिकण्याकरितां म्हणून श्री. बाबासाहेब सोमण व जीवनराव याळगी यांनाहि बँकेंत घेण्यात आलें. यांच्यापैकीं कोणीतरी डायरेक्टर्समध्यें असला पाहिजे अशी अट घालण्यांत आली होती. त्याप्रमाणें बॅ. बॅप्टिस्टा यांना बँकेंत घेण्याचें ठरविण्यात आलें. कंपनीच्या आर्टिकलप्रमाणें डायरेक्टर होण्यासाठीं दोन हजार रुपये भरावे लागणार होते. ही रक्कम गंगाधरराव, कौजलगी, शामराव काल्कुंद्री, काका पाटील या सर्वांनीं मिळून भरावयाची होती गंगाधररावांनीं दोनशें शेअर्सचे एक हजार

रुपये भरले व जे. बॅप्टिस्टा डायरेक्टराच्या बोर्डात सामील झाले. पुरुषोत्तम मावजी हेहि एक डायरेक्टर होतेच. शामराव कालकुंद्री व श्रीनिवासराव कौजलगी यांच्या मॅनेजमेंटखालीं अनुक्रमें बेळगाव व विजापूर येथें दोन शाखाहि उघडण्यांत आल्या. परंतु या मंडळीच्या अनुभवाचा फायदा छोटालालनें घेतला आणि त्यांना दगा दिला ती हकीगत अशी---

छोटालाल परेख यांनीं पॅरिसमधील स्पीसी बँकेंत काम केलें होतें. यांचा संबंध गंगाधरराव, कौजलगी यांच्याशींच प्रमुखत्वें आला. बँकेच्या धंद्याला फार मोठा वाव आहे, कर्नाटकांत आमच्या बँकेची एजन्सी घ्या, त्यांत बराच फायदा होईल, वगैरे गोष्टी त्यांनीं या दोघांना पटवून दिल्या. बेळगाव व विजापूर येथें बँकेच्या एजन्सी उघडल्या. ही कंपनी लंडनहून आपल्या शिक्क्याच्या सोन्याच्या लगडी तयार करवून आणीत असे. त्या सोन्याच्या लगडी बेळगाव भागांत विक्री करण्याचें काम गोविंदरावांनीं पत्करलें. शामराव कालकुंद्री आणि हणमंतराव देशपांडे यांनीं येथील एजन्सीचा सर्व व्यवहार आपल्या देखरेखीखालीं चालविला. मुख्य कचेरींत श्री. उमाकांत (बळिराम) देसाई आणि लक्ष्मणराव छत्रे हीं खास विश्वासांतील दक्षिणी माणसें काम करीत होतीं. त्यांच्या सहायानें बँकेचा व्यवहार कसा चालतो, हें प्रत्यक्ष पाहून त्याचा उपयोग इकडील एजन्सीच्या कामामध्यें करून घेतां येईल या दृष्टीनें श्री. बाबासाहेब सोमण व जीवनराव याळगी यांची रवानगी मुंबईस करण्यांत आली. सँढर्स्टरोडवरील पीरभाई मॅनशनमध्यें एक चांगलीशी जागा भाड्यानें घेऊन तेथें हे दोघे राहूं लागले. मुंबईच्या मुख्य कचेरीपेक्षा एखाद्या जिल्ह्याच्या ठिकाणच्या बँकेच्या शाखेंतील व्यवहार नजरेखालून घातल्यास अनुभवाच्या दृष्टीनें त्याचा उपयोग जास्त होईल, असें वाटल्यावरून छोटालालजींचे बंधु हरगोवनदास यांच्याकडे सुरतेस बाबासाहेब व जीवनराव यांची सोय लावली. तेथ त्यांना जो अनुभव आला त्यावरून बाबासाहेबांनीं गंगाधररावांना पत्र लिहून तो सावत कळवला. बँकेच्या शाखेकडे पाहण्याचा आणि बँकेच्या एजन्सीकडे पाहण्याचा शेट परेख यांचा दृष्टिकोन वेगळा होता. बँकेच्या कोणत्याहि शाखेचा फायदा मुख्य संस्थेच्या फायद्यांतच जमा होत होता. आणि एजन्सीच्या करारनाम्याप्रमाणें त्यांतील बराचसा हिस्सा एजन्सीकडे जात असल्यामुळें शेठ छोटालाल आपल्या शाखांना जी मदत करीत नसत तशी मदत एजन्सीला ते करीत नसत. एवढ्यावरच हें थांबलें नाहीं. पुढें हा पक्षपात फारच जाणवूं लागला. त्याचे श्री. बाबासाहेब---जीवनरावांशीं खटके उडूं लागले. मुख्य कचेरींतील एजन्सीचें डिपॉझिट अदमासें ६५ हजार रुपये गडप करण्याचा घाटहि शेटजींनीं घातला होता. हें सर्व समजल्यानंतर गंगाधरराव व श्रीनिवासराव कौजलगी मुंबईस गेले. त्यांनीं एजन्सीचा व्यवहारच संपविण्याचें ठरविलें. तोंपर्यंत ही भानगड कोर्टांत गेली होती. जस्टिस दावर यांच्याकडे हें काम चालावयाचें होतें. त्यांना शेठ

परेरा याच्या असल्या अनेक भानगडी माहीत होत्या. त्यानी खाजगी रीतीनें आपल्या सॉलिसीटर मित्रापुढें सहज बोलताना या एजन्सीच्या खटल्याचा उल्लेख करून म्हटले, 'छोगालाल आयता माझ्यापुढे येत आहे. त्याची चागली खरड काढतों' हे त्याचे उद्गार कोणींतरी शेठजींच्या कानावर घातले. परिणाम असा झाला कीं, शेठजी जे आपसात काहींहि करावयास तयार नव्हते ते एकाएकीं गगाधररावाना सागू लागले कीं, 'कोर्टकचेरीचा खर्च विनाकारण कशाला करावा? त्यापेक्षा आपण काहीं तरी तडजोड करू या.' लौकरच एजन्सीची रकम परत झाली आणि एजन्सी बद करण्यात आली.

**गोविंदराव याळगींचें साहाय्य :** अशा प्रकारें हें मुख्य प्रकरण सपलें तरी त्याचें शेपूट मागें उरलेंच होतें. बॅ. बॅप्टिस्टाना बेळगावकराच्या वतीनें डायरेक्टर करण्यात आलें होतें. त्यासाठीं त्याना पाच हजार रुपयाचे शेअर्स खरेदी करावे लागले होते. अर्जाबरोबरच गगाधररावानीं एक हजार रुपये पहिला हप्ता भरलेला होता. केवळ गगाधरराव वगैरे मडळीकरता म्हणून बॅप्टिस्टा या भानगडींत पडले होते. *त्याच्यासबधानें येईल तो बोझा चौघानीं म्हणजे गगाधरराव, श्यामराव,* कौजलगी व काका पाटील यानीं उचलावयाचा असे पूर्वीच ठरलें होतें. छोगालजीं

छत्रेमास्तरानीं त्याच्या नांवें आलेलीं गंगाधररावाचीं पत्रें टिळकाकडे पाठविलीं. टिळकहि या वेळीं नुक्तेच तुरुंगांतून सुटून आले होते. तरी त्यानीं गंगाधररावाना पत्र लिहिलें कीं, 'अडचण भागली नसेल तर लागलीच पुण्यास यावें.' पत्रांतील हा आपलेपणा पाहताच त्याना धीर आला, डोळे पाण्यानीं भरले आणि मनातल्या मनात त्या स्नेहमूर्तीस त्यानीं अभिवादन केले. लो. टिळकानीं एकदा ज्याला आपला म्हटलें त्याचा सर्वतोपरी परामर्श घेणें आपलें कर्तव्य आहे, असे ते मानीत असत. 'मी प्रयत्न करीत आहें. न साधल्यास आपल्याकडेच येईन' असे गंगाधररावानींहि तितक्याच आपुलकीनें त्याना कळविलें.

शेवटीं गोविंदरावानींच या संकटाची निरवानिरव जातीनें केली आणि प्राप्त प्रसंगातील गरज भागवली. अर्थात् त्यामुळें गंगाधरराव या बॅंक जोखमींतून कायमचे मुक्त झाले. या लहान परंतु वेअब्रूची वेतणाऱ्या गोष्टीवरून गंगाधरराव–गोविंदरावाना पुष्कळच बोध मिळाला. पण यापायीं त्याना बराच पैसा वेचावा लागला, खस्ता खाव्या लागल्या आणि आपलें व आपल्या मित्राचें जीवन निष्कलंक राहावें म्हणून येईल त्या प्रसंगाला तोंड द्यावें लागलें. स्नेहाच्या संबंधानें अगर आपल्या बरोबरीनें काम करणाऱ्या सहकारी मंडळीसंबंधानें या दोघानीं एक शब्दहि बोलावयाचा नाहीं, असे जणु व्रतच घेतलें होतें. हें अमोल व्रत त्यानीं अगदीं आमरण आचरलेलें आहे. धन्य आहे याच्या कार्यकुशलतेची !!



प्रकरण चोविसावें

# खुनाच्या खटल्यात गंगाधरराव

गंगाधररावांवरील खून खटल्याचा उल्लेख अगदीं मोघमपणें यापूर्वी दोनतीन प्रकरणांतून आलेला आहे. या खटल्यात गोविंदरावांनी धमालीचें धाडस, कल्पकता आणि मित्रप्रेम सर्वांच्या प्रचीतीस आणून दिलें, हें म्हणणेंसुद्धा मोघमच आहे. म्हणून या खटल्याची, त्यांतील डावपेचाची आणि या खटल्यात गोविंदरावांनी केलेल्या कामगिरीची थोडी विस्तृत माहिती देऊन, वाचकांना या खटल्याची कल्पना आणून देण्याचा प्रयत्न करीत आहें.

बेळगावात हरि गोविंद कालकुंद्रीकर तथा हरिनाना या नावाचे एक सुखवस्तु गृहस्थ होते. त्यांचें घराणें बेळगावांतील सधन घराण्यात मोडत असे. कापडदुकान, जमीनजुमला, देवघेवीचा व्यवहार वगैरे विविध व्यवसायामुळें या घराण्याचा लौकिक आजहि गर्भश्रीमंतासारखा आहे. श्री. हरिनानांचे वडील व वडील बंधु वारल्यामुळें सर्वच जिंदगीचे ते एकमेव मालक बनले होते. त्यांची आई गंगाधररावांच्या 'हुदली' गावचीच असून त्यांच्या आप्तघराण्यांतीलच होती. गंगाधररावांचे स्नेही हणमंतराव देशपांडे यांची लहान बहीण हरिनाना यांना दिलेली होती. हणमंतराव देशपांडे, गंगाधरराव-गोविंदरावांच्या पठडींतील आहेत. अनेक बऱ्यावाईट प्रसंगीं ते एकमेकांचे जिवलग साथीदार म्हणून काम करीत आलेले आहेत याचा अनुभव गंगाधररावांच्या 'जीवनपर्यंत' आणि यापूर्वी या पुस्तकात सुद्धा त्यांचा जो उल्लेख आलेला आहे त्यावरून वाचकांना आलेलाच आहे. पण या त्रिवर्गांच्या जिव्हाळ्याचे व कसोटीचे जे अनेक प्रसंग आले त्यापैकींच गंगाधररावांवरील खुनाचा खटला हा एक रम्याद्भुत प्रसंग आहे. खुनाच्या आरोपावरून हरिनानांवर पोलिसांनीं एक खटला भरला व त्यात गंगाधरराव कसे गोवले गेले याची पुसट कल्पना त्यांच्या नात्याच्या संबंधावरून येण्यासारखी आहे.

वडिलांच्या मृत्यूच्या वेळीं हरिनानांचें वय २३।२४ वर्षांचें असावें. अर्थी

तारुण्याची ऐन उमेद आणि हातात मोठी इस्टेट. मनावर लगाम ठेवील असे घरात वडीलधारे कोणी नाहीं. तेव्हा त्याच्या जवानीचा वारू उधळायला वेळ कसला! त्याच्या वडिलाच्या वेळेपासूनच त्याच्या घरामध्यें शकर देशपाडे या नावाचा एक कारकून होता. हरिनानाना भलत्या मार्गाला लावून त्याच्या सर्व इस्टेटीची व्यवस्था शकरनें आपल्या हातात घेतली होती. हरिनानाना व्यवहाराचा काहींच अनुभव नसल्यामुळें त्यानीं सर्व विश्वास शकरवरच टाकला होता. घरातील ठेवदेव, देणेघेणें, जमीनजुमला व दुकान याचे व्यवहार व वसुली, झाडून सारी व्यवस्था हा शकरच पाहू लागला. हरिनाना हे गाणेंबजावणें, नाचरग, नाटक वगैरे ख्यालीखुशालींतच दग असत. त्याचें घराकडील लक्ष जवळजवळ उडाल्यासारखेंच होतें. उलट याच प्रमाणात सदर शकरचें वजन घरात वाढू लागले. त्याला घरात अधिकाधिक सवलत मिळू लागली. त्याला रान मोकळें मिळाल्यासारखें झालें. तोहि मालकाच्या बरोबरीनें व्यसनात गुरफटत चालला. चैनीला चटावला. हरिनानाच्या आईला हें पसत होणेंच शक्य नव्हतें. तिनें आपल्या मुलाची कानउघडणी करण्याचा वारवार प्रयत्न केला. पण हा खटाटोप म्हणजे पालथ्या घागरीवर पाणी ओतण्यासारखाच ठरला.

आईच्या मनात घरची व्यवस्था आपला बधु अमृत याच्या हातीं देण्याचें होतें. या अमृताच्या घरची स्थिति गरिबीची असल्यामुळे तो आईच्या बेताल अनुकूलच होता. त्यालाहि आपल्या भाचाच्या, म्हणजे हरिनानाच्या घरची व्यवस्था आपल्या हातीं असावी असें वाटतच होतें. त्याप्रमाणें त्याची खटपटहि चालू होती. अर्थात् अमृत व शकर चुरस उत्पन्न झाली. शकराला आपल्या हावची सत्ता जावी असे कदापि वाटण्यासारखें नव्हतें. त्यामुळें त्याच्या स्पर्धेचें पर्यवसान द्वेषात झालें. 'हुदली' गावात अमृताची जमीन विशेषशी नसल्यामुळें त्यानें बाळेकुद्रींत एका इनामदाराची जमीन खडानें केली होती. हुदलींतून तीन बेरड नेऊन त्याच्याकडून त्या जमिनीची तो मशागत करवीत असे. अशा स्थितींत शकर देशपाडे एकाएकीं नाहींसा झाला. घरच्या मडळींनीं त्याच्याबद्दल पुष्कळ शोध केला, पण पत्ता लागला नाहीं.

शकरच्या घरीं त्याची पत्नी, एक चुलत बधु, पुतण्या वगैरे मडळी होती. पुतण्या, शकरची आई व बायको हरिनानाच्या घरींच राहत असत. बरेच दिवस झाले तरी शकराचा पत्ता लागत नाहीं, असे दिसून आल्यावर शकरच्या चुलत भावाला शकरचा खून झाला असावा, असा सशय येऊन त्यानें पोलिसाकडे तसा विनतीअर्ज केला. आणि त्यानें हरिनानाला धमक्या देण्यास सुरवात केली. हरिनाना स्वभावानें मोळसर असल्यामुळे खून करण्यापर्यंत त्याची मजल जाईल असें पोलिसानाहि वाटत नव्हतें. म्हणून शकरच्या चुलतभावाच्या विनतीअर्जाची वर्णी लागेना शेवटीं कटाळून त्यानें पोलिसाकडे फिर्यादच दिली. शकरचा खून बाळेकुद्री येथें हरिनानाचा

मामा अमृत यानें केला असून शंकरच्या व हरिनानाच्या कुटुंबाचा दुर्वृत्त संबंध होता असें खुनाचें कारण दाखविलें होतें. बाळेकुंद्री गांव सांगली संस्थानच्या हद्दींत असल्यामुळें सांगली पोलिसांनीं तपासाला सुरवात केली. त्यांना कांहीं खुनाचा नक्की पत्ता लागू शकला नाहीं. अर्थात् अशा प्रकारचा कोणताहि गुन्हा आपल्या हद्दींत घडलाच नाहीं, असा अहवाल त्यांनीं केला असला तरी अंतर्यामीं त्याचा तपास चालूच होता. त्यांतील शिरहट्टीचा एक जमादार, गोविंदराव याळगी यांच्या परिचयाचा होता. त्याच्या मार्फत गोविंदरावांनींच पोलिसांच्या कारवाईची नित्यबातमी काढलेली होती.

बेरड लोक मधून मधून हुदलीच्या आजूबाजूच्या भागांत उपद्रव देत होतेच. दहा-पांच वर्षांनीं केव्हांतरी हे लोक धुडाई करीतच असत. हा भाग डोंगराळ असल्यामुळें आणि दोनतीन सरकारांच्या हद्दी या भागांत मिळत असल्यामुळें एका हद्दींत गुन्हा करून दुसऱ्या राज्यांत पसार होणें अत्यंत सहज व सुलभ होतें. या बेरड लोकांमध्यें 'शिव्या' या नांवाचा एक बंडखोर बेरड होता. तो ५०।६० लोकांना हाताशीं धरून स्वतःचें एक टोळकें करून राहात असे. त्याला व त्याच्या साथीदारांना पकडण्यासाठीं एक पोलीस इन्स्पेक्टर, दोनतीन फौजदार आणि १००।१५० पोलीस यांची नियुक्ति झाली होती. या इन्स्पेक्टरचें नांव जाफर इमाम असें होतें. त्याला या गुन्ह्याची वार्ता मिळून खुनाचा पत्ता लागत नाहीं, असें कळलें. आणि त्यानें हें काम ईर्षेनें आपल्या हातांत घेतलें. गुन्ह्याचा तपास लावण्याची त्यानें प्रतिज्ञाच केली. त्यानें प्रथम अमृताच्या शेतांत बाळेकुंद्री येथें काम करणाऱ्या तीन बेरडांना पकडलें, त्यांचे अनन्वित हाल आरमले व दोघांच्याकडून कबुलीजबाब घेतले. 'अमृत, आपण तिघे बेरड नोकर व तेथीलच बाळू मोहिते यांनीं मिळून शंकरचा खून केला आणि त्याचें प्रेत जाळून उरलेलीं हाडें पुरून टाकलीं.' असा कबुलीजबाब मिळाल्यावर त्यांनीं दाखविलेल्या जागेतून तीं हाडें उकरून काढलीं. त्याचा रीतसर पंचनामा केला. अमृतलाहि पकडण्याचा जाफर इमामचा विचार होता. परंतु तो पुढें केव्हांहि पोलिसांच्या हातीं लागला नाहीं.

ही सर्व हकीगत गोविंदरावांना ते बल्लारी येथें त्यांच्या सर्व मित्रमंडळींसह जीवनरावांच्या लग्नाच्या गडबडींत गुंतले असतांना समजली. त्यांनीं आपली शांतवृत्ति ढळू दिली नाहीं. लग्नसमारंभ व्यवस्थितपणें पार पडला. सर्व मंडळी बेळगांवला परतली आणि मगच गंगाधरराव व हणमंतराव यांच्याकडून त्यांनीं सर्व माहिती मिळवली आपल्या मित्रावर आलेली आपत्ति म्हणजे आपल्यावर आलेली आपत्ति होय या जाणिवेनें त्यांतून मार्ग काढण्याचें श्रेय गोविंदरावांनीं आपल्या मित्राच्या प्रयत्नाला आणून दिलें. त्याच्या स्वभावाला अनुसरून याचा शोध लावायचाच या हेतूनें त्यानें आपल्या डोक्यांतील आपला उद्योगधंदा, संसार आणि असल्या इतर गोष्टी पार काढून टाकल्या.

**हरिनानांना अटक :** हरिनानाविषयीं संशय घेण्यास आतापर्यंत जागाच नव्हती. पण खुनाला कारण किंवा हेतु दर्शविताना शंकर व हरिनानाचें कुटुंब याचा संबंध होता, असे दाखविल्यानें हरिनानावर पाळत ठेवण्यात आली. पोलिसांचे काय बेत चालले आहेत याची माहिती गोविंदरावानीं मिळविली होती. हणमंतराव, गोविंदराव व गंगाधरराव हे स्नेही असल्यामुळें आणि स्नेहाच्या म्हणजे हणमंतरावाच्या भगिनीच्या अब्रूवरच घाला पडत असल्यानें त्यांच्या मेहुण्यावरच खुनाचा आरोप येण्याचा प्रसंग आला होता. त्यामुळे हुदलीहून गंगाधररावाना बोलावून घेतलें. हरिनानाकडून सर्व माहिती घेऊन, स्वतः गंगाधररावानीं वस्तुस्थितीची आपली स्वतःची खात्री करून घेतली, आणि गोविंदरावाना पोलिसांच्या हालचालीवर नजर ठेवण्याविषयीं सूचना दिली. पोलिसांना जेवढा पुरावा तयार केला होता त्याची बारकाईनें छाननी करण्यात आली. हाडाविषयीं पूर्ण तपास लावला. त्यात हाडें दुसऱ्याच एका प्रेताचीं असून तें प्रेत उकरून काढून मिळवलीं व पोलिसांनीं पंचनामाहि खोटाच केलेला आहे, असे खात्रीलायक वृत्त गोविंदरावानीं मिळवलें. लोकांना फितूर होण्यास संधीच राहू नये म्हणून पोलीस त्यांचे जबाब मॅजिस्ट्रेटपुढेंच नोंदवून घेण्याची दक्षता घेत होते. परंतु त्यांच्यापैकींच कांहीं लोक गोविंदरावाच्याकडे येऊन आपण आपला जबाब कसा व का दिला हें सांगत असत. म्हणून त्यांच इसमाचे मॅजिस्ट्रेटपुढे प्रतिज्ञालेख (ॲफिडेव्हिट) करवून ठेवण्याचा उपक्रम गंगाधररावानीं चालू ठेविला होता.

**गंगाधररावांवरील आरोप व अटक :** तीन वेरड गंगाधररावाच्या हुदली गावचेच असल्यामुळें तेथील कांहीं पुरावा पोलिसांना पाहिजे होता, तो त्यांना लवकर मिळेना. याला कारण गंगाधरराव आहेत असा पोलिसांचा ग्रह झाला. त्याला विष्णुपंत गाडगीळ आणि बडोपंत उचगावकर यानीं दुजोरा दिला. यातूनच गंगाधररावानाहि याच खटल्यात गोविण्याची कल्पना पोलिसांच्या डोक्यात आली. मग त्या दृष्टीनें त्यांच्याविरुद्ध पुरावा तयार करण्यास पोलिसांनीं प्रारंभ केला. या खटल्यातून आपलें अंग गंगाधरराव काढून घेतील तर त्यांच्याविरुद्ध पोलीस कांहीं करणार नाहींत असेहि त्यांना कळविण्यास पोलीस चुकले नाहींत. याचा परिणाम गंगाधररावावर मुळींच झाला नाहीं. इतकच नव्हे, तर गंगाधरराव व गोविंदराव अधिक त्वेषानें व जोरानें कामाला लागले. पोलिसांच्या कारवाईच्या बातम्या मिळवणें, पोलिसांच्या डावपेचावर प्रतिपेच टाकून तोड काढणें हा त्यांचा जणु नित्याचाच व्यवसाय झाला, इतकें ते या गोष्टींत लक्ष घालू लागले. हरिनानाचा एक वकील म्हणूनच केवळ नव्हे, तर त्यापेक्षाहि अधिक निकटचा संबंध या कामीं गंगाधररावाचा होता. प्रथमपासूनच पोलिसांचा व्यूह ढासळून पाडण्याची शिकस्त गंगाधरराव-गोविंदरावानीं केली होती. यामुळें गंगाधररावाचा काटा काढून टाकण्याचें पोलिसानींहि ठरवलें होतें. पण याच

पोलिसांनी एक अत्यंत मोठी घोडचूक केली. कारण हरिनाना आरोपी असेतोपर्यंत या खटल्याला जें राजकी स्वरूप होतें तें गंगाधररावांना आरोपी केल्यामुळें पालटलें. त्याला सार्वजनिक स्वरूप आलें. पोलिसांनी खोट्यावरच खटल्याची उभारणी केली आहे, असाच सर्वसाधारण लोकप्रवाद वाढूं लागला. त्यामुळें गंगाधररावांवर सर्व बाजूंनीं सहानुभूतीचा वर्षाव होऊं लागला. गंगाधररावांना पकडल्यानंतर मामा पाटलांनीं ठाण्याकडील आपलीं सर्व कामें सोडलीं व बेळगांवासच मुक्काम केला. गोविंदरावांनीं आपला प्रपंच व आपलें दुकान बाजूला सारलें. आणि पराकाष्ठेचा प्रयत्न आरंभला. आपल्या स्वतःच्या जबाबदारीवर खर्च करण्यासहि सुरवात केली.

**गोविंदरावांचें धाडसी बेत** : पोलिसांनीं गंगाधररावांच्याविरुद्ध तीन साक्षीदार तयार केले होते : (१) मुसलमान देसाई अक्कलगी (२) जुगारी (३) हरिनानाच्या घरांतील नोकर हुसन्या. यापैकीं अक्कलगीचे मुसलमान देसाई व गंगाधररावांचे घराणें यांच्यामध्यें पूर्वापार वैर होतें. त्यांच्याविरुद्ध कोर्टात दावेहि चालू होते. दुसरा साक्षीदार बोलूनचालून जुगारी होता. त्याच्या तोंडून पोलीस जे वदवीत होते तें कोर्टात टिकण्यासारखें नव्हतें. तिसरा साक्षीदार हरिनानाच्या घरांतील नोकरच होता. याचीच साक्ष कदाचित् गंगाधररावांना काहींशी जड गेली असती. तो घरात वावरणारा हरिनानाचा नोकर असल्यामुळें त्याच्या साक्षीलाच महत्त्व अगर वजन प्राप्त होणें शक्य होतें. त्याकरतां त्याला कोठेंतरी लपवून ठेवावा अशी कल्पना गोविंदरावांना आली. पण इतक्या थराला जाण्याचें कारण नाहीं. आपण त्याला उलटतपासांत रात्रीनें पाहूं असा मामा पाटलांनीं गोविंदरावांना विश्वास दिला. पण गोविंदरावांच्या मनांतलें वेड गेलें नाहीं. एखादी गोष्ट करावयाची असें त्यांच्या मनानें घेतलें म्हणजे त्यांना दुसरें काहींच सुचत नसे. गोविंदरावांच्या या स्वभावाला अनुसरून त्या नोकरसाक्षीदाराला त्यांनीं हरप्रयत्न करून आपल्या ताब्यांत घेतलें. हा साक्षीदार हुडकून काढण्याच्या आशेनें पोलीस लोक काहींतरी कारणें सांगून खटल्याला मुदतीवर मुदती मागून घेऊं लागले; व त्यांच्या मागणीप्रमाणें त्यांना मुदती मिळतहि असत. तो जर मिळाला नाहीं तर गंगाधररावांच्यावरील खटला काढून घ्यावा लागेल हें पोलीसहि जाणून होते. अशा प्रकारें कांहीं दिवस गेल्यावर पोलिसांनीं त्या साक्षीदाराचा तपास लावला, व त्याला आपल्या ताब्यात घेतलें. त्याला बेळगांवास न ठेवतां गुजनाळ खेड्यांत पोलिसांचा ठाणा होता तेथें नेऊन कडक बंदोबस्तांत ठेवलें. त्याला सरकारची कायदेशीर अटक नव्हती. गोविंदरावांना आपला डाव फसला असें वाटलें. तथापि गोविंदराव म्हणजे असल्या गोष्टीनें सहज निराश होणारा बुजदिल प्राणी नव्हे. त्यांनीं पुन: तोच प्रयत्न आरंभला व निश्चयानें तयारी केली. साक्षीकरतां त्याला गुजनाळहून बेळगांवला आणल्याशिवाय गत्यंतर नाहीं हें उघड होतें. अर्थात् त्या वेळीं कांहीं साधतें का पाहावें असा गोविंदरावांनीं विचार केला.

**काका पाटलाची दक्षता :** सर्वसाधारणपणें अशा प्रकारचे खटले सेशन कमिट होतातच. आणि नंतर सेशन कोर्टातच आपलें वकिली कौशल्य—जें काय असेल तें—प्रगट करावयाचें अशा शिरस्ताच झाल्यासारखा असतो. खालच्या कमिटिंग मॅजिस्ट्रेट कोर्टात चांगल्या वकिलानें विनाकारण आपला वेळ घालूं नये अशी विचारसरणी वेळगांवच्या बहुतेक वकिलाची होती. परंतु काका पाटलानीं अगदीं प्रथमपासूनच अगदीं किरकोळ, बारीकसारीक वाटणाऱ्या गोष्टींकडे जातीनें लक्ष पुरविण्यास सुरवात केली. पोलिसाचा कमकुवतपणा कोठें आहे हें जाणून तो अगदीं उघडा करावयाचें धोरण त्यानीं पत्करलें. इतकेंच नाहीं, तर जो काहीं पुरावा पोलिस कडून आला असेल तो सुद्धा मुळासकट कसा उखडून टाकावयाचा या एकाच गोष्टीकडे गोविंदरावाचेंहि लक्ष लागून राहिले होतें. काका पाटील आणि गंगाधरराव यानीं अमुक एक गोष्ट झालीच पाहिजे असे ठरविल्यानंतर गोविंदरावानीं ती गोष्ट आपल्या मित्रमंडळीच्या मदतीनें, रात्रीचा दिवस करून आणि वेळप्रसंगीं अचाट धाडस करूनहि पार पाडलेली आहे. यामुळें पोलीसहि बेचैन झाले. काय करावें तेंहि त्याना सुचेनासें झाले. गंगाधररावाना अटक झाल्यामुळें गोविंदरावाची जबाबदारी वाढत गेली.

**नोकरसाक्षीदार पुनः लांबविला :** हरिनानाचा नोकर हुसेन पोलिसाच्या हातीं लागताच हरिनानावरील खटल्यास सुरवात करण्यात आली होती. आरोपीतर्फे श्री. काका पाटील, व श्री. आजरेकर वकील हे काम चालवीत होते. पहिली साक्ष, तपास करणारा पोलीस इन्स्पेक्टर जाफर इमाम याची झाली. त्याची सरतपासणी होताच सरकारी वकिलानें खटला सेशन कमिट करण्यास कोर्टाला सांगितलें. पण काका पाटील यानीं या साक्षीदाराची उलटतपासणी आपण करूं इच्छितों असें सांगून चार दिवस त्याची कसून उलटतपासणी केली व ती इतक्या कुशलतेनें केली कीं, त्या तेवढ्याशा पुराव्याच्या आधारावर खटला सेशन कमिट करणें हास्यास्पद झालें असतें. म्हणून मॅजिस्ट्रेटनें अधिक पुरावा मागितला जुगारी साक्षीदार कृष्णा शिंदे याचीहि उलटतपासणी झाली. त्याचीहि स्थिति पहिल्या साक्षीदाराप्रमाणेंच झाली. म्हणून हरिनानाच्या नोकराला गुजराथेहून आणण्याचें पोलिसाना ठरवावें लागलें.

ही बातमी गोविंदरावाना कळताच साक्षीदाराला कोणत्या गाडीनें व केव्हा आणणार आहेत याची नित्तबातमी काढण्यात आली. रात्रीं दहा वाजता वेळगांवला पोहोंचणाऱ्या गाडीनें साक्षीदाराला आणणार आहेत, असें गोविंदरावाना समजताच त्यानीं निर्णय घेतला कीं, साक्षीदार स्टेशनवर उतरताच त्याला पळवावें. गोविंदराव त्या तयारानें स्टेशनवर गेले. स्टेशनवर एक घमनीगाडी पडदे सोडून उभी केली होती. त्या गाडीभोंवतीं आपलीं पाचसहा खात्रीचीं माणसें गोविंदरावाचीं उभीं होतीं. आणि स्टेशनबाहेरील आगारामध्यें दुसरी एक घमनीगाडी उभी होती. स्टेशनवर असलेल्या इतर सर्व घमन्या गाड्या आगगाडी स्टेशनात उभी होताच

चालू होऊन घेरावेरा पळू लागतील अशी तजवीज केली. पडदे सोडलेल्या घमनी गाडींत 'काहींतरी' किंवा 'कोणीतरी' महत्त्वाचें आहे आणि म्हणूनच त्याच्या रक्षणासाठीं हीं माणसें उभीं आहेत असेंच कोणाहि पाहणाराला वाटण्यासारखें होतें.

आगगाडींत त्या साक्षीदाराला चारपाच पोलिसांच्या मध्यच वसविलें होतें. आगगाडी स्टेशनवर येताच साक्षीदाराबरोबर आलेले पोलीस आपापलें सामानसुमान घेऊन उतरण्याच्या गडबडींत होते. संबध स्टेशनवर एकाएकीं अंधार होईल अशीहि खबरदारी घेण्यात आलेली होती. या काळोखाच्या संधीचा फायदा घेऊन गोविंदरावांच्या लोकांनीं त्या साक्षीदाराला बाहेर नेऊन त्या आगगाडींत उभ्या असलेल्या घमनी गाडींत घातलें व ठरल्या जागीं घमनी निघून गेली. स्वत साक्षीदाराच्या मनातहि त्या वेळीं निसटायचेंच होतें. म्हणूनच तोहि झपकन् बाहेर पडून बिनबोभाट घमनींत जाऊन बसला. त्यालाहि आपल्या धन्याविरुद्ध काहीं सांगायला नकोच होतें म्हणून तोहि या गडबडींत सामील झाला होता.

स्टेशनवर गोविंदरावाना पाहाताच आपल्या साक्षीदाराकडे पोलिसांचें लक्ष गेलें. त्याच्या नजरेला स्टेशनबाहेर बंगेनरतात ठेवलेली व पडदे सोडलेली घमनी गाडी दिसली. त्याच गाडींत आपला साक्षीदार असला पाहिजे अशी पोलिसाची खात्री झाली. अर्थात् त्या अवधींत त्यांनीं साक्षीदाराचा दुसरीकडे तपासच केला नाहीं. त्या गाडीचे पडदे वर करण्याविषयीं पोलिसांनी गाडीवानास फर्माविलें. परतु एकदम गोविंदराव पुढें झाले व त्यांनीं 'ही गाडी माझी आहे, मी गाडीचे पडदे वर करणार नाहीं.' असें निक्षून सांगितलें. त्यामुळें पोलिसाची व गोविंदरावाची बरीच वाचावाची झाली. या तांडातांडींत १५।२० मिनिटें निघून गेलीं. आपली नियोजित गाडी ठराविक ठिकाणीं पोंचली असेल अशी खात्री झाल्यावर, व्यर्थ तेवढ्यासाठीं तंटा नको म्हणून गोविंदरावानीं गाडीचे पडदे वर करण्यास गाडीवानास परवानगी दिली. गाडीचे पडदे वर झाले. तेव्हा पोलिसाना कळून आलें कीं, गाडींत कोणीहि मनुष्य नाहीं आता पोलीस गडबडले. आपला साक्षीदार नाहींसा झाला तेव्हा पोलीस या बाबतींत आपल्यावर काहींतरी तोहमत आणणारच ही गोष्ट गोविंदरावाच्या नजरेपुढें होतीच पण यानतर पोलीस काय करणार हेंहि त्याना पाहायचें होत. म्हणून या गडबडीच्या वेळीं काहा काळ स्टेशनमास्तर व तिकीट कलेक्टर याच्याशीं गोविंदराव बोलत उभे राहिले होते. जरूर पडली असती तर त्यांनी गोविंदरावाच्या वर्तनें ते आपल्याशीं बोलत उभे असल्याच्या साक्षीहि दिल्या असत्या. सुदैवानें त्याना तो प्रसंग आलाच नाहीं. गोविंदराव मात्र त्याच धोरणानें त्या वेळीं रेल्वे अधिकाऱ्याशीं बोलत उभे राहिले होते.

सदर नोकरसाक्षीदाराला गोविंदरावानीं आपल्याच घरीं नेलें होत. तेथें एक हजाम तयारच ठेविला होता. साक्षीदार घरीं पोहोंचतांच त्याच्या दाढीमिश

मादरण्यात आल्या व त्याला एक शास्त्रीबोआ बनवून त्याची एका खेड्यात रवानगी करण्यात आली. हुसेनला हुडकण्यासाठी पहाटे तीन वाजता पोलीस गोविंदरावाच्या घरीं दाखल झाले. पोलिसांनी रात्रीं दारावर थाप देताच गोविंदरावांनी एकदम दार उघडलेंच नाहीं. बाजूच्या खिडकीतून कोण आले आहे? काय काम आहे? याची नुमनी चौकशी केली. तेव्हा आपल्या घराच्या झडतीसाठीं पोलीस आले आहेत, एवढें त्याना कळलें. त्यावर गोविंदरावांनीं आतूनच त्याना कळविलें कीं, "आपण वाटल्यास माझ्या घरावर पहारा ठेवा. पण आमच्या घरीं आक्षेपार्ह असें काहींच नाहीं. झडतीसाठीं आपणास सकाळीं घर उघडें राहील." अर्थात् हें सर्व कायद्याला धरूनच असल्यामुळे पोलिसाना हात चोळीत गप्प बसावें लागलें 'धरलें तर चावतें व सोडलें तर पळतें' अशी स्थिति पोलिसाची झाली. खिडकीचें दार बंद करून गोविंदराव आत आले. पण थोडक्यासाठी व्यर्थ तंगा नको म्हणून गोविंदरावांनीं दार उघडून पोलीस अधिकाऱ्याना आत म्हणजे घरात घेतलें. त्यांनी सर्व घर धुंडाळून पाहिले व तेथें कोणी नाहीं असें पाहूनच ते परत गेले

गोविंदरावांनीं साक्षीदाराला पळविलें असें गृहीत धरलें तरी त्याला आपल्याच घरीं आणून ते कसे ठेवतील? हा प्राथमिक विचार सुद्धा पोलिसांनीं केलेला नव्हता आपल्या घराची झडती होईल एवढेंहि न समजण्याइतके गोविंदराव काही नवखे किंवा अननुभवी नाहींत एवढे तरी पोलिसाना कळावयास हवें होतें. परंतु त्यांनी गोविंदरावाच्या घराची झडती घेतली. आपणास हवा असलेला साक्षीदार तेथें आढळला नाहीं म्हणून पोलीस जळफळले आणि आले तसेच तणतणत निघून गेले.

हुसेनच्या दाढीमिशा भादरून त्याचें रूपांतर शास्त्रीबुवात झालेलेंच होतें हे शास्त्रीबोआ मागील दारानें घराबाहेर पडून उचगाव रस्त्याला लागले होते. त्याची धमनी सावतवाडीच्या रोखानें धावत होती. गोविंदरावाचे स्नेही बाळाकाकतकर नाईक याच्या खेड्यात मलेवाडगावीं त्याची रवानगी झाली होती. परंतु चार दिवसा नतर ती बातमी पोलिसाना लागली तेथें त्याला अटक करून पुन बेळगावात आण ण्याची योजना पोलीस करीत आहेत याची खबर गोविंदरावाना लागताच त्यांनीं त्यास तेथून हलविलें आणि मिरजेस श्री. कनबाडकरांच्या घरीं त्यास नेऊन ठेवण्यात आल

हुसेन रोज मिरज स्टेशनवर फिरावयास येत होता. ही बातमी सुद्धा पोलीस लोकाना कळली. तेथून त्याला पकडून आणण्यासाठीं बेळगावहून दोन पोलीस अधिकारी रवाना झाले. पण त्याचीहि खबर गोविंदरावाना लागली. तावडतोब त्यांनींहि आपला एक विश्वासाचा व खात्रीचा मनुष्य 'अप्पा शिपी' त्या पोलिसाच्या मागोमाग त्याच गाडीनें मिरजेस पाठविला मिरज स्टेशनवर हुसेन फिरत होताच. त्याला पोलिसांनीं ओळखलें. 'आम्ही तुला पकडून नेण्यासाठींच आलो आहोंत' असें स्पष्ट त्याला त्यांनीं सांगून टाकल व ते सर्वजण स्टेशनवरील वेटिंग रूममध्यें बसले त्यातच

अप्पा शिंपीहि सामील झाला. बेळगावकडील गाडी येण्याची वाट पहात त्या सर्वांना रात्रभर स्टेशनवरच बसावें लागलें होतें. त्या अवधींत अप्पा शिंपी यानें त्या पोलिसाना त्या रात्रीं खूप दारू पाजली. ते पूर्ण झिंगले. त्याची शुद्ध उडत चालली याची खात्री झाल्यावर हुसेनला आपल्याबरोबर घेऊन तो मिरजगावांत गेला. या पोलीस अधिकाऱ्याना पुनः त्या पोलिसाचें तोंड पाहावयास मिळालें नाहीं. अप्पा शिंपी त्याला घेऊन रुडकीच्या हॉस्पिटलमध्यें गेला. पुढें पोलिसाना त्या जागेचाहि संशय आला असावा. कारण हुसेन एका जागीं स्वस्थ बसतच नव्हता सर्व गोष्टी त्याला समजावून सांगितल्या थोडी धमकी किंवा धाकहि दाखविला. ही मात्रा लागू पडली व तो तेथें स्वस्थ राहू लागला. खटल्याचें सर्व काम संपल्यावरच त्यास परत माघारीं बेळगांवांत आणण्याची व्यवस्था करण्यात आली.

कोर्टामध्यें ही हकीकत गंगाधररावाना समजल्यानंतर गोविंदरावाविषयीं त्याना काय वाटलें असेल हें मीं सांगण्यापेक्षा वाचकांनीच आपल्या कल्पनाशक्तीला स्वैर विहरू द्यावें व तें भावचित्र आपल्या डोळ्यापुढें आणावें. गोविंदरावांच्यावर पोलिसाचा प्रथमपासूनच दांत होता. आणि या खटल्यात गंगाधररावाप्रमाणेंच गोविंदरावानांहि गुंतवावें असा पोलिसाचा मनसुबा होताहि. पण तें त्याना साधलें नाही. त्यांत हुसेनच्या पळवापळवीचें इंधन पडत राहिलें. या सर्व गोष्टींचा विचार करून गोविंदरावांनीं या फंदात पडू नये असें गंगाधररावांनीं त्याना सांगूनहि पाहिलें. शेवटीं आपल्यासाठीं बाहेर काम करणारा कोणीतरी गोविंदरावाच्या तोलाचा मनुष्य असला पाहिजे; एवढ्या कारणासाठीं तरी गोविंदरावांनीं जपून राहिलें पाहिजे असें निर्वाणीचें म्हणून त्याना कळविलें. गंगाधररावाच्या मतानें गोविंदरावाना हमखास पटेल असेंच तें कारण होतें. आपला हुकुमी पत्ता अशीच ती सबब होती. पण कशाचाच परिणाम गोविंदरावावर झाला नाहीं. त्याना या प्रकरणीं एक प्रकारची ईर्षा उत्पन्न झालेली होती. पोलिसाच्या हातची ही शिकार नाहींशी झाल्यामुळे त्यांनीं पुष्कळच तपास केला, पण त्याचाहि कांहींच उपयोग झाला नाहीं. साक्षीदाराच्या आईकडून पोलिसाकडे एक अर्जहि करविण्यात आला, व त्यात गोविंदराव वगैरेनीं आपल्या मुलाचा खून करविला असावा असा संशय प्रगट केला होता. परंतु पुराव्याच्या अभावीं कांहीं होऊ शकलें नाहीं. शेवटीं नाइलाज होऊन खटला सेशनकमिट करण्यात आला.

**हें घ्या पोलिसांच्या टिप्पणाचें दप्तर :** क्रिमिनल प्रोसिजर कोडाप्रमाणें फौजदारी खटल्यात साक्षीदाराची पोलिसांनीं घेतलेलीं टिपणें आरोपींना दाखवावयाचीं नसतात असा सक्त नियम आहे. त्यामुळें पोलिसांनीं घेतलेल्या टिप्पणास व कोर्टापुढें झालेल्या जबाबात कांहीं फेरफार झाल्यास तो कोर्टाच्या नजरेला आणण्यास आरोपीला कठीण होतें. पोलिसाना साक्षीपुराव्यात वाटेल तो फेरफार करण्यास सवड सापडते. या हरिनानाच्या खटल्यामध्यें तसा फेरफार करण्याचा पोलिसाचा विचार चालला

होता. म्हणून तीं पोलिसांची टिप्पणें पहाण्याची जरुरी काका पाटील व गंगाधरराव यांना भासू लागली. या बाबतींत काका पाटील व गंगाधरराव चर्चा करीत असतांना गोविंदरावांच्या कानावर ती गोष्ट गेली. झालें ! दोनचार दिवसांच्या आतच एका रात्रीं ते पोलिसांच्या टिपणाचें दप्तर 'हें घ्या पोलिसांच्या टिप्पणाचें दप्तर' असें म्हणत गोविंदरावांनीं काका पाटलापुढें आणून हजर केलें. जाफर इमाम या टिपणांना फार जपत असे. टिपणें मोडीमध्यें लिहिलेलीं होतीं. रात्रीच्या रात्रीं पांचसहा लोक लिहिण्यावळील लावून त्यांच्या बरोबर नक्कला काढून घेतल्या. आणि पहाटेच्या सुमारास तें दप्तर स्वस्थानीं सुखरूप गेलें. हीं टिपणें व मॅजिस्ट्रेट कोर्टांत झालेल्या जबान्या यांत पुष्कळच विसंगतपणा आढळून आला. या टिपणाचें इंग्रजी भाषांतर नंतर करविण्यांत आलें.

बॅरिस्टर मिळविण्याची खटपट करण्यासाठीं काका पाटील व गंगाधरराव मुंबईस गेले व अर्डेर व नॉर्टन यांना हा खटला चालविण्यासाठीं आणविण्याचें निश्चित ठरविलें. सरकारतर्फेंहि बॅरिस्टर असावा असें वाटल्यावरून सरकारनें मं. विनिंग यांची निवड करून तशी जोडणी करून दिली.

**तपस्वी बाबासाहेब परांजपे आणि मृताचीं जळकीं हाडें**. बॅरिस्टर मिळविण्यासाठीं गंगाधरराव मुंबईस गले असतांना वऱ्हाडचे तपस्वी बाबासाहेब परांजपे सहज मुंबईस आले होते. त्या वेळीं या खटल्याची हकीकत त्यांच्या कानावर आल्यामुळें त्यांनीं गंगाधररावांची भेट घेऊन खटल्याची सर्व हकीकत समजून घेतली. त्यांत प्रेत चार तास जळून उरलेलीं हाडें जेथें पुरलीं असें साक्षीदारानें सांगितलें होतें ती जागा उकरून काढून तेथें मिळालेलीं हाडें पुराव्यांत दाखल केलेलीं आहेत. पण हा सर्व पुरावाच बनावट आहे वगैरे गोष्टीहि गंगाधररावांनीं बाबासाहेबांना सांगितल्या होत्या. हा वृत्तांत ऐकून तीं हाडें प्रत्यक्ष पहाण्याची इच्छा बाबासाहेबांना झाली. तज्ज्ञाकडून हाडें तपासावयाचीं आहेत असा अर्ज कोर्टांत करण्यांत आला व तो मंजूर होऊन तशी परवानगीहि मिळाली. बाबासाहेबांनीं तीं हाडें इन्स्पेक्टरच्या समक्ष कोर्टांत बारीक रीतीनें तपासून पाहिलीं त्यांचीं टिपणेंहि तयार केलीं. आणि मग इतक्या विस्तवांत इतका वेळपर्यंत प्रेत जळत राहिल्यानंतर ज्या स्थितींत तीं हाडें कोर्टापुढें आहेत त्या स्थितींत तीं तशीं असणेंच शक्य नाहीं असा बाबासाहेबांच्या मनातील अभिप्राय होता. कोणत्या तरी प्रेताला उकरून काढून त्याचीं हाडें काहीं वेळ विस्तवावर धरून तीं कोर्टापुढें आणलेलीं आहेत असेंच त्यांचें स्पष्ट मत होतें परंतु ही गोष्ट व हा आपला अभिप्राय गुप्त ठेवून आयत्यावेळींच त्याचा आधार घेणें फायदेशीर होईल अशा विचारानें हीं हाडें मनुष्याचीं नसून जनावराचीं आहेत असा आरोपी तज्ज्ञाचा अभिप्राय आहे असा पुकारा केला. सिव्हिल सर्जननें तीं हाडें मनुष्याचीं आहेत असें सर्टिफिकिट दिलें होतें. या सर्टिफिकिटाच्या पुढें या तज्ज्ञाचें म्हणजे बाबासाहेबांचें काय चालणार ? अशा घमेंडींत पोलीस अधिकारी होते.

तथापि सिव्हिल सर्जनला साक्षीला बोलावून त्याच्या तोंडून हीं हाडें मनुष्याचीं आहेत असे सिद्ध करण्याचा निर्णय पोलिसांनीं घेतला होता. त्यात आरोपींच्या वकिलांना समाधान वाटत होतें. कारण त्याना ज्या गोष्टी सिद्ध करावयाच्या होत्या त्या सर्व सिव्हिल सर्जनच्या तोंडूनच वदविण्याची संधि आरोपींना मिळणार होती. सरकारतर्फे बॅ. ब्रिनिंग येणार असल्यामुळें पोलिसाची भीडमुर्वत न ठेवता ते काम करतील अशी आरोपींची अटकळ होती व ती खरीहि ठरली.

मध्यतरीं त्याच दिवशीं एक शुभ शकुनाची घटना घडून आली. लोकमान्याची तुरुगातून सुटका झालेली होती आणि त्या शुभ सकाळीं त्यानीं गंगाधररावाना पहिली तार केली होती. ही तार वाचताच गंगाधरराव आपलें दुःख विसरले. त्याना आनंद झाला आणि त्या आनंदभरात त्यानी घरात पोळीचें जेवण तयार करण्यास सांगितलें. दोन प्रहरीं कोर्टात खटला सुरू होताच, कोर्टानें गंगाधररावाना दोषमुक्त करून सोडून दिलें. त्यानींहि मित्रांना तारेनें ही वार्ता कळविली. गंगाधरराव त्या खटल्यातील आरोपीच्या जागेवरून उठले आणि या खटल्यातील एक वकील म्हणून बॅ. नॉर्टन याच्या शेजारीं येऊन बसले.

हाडाचा पुरावा विचारात घेण्यापूर्वी आणखी काहीं तज्ज्ञांचीं मतें मिळवणेंच क्रमप्राप्त होतें. म्हणून अन्य काहीं तज्ज्ञानाहि तीं हाडें दाखविण्याची परवानगी कोर्टाकडून मिळविण्यात आली. बाबानीं केलेली हाडाची परीक्षा आणि त्यानीं उपस्थित केलेल्या सर्व शंका अवलोकन करून बाबाच्या सूक्ष्म निरीक्षणाबद्दल अन्य तज्ज्ञानींहि त्याची प्रशंसा केली. बाबानीं केलेल्या परीक्षणाशिवाय अन्य एक नवीनच शोध लागला. कोर्टापुढें हजर असलेल्या हाडात एक मांडीचे हाड होतें. त्या हाडाच्या रचनेवरून तें एका पंधरासोळा वर्षाच्या मुलाचें आहे असे सिद्ध करता येण्यासारखें होतें. आणि खून झालेला गृहस्थ चाळीसपेक्षा अधिक वयाचा होता.

वस्तुतः या हाडाचा इतिहासहि थोडा अद्भुत आहे. शंकराचा खून करून ते प्रेत जाळण्यापूर्वी त्याचे तीनचार तुकडे केलेले होते. ही वस्तुस्थिति पोलिसानी कोर्टाच पुराव्यात ध्यानात घेतलेली नाहीं. त्या तुकड्यापैकीं जेवढा भाग चार तासपर्यंत भूमीमध्यें व्यवस्थित जळत होता तेवढा चागला जळलेला होता आणि जो भाग बाहेर पडला होता त्याची राख होणेंच शक्य नव्हतें. म्हणून तीं हाडें सर्वांना पुरलेलीं होतीं. कोणतीं हाडें किती जळलीं असतीं तीं कशीं होतात, हें प्रत्यक्ष पहाण्यासाठीं एक प्रेत उकरून काढून तें गोविंदरावाच्या घरीं आणून त्याला प्रत्यक्ष घरात जाळून पाहण्यात आलें. त्यामुळें तरखी बाबासाहेबाच्या टिपणाची व त्याच्या सूक्ष्म निरीक्षणाची सत्यता अधिकच प्रत्ययाला आली.

दुसरे दिवशीं सिव्हिल सर्जन साक्षीला आले. निःपक्षपातीपणा व सत्यप्रियता याबद्दल सिव्हिल सर्जनाची प्रसिद्धि होती. सदर कोर्टापुढील हाडें जनावराचीं नसून

मनुष्याचींच आहेत, एवढीच गोष्ट त्याच्याकडून वदवून घेण्याचा सरकारतर्फे प्रयत्न करण्यात आला होता. पण उलटतपासणींत ज्या गोष्टी आरोपींना पाहिजे होत्या त्या सर्व सिव्हिल सर्जन यानीं कोर्टात सांगितल्या. सिव्हिल सर्जनच्या साक्षीवरून हाडासंबधींचा पुरावा बनावट आहे असे माप पूर्णपणें फिर्यादी पक्षाच्या पदरात पडलें. त्या मुद्द्यावर आरोपींना काहीं अधिक पुरावा द्यावाच लागला नाहीं. याप्रमाणें हाडाच्या पुराव्याला सुरुंग लावण्यात आला.

या खटल्यात हरिनानाच्या कुटुंबाचीहि साक्ष झाली होती. त्याच्या साक्षीचा परिणाम जज्जावर, ज्यूरावर व लोकांवरहि चांगला झाला. त्याचप्रमाणें गंगाधररावाचीहि साक्ष झाली. त्याचीहि सरतपासणी व उलटतपासणी झाली. सुरवातीला या खटल्यात गंगाधरराव वकील म्हणून होते. त्या वेळीं त्यानीं एक टिपण करूनहि ठेवलें होतें. तें पोलिसाच्या हातीं लागलें होतें. तें सीलबंद करून ठेवण्यात आलें होतें. गंगाधररावाच्या उलटतपासणीच्या वेळीं तो सीलबंद कागद फोडून कोर्टापुढ ठेवण्यात आला. त्यातील मजकूर पोलिसाच्या विरुद्धच होता. ही गोष्ट गंगाधररावाना माहीतच असल्यामुळें त्यानीं तो कोर्टात वाचला जाण्यास हरकत घेतली नाहीं. अर्थात् या बाबतींत पोलीस हतबुद्ध झाले व चांगले फजीत पावले.

श्री. अमृतराव देशपांडे याच्या शेतावरील तीनहि बेरडावरील खटले सांगली संस्थानातील शहापूरमध्यें चालावयाचे होते. म्हणून त्याना शहापूरच्या 'लॉक अप्' मध्यें म्हणजे गुमानींत ठेवलेलें होतें. परंतु रात्रीं त्याना त्या लॉकअप्मधून बेळगावात याळगींच्या घरीं आणण्यात येत असे, व पहाटे पुन त्याना शहापूर गुमानींत नेऊन पोंचविण्यात येई. त्याना हरिनानाच्या विरुद्ध साक्षीदार म्हणून कदाचित् आणण्यात आलें असतें तरी ते काहींच साक्ष देणार नव्हते. ही गोष्ट ते स्पष्ट बोलूनहि दाखवीत असत.

या खटल्यात गोविंदरावाचे गुण, हिकमती, तरल बुद्धीचे डावपेच आणि स्वभावातील अनेक पैलू दिसून आले आहेत (१) या खटल्याची बातमी कळूनहि त्यानीं आपल्या मनाची चलबिचल होऊ दिली नाहीं. जणु काहीं, काहीं झालेंच नाही इतक्या शांतपणें आपल्या बधूचा लग्नसमारंभ होऊ दिला. (२) पोलिसाच्या हालचालींवर, त्याच्या सर्व लहानमोठ्या कारस्थानावर यशस्वी रातीनें पाळत ठेवली व त्या प्रत्येक कृतीवर तोड काढून पोलिसाची कारवाई निष्फळ केली. (३) पोलिसानीं या खटल्यातील हाडें कोणाची व कोठून कशीं उकरून आणिलीं होतीं याची चित्तबातमी काढली. (४) पोलिसानीं करविलेले खोटे जबाब उघडकीस आणले. (५) त्याचे प्रतिज्ञालेख (ॲफिडेव्हिट) न्यायाधिशापुढ करविण्याचा सपाटा चालविला. (६) गंगाधररावाना अटक झाल्यानंतर गोविंदरावानीं आपलें दुकान, आपला धदा, आपला प्रपच बाजूला ठेवला. जणु खटल्याची सर्व जबाबदारी आपलीच आहे अशा हिशेबानें या कामी

अमाप पैसा त्यांनीं खर्च केला. आणि काम करताना दिवसरात्र अगर ऊनतहान याचा विचारहि मनात आणला नाहीं. (७) गंगाधररावावरील तिसरा साक्षीदार म्हणजे हरिनानाच्या घरचा नोकर हुसेन याला खटल्याच्या काळात नाहींसें करणें व त्याच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था लावून देणें, यामुळे त्यांनीं त्याला आपलासा केला. (८) साक्षीदाराच्या भाईकडून गोविंदराव व त्याचे साथीदार यांनीं आपल्या मुलाचा खून केला असावा असा अर्ज जो पोलिसांनीं करविला होता, त्याला तोंड दिलें व आपलें धैर्य खचू दिलें नाहीं. (९) पोलिसांच्या ठिकाणाचे दप्तर इन्स्पेक्टर जाफर इमाम यांच्या ताब्यातून हस्तगत करून काका पाटील यांच्यापुढें आणिलें आणि एका रात्रींत त्या दप्तरातील कागदपत्राच्या नक्कला करवून घेऊन तें दप्तर जेथल्या तेथें नेऊन ठेवलें. (१०) आपल्या कार्यक्षमतेची पुरी जाणीव असल्यामुळे गंगाधररावाच्या निर्दोषीचें सगळें सुद्धा त्यांनीं आपल्या रहिन्या कानावर घेतलें आणि पर्यायानें हा सर्वच खटला उधळून टाकला, व यशहि मिळवून दिलें.

गोविंदरावांनी या सर्व गोष्टी धाडसानें व कौशल्यानें केल्या यात वादच नाहीं. या सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, गोविंदरावाच्या मनात गुरुभक्ति व मित्रप्रेम याशिवाय अन्य कोणताहि हेतु त्याच्यामागें नव्हता. या गोष्टी आपल्या हातून झाल्या आहेत याची वाच्यताहि त्यांनीं यापुढे आपल्या उभ्या जीवनात कधीं केलेली नाहीं. इतकें करूनसवरून नामानिराळें राहणें हें महामनाचेंच लक्षण आहे. गोविंदरावानीं अशा प्रकारें आपल्या मित्रमंळीसह तनमनधनानें अहर्निश खटपट केल्यामुळे एका दुर्वृत्त, निंद्य आरोपातून कालकुंद्रीकर आणि गंगाधरराव यांची सुटका झाली.

लोकमान्यांनीं आपली सुटका झाल्यानंतर, 'या खटल्यामध्यें कांहीं मदत पाहिजे असल्यास मला कळवा' असें तारेनें विचारलें होतें. पण गंगाधररावाची पहिल्याच दिवशीं सेशन कोर्टात निर्दोषी म्हणून सुटका झाली आणि तें प्रकरण तेथेंच संपलें. तरी हा अ यंत खळबळजनक हरिनानावराल खूनखटला सेशन कोर्टांत एकंदर छत्तीस दिवस चालला होता. लो. टिळकांच्या त्या तारेवरूनहि त्या खटल्याकडे महाराष्ट्र-कर्नाटकाचें सुद्धा किती लक्ष वेधलें होतें याची कल्पना येईल.



प्रकरण पंचविसावें

# वेळगांवची मुंबई इलाखा प्रांतिक परिषद

इ. स. १९१४ पासूनच्या सर्व घडामोडी, घटना व चळवळी प्रस्तुत लेखकानें स्वत: जातीनें पाहिलेल्या आहेत व त्यातील पुष्कळामध्यें प्रत्यक्षाप्रत्यक्ष भाग घेऊन अनुभवल्या आहेत. सन १९१६ च्या वेळगाव येथील मुंबई इलाखा प्रांतिक परिषदेचें महत्त्व व वेळगावची कामगिरी, गोविंदरावाचा त्यातील हिस्सा, ध्यानात येण्यास त्या काळची राजकीय परिस्थिति बारीक दृष्टीनें पाहून समजून घेतली पाहिजे.

लोकमान्याना शिक्षा झाल्यापासून तों ते सुटून येईपर्यंत अखिल भारतामध्यें राजकीय क्षेत्रात शैथिल्यच आलेलें होतें. सरकारच्या दडपशाहीमुळें सर्वत्र उदासीनताच होती. मधून मधून दहशतवादी लोकांच्या काहीं कुरापती व प्रयत्न दिसून येत होते. लोकमान्याच्या गैरहजेरींत काय करावें हें कोणालाच काहीं समजत नव्हतें. आणि काहींना समजत असले तरी काहीं कार्यक्रम व योजना आखून ती अमलात आणण्याची धडाडी कोणामध्येंहि नव्हती. पुढाऱ्याची जर ही स्थिति तर सामान्य जनता कोणत्या स्थितीला जाऊन पोहोंचली असेल याची कल्पना सहज करता येईल. पण लोकमान्य असल्या निराशेनें खचून जाणारे नव्हते.

ब्रिटिश सरकारला लोकमान्याचा स्वभाव व धडाडी आणि संघटनाशक्ति आपल्या हिंदी बांधवापेक्षा अधिक चांगल्या प्रकारें उमगली होती, प्रतीतीला आली होती. लोकमान्याची सुटका झाल्यावर त्याना कोणींहि भेटावयास जाऊ नये, ते राज्याचे शत्रु आहेत अशा आशयाचें पत्रक काढून सरकारनें त्यांची गाठभेट घेण्यास बंदीच घातली व एका दृष्टीनें जनतेची कुरापत काढली. जनताहि तेवढ्यानें डिवचली गेली आणि राजकीय चळवळीला उठाव येण्यास तेवढें निमित्त पुरलें. हजारों लोक उघडपणें लो. टिळकाना भेटावयास गेले. लोकमान्याच्या लेखप्रवचनेंतील जोम व कामाचा जम बसूं लागलें आणि चळवळीला 'पुनश्च हरिः ॐ' या मंत्रानें सुरवात झाली.

याच वेळीं महायुद्धाला प्रारंभ झाला होता. या प्रतिकूल परिस्थितीचा फायदा चळवळे लोक अवश्य घेतील, असा नुसता संशयच नव्हे, तर सरकारला तशी खात्री वाटत होती. Tenets of the New Party म्हणून लोकमान्याचें जें भाषण झालें होतें त्यात त्यानीं मांडलेलीं मतें केवळ अडवणुकीच्या मार्गाचीं होतीं. महायुद्धानें इंग्लंड जेरीस आलेलें होतें आणि हिंदुस्थानचें मनुष्यबळ त्याना पाहिजे होतें. ही मनुष्यबळाची मदत त्याना मिळाली नसती तर ब्रिटिश साम्राज्याचा इतिहास अगदींच वेगळा झाला असता, असे मानणारे अनेक तज्ज्ञ व अनुभवी लोक होते. हिंदुस्थानातील बहुतेक लष्कर त्या वेळीं लढाईवर पाठविण्यात आलें होतें. जें कांहीं थोडेंसे लष्कर हिंदुस्थानात होतें तें सामान्य होतें. त्याच्याजवळ साधनसामग्रीहि चांगली व पुरेशी नव्हती. म्हणूनच इंग्रजांना या वेळीं लोकबळाची निकड होती. हिंदुस्थानातील अंतर्व्यवस्था व शांतता कायम राखण्यासाठीं सुद्धा हें हिंदी सैन्य अपुरें पडण्याइतकें तोटकें होतें. तेव्हा यासाठींमुद्धा सेनाबळाची इंग्रजांना अत्यंत जरूर भासत होती.

या संधीचा फायदा घेतल्याशिवाय लोकमान्य स्वस्थ बसणार नाहींत असेंच सरकारला व सामान्य जनतेला वाटत होतें. सरकारची अडचण तीच आपली संधि असें मानणाऱ्यांपैकीं किंवा जशास तसे या तत्त्वाचे पुरस्कर्ते लोकमान्य आहेत असेंच सर्वश्रुत होतें. परंतु लोकांच्या अशा प्रकारच्या अपेक्षांना निराधार ठरविणारें पत्रक काढून लोकमान्यानीं सरकारला व जनतेला आश्चर्यचकित केलें. सरकारसंबंधीं आपलीं मतें, आपलें राजकीय धोरण, आणि महायुद्धासारख्या प्रसंगीं आपलें कर्तव्य वगैरे त्या पत्रकामध्यें विशद केलें होतें. 'लोकमान्यांची मूर्ति भंगली' असें मानणारे लोकमान्यांच्या अगदीं निकटवर्ती लोकांमध्येंहि कांहीं पुढारी होते. त्या पत्रकात लोकमान्यानीं जें राजकीय धोरण प्रगट केलें होतें तें राष्ट्राला स्वातंत्र्य मिळेपर्यंतहि अखंड अनुसरलें गेलें आहे. या गोष्टीची साक्ष स्वातंत्र्याचा इतिहास दिल्याशिवाय राहणार नाहीं.

कॉंग्रेससंबंधीं लोकमान्यांची भावना प्रसिद्धच होती. स. १९०६-७ सालीं देखील कॉंग्रेस बलिष्ठ करावी हाच त्यांचा हेतु होता. मवाळ पक्षाकडून कॉंग्रेसला कार्यक्षम करण्याचा प्रयत्न होत नव्हता. म्हणून कॉंग्रेसमध्यें सामील होऊन स्वराज्य संपादनाचें कार्य नेटानें चालवावें असा टिळकांचा विचार ठाम झाला होता. पण त्या काळीं कॉंग्रेस नेमस्तांच्या ताब्यात असल्यामुळे कॉंग्रेसप्रवेशाला त्यानीं अशा कांहीं अटी घातल्या होत्या कीं, त्या स्वीकारून जहाल पक्ष किंवा राष्ट्रीय पक्ष कॉंग्रेसमध्यें जाणारच नाहीं. त्या अटींमध्यें बदल घडवून आणावा म्हणून लोकमान्यानीं प्रथम प्रयत्न केले, त्या प्रयत्नांना मिसेस बेझंटबाईंची मदत होती. पण गोखले आदि नेमस्त पुढाऱ्यांना खात्री होती कीं, टिळक कॉंग्रेसमध्यें येतील तर कॉंग्रेस त्यांच्या हातात जाईल. म्हणून फेरोजशहा मेथासारखे लोक टिळकांच्या प्रयत्नात अडथळे उत्पन्न करीत होते.

या चरित्रांत झालेला गोखले–टिळकवाद या ठिकाणीं देण्याची आवश्यकता नाहीं. परंतु तो वाचकाच्या स्मरणात आला तर टिळकांच्या त्या पत्रकाची संगति ध्यानात येईल.

या बाबतींत लोकमत अजमावण्यासाठीं कै. न. चिं. केळकर यांना लो. टिळकांनीं सर्व प्रांतामध्यें एकदा फिरून येण्यास पाठविलें होतें. लोकमत आपल्याला अनुकूल आहे व दिवसेंदिवस अधिकाधिक अनुकूल होत आहे असे पाहून, कॉंग्रेसमध्यें प्रवेश करण्याच्या हेतूनेंच सन १९१५ मध्यें एक प्रांतिक परिषद भरविण्याचें लोकमान्य टिळकांनीं ठरविलें. टिळक तुरुंगातून सुटून आल्यानंतर भरविण्यात येणारी ती पहिलीच परिषद असल्यामुळें त्याला विशेष महत्त्व प्राप्त झालें होतें. म्हणून ही परिषद आपल्या खात्रीच्या जागीं भरवावी अशी लोकमान्यांची इच्छा होती. म्हणजे ही परिषद् पुणें किंवा बेळगाव यापैकींच कोणत्या तरी एका ठिकाणीं भरवावी असाच त्या इच्छेचा ध्वनि होता. ही परिषद बेळगावलाच प्रथम भरविण्याचें ठरलें होतें. गोविंदराव याळगींच्या विचारानें ती जबाबदारी उचलण्याचें गंगाधररावांनीं टिळकांना आश्वासनहि दिलें होतें. पण बेळगावात त्या वेळीं प्लेग सुरू झाल्यामुळें ही परिषद बेळगावात न भरविता पुण्यामध्यें भरविण्याचें नक्की झालें. सन १९१५ च्या मेमध्यें बॅ. बॅप्टिस्टा यांच्या अध्यक्षतेखालीं ही परिषद् पुण्यास भरली. या परिषदेस गंगाधररावांच्याबरोबर प्रस्तुत लेखकहि गेलेला होता. या परिषदेपूर्वी कांहीं महिने ना. गोपाळ कृष्ण गोखले निवर्तले होते. त्यांच्या निधनाबद्दलच्या दुखवट्याचा ठराव लो. टिळकांनीं मांडला होता. माझ्या आठवणीप्रमाणें या परिषदेत नेहमींचा मामुली राजनिष्ठेचा ठराव प्रतिवर्षीं मांडत असण्याची प्रथा बंद पाडण्याची उपसूचना आली होती. पण त्यासाठीं कोणीं विशेष आग्रहहि धरला नाहीं. अध्यक्षांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात 'होमरूल लीग'ची कल्पना उचलून धरली होती. तसा एक ठरावहि मंजूर झाला. पण त्याला मूर्तस्वरूप यावयाचें शिल्लक राहिलें. स्वराज्य संघाची स्थापना करणें व कॉंग्रेसमध्यें प्रवेश करणें या दोन गोष्टी व्हावयाच्या शिल्लक होत्या आणि म्हणूनच १९१६ सालची प्रांतिक परिषद कोठें भरवावी या गोष्टीला राष्ट्रीय पक्षाच्या दृष्टीनें फार महत्त्व होतें. या परिषदेला बेळगावच्या वतीनें निमंत्रण देण्याचा ठराव कै. श्री. बेळवी यांनी मांडला व गंगाधरराव यांनीं त्याला अनुमोदन दिलें. तो ठराव सर्वानुमतें मंजूर झाला.

लोकमान्य कॉंग्रेसमध्यें नसले तरी बिझांटबाई कॉंग्रेसमध्यें होत्या. त्यांनीं 'होमरूल लीग'च्या कल्पनेला कॉंग्रेसमध्यें चालना देण्याचा प्रयत्न केला. पण तेथें यशाचें चिन्ह दिसेना म्हणून कॉंग्रेसची वाट न पहाता आपली एक 'होमरूल लीग' त्यांनीं स्वतंत्रपणें स्थापन केली. कार्याच्या सोईकडे पाहून लोकमान्यानांहि एक होमरूल लीग म्हणजे स्वराज्य संघ स्थापन करावयाचा होता. त्यामुळें बिझांटबाईंच्या या प्रयत्नाशीं लोकमान्यांचा विरोधी सूर लागला नाहीं, उलट त्याला दुजोराच लाभलेला आहे.

**बेळगांव जिल्हा परिषदेचा प्रचार** १९१६ साली भरावयाच्या प्रांतिक परिषदेचा प्रचार करण्यासाठीं गोविंदराव-गंगाधरराव कामाला लागले. त्यांनी जिल्ह्यांतील ल्हानमोठ्या शहरांतून व तालुक्याच्या गावीं दौरा काढला. या दौऱ्यामध्यें प्रस्तुत लेखकहि एक स्वयंसेवक म्हणून फिरला आहे. अर्थात् गंगाधररावांचीं सर्व व्याख्यानें मला ऐकावयास मिळालीं होतीं. ही परिषद १९१६च्या मे महिन्यांत भरावयाची होती; म्हणून जानेवारी महिन्यापासूनच त्याच्या प्रचाराला व तयारीला प्रारंभ झाला होता. वर्तमानपत्रीं प्रचार करण्यासाठीं के. प. दिनकरशास्त्री कानडे आणि श्री. महादेवशास्त्री दिवेकर बेळगांवांत येऊन राहिले होते. महादेवशास्त्री दिवेकर यांना हें प्रचारकार्य उत्तम रीतीनें केलें होतें. त्या वेळची एक आठवण येथें दिल्यावाचून मला राहवत नाहीं. परिषदेच्या ऑफिसमध्यें वर्तमानपत्रांत लेख लिहिणें, प्रचारपत्रकाच्या नकला काढणें, जाहीर सभांची व्यवस्था करणें, जरूर तेव्हां त्या सभांमधून भाषणें करणें, टपालाची आवकजावक नोंदणें, पाहुण्यांची व्यवस्था राखणें, निरोप्याचीं कामें करणें, वर्तमानपत्रांचीं कात्रणें काढून तीं चिकटबुकामध्यें चिकटवणें आणि गोविंदराव गंगाधरराव सांगतील तीं कामें करणें असे विविध प्रकारचें काम मला करावें लागे. मधून मधून गंगाधररावांच्याबरोबर दौऱ्यामध्येंहि गोविंदराव माझी पाठवणी करीत असत.

रात्रंदिवस मी हीं कामें करीत असल्यामुळें माझ्या सकाळच्या आणि दोन प्रहरनंतरच्या मधल्या वेळच्या फराळाची व्यवस्था गोविंदरावांनीं श्री. बळवंतराव नानू यांच्या फराळाच्या दुकानांत करून दिलेली होती. रोज सकाळीं व मधल्या वेळीं दोन डिंकाचे लाडू, थोडा चिवडा व एक ग्लास दूध मी त्या दुकानांत घेत असें. त्याकरितां मला कांहीं द्यावें लागत नसे. परिषदेपूर्वी दोन महिन्यापासून माझी ही व्यवस्था चालू होती पण परिषद संपून गेल्यानंतरहि मी तीच वहिवाट अयाचितपणें पुढें दोन महिने चालू ठेवली होती. एकदां बळवंतराव नानूंनीं गोविंदरावांना विचारलें कीं, 'हा स्वयंसेवक परिषद संपून आतां दोन महिने झाले तरी दिवसांतून दोन वेळां फराळ घेण्याचें कधींच चुकवीत नाहीं, तेव्हां हें असेंच चालू ठेवावयाचें काय?' त्यांचा आपसांत काय विचार ठरला असेल तें मला माहीत नाहीं. पण एके दिवशीं मी नेहमींप्रमाणें फराळ खाऊन बाहेर जाण्यास निघणार इतक्यांत गल्ल्यावर बसलेल्या मनुष्याला 'एक इसम साडेआठ आणे' असा पुकारा करून कळविण्यांत आलें मी जागच्या जागीं बसून राहिलों. आणखी दोन आण्याचा चिवडा मागवून तो सावकाश खात विचार करीत तेथेंच बसलों. आतां काय करावें? हेंच मला कळेना गोविंदरावांच्या नांवावर पैसे मांडून ठेवा अगर गंगाधररावांच्याकडे बिल पाठवा असें सांगण्यांत त्यांची नसली तरी त्यांच्या नांवाचा असा उपयोग करणें मला पसंत नव्हतें. उलट तें त्यांच्या नांवाला कमीपणा आणणारेंच कृत्य झालें असतें. तेव्हां तो विचारहि मला नको होता. पण माझ्यापाशीं तरी कुठें खिशांत पैसा खुळखुळत

होता ? म्हणून दहा आण्याऐवजीं बारा आणे टाकावे नि तोंड पुशीत मान ताठ ठेवून पडावें बाहेर ! याहि दृष्टीनें मी डळमळलेला होतों. माझ्याजवळ खिशात किंवा घरीं एक आणा देखील नव्हता. मला तो प्रकार पुनः भेडसावू लागला. शेवटीं एक विचार सुचला. 'आत मालकाला जाऊन भेटावें, घरून पैसे आणून देतों म्हणून सांगावें आणि मागील दारानें बाहेर पडून तो 'एक दसम साडेदहा आणे' हा भयप्रद ओरडा टाळावा. गोविंदरावाच्याकडून पैसे आणून भरावेत व पुनः या भानगडींत न पडण्याचा धडा कानाला लावून घ्यावा.' ही कल्पना येताच उत्साहानें मी खुर्चीवरून उठलों. मालकाना सर्व निवेदन केलें आणि मागील दारानें दुकानाच्या बाहेर पडलों. गोविंदरावाना हें सांगण्यांत कांहीं कमीपणा होता किंवा त्याच्याविषयीं भीति होती असे नाहीं. पण आपण खायचे नि त्याना पैसे मागायचे या जाणिवेने अंगाला घाम फुटला. तरी धीर धरून मीं सर्व हकीगत गोविंदरावाना सांगितली. ते थोडे हसले व 'मी त्या दुकानाकडे पैसे पाठवतों' असे मला म्हणाले. या घटनेमुळें माझी व बळवंतराव नातू यांची घसट झाली व परिचय दृढ झाला. पुढे कांहीं दिवस मी त्यांच्या दुकानावरूनहि जात नव्हतों. पण बळवंतरावानींच मला मुद्दाम दुकानात बोलावून नेऊन माझी भीड चेपेल व संकोच नाहींसा होईल असें केलें. तेव्हापासून त्यांच्या दुकानात बसून मीं कधीं कांहीं खाल्लें नाहीं. दुकानाच्या मागच्या बाजूला मालकाबरोबरच गप्पा मारत बसून त्यानीं दिलेले फराळाचे मीं खाल्लें आहे. कारण तेथे खाल्ल्याबद्दल 'अमुक दसम इतके पैसे' असा नभ्रा होण्याची भीति नव्हती. ही गोष्ट गंगाधररावाना कळू नये अशी माझी इच्छा होती. परंतु सर्वांच्या विचारानेंच ही उपाययोजना झाली होती, असें मला कांहीं कालानंतर समजलें. पण त्याबद्दल मला गंगाधररावानीं कधींच कांहींहि विचारलें नाहीं.

**परिषदेचे अध्यक्ष कोण ? :** या परिषदेला अध्यक्ष निवडण्याचें काम सोपें नव्हतें. परिषदेमध्यें 'कॉंग्रेसप्रवेशाचा' ठराव टिळकाना पास करून घ्यावयाचा होता. सामान्यतः हें काम स्वागत मंडळाचें असतें व असलें पाहिजे. पण हा निर्णय टिळकानींच घ्यावा, असे ठरविण्यात आलें होतें. विठ्ठलभाई पटेल यानीं हें स्थान मंडित करावें असा प्रयत्न टिळकानीं केला होता. परंतु त्या वेळीं टिळक किंवा राष्ट्रीय पक्ष यांच्या संपर्क ठेवण्यास विठ्ठलभाई तयार नव्हते. शेवटीं दादासाहेब खापर्डे याना अध्यक्ष म्हणून निवडावें असे टिळकानीं ठरविलें. तथापि माझ्या माहितीप्रमाणें हा निर्णय गोविंदराव-गंगाधरराव यानींच ठरविलेला असावा आणि वाद माजू नये म्हणून या गोष्टीचें कर्तृत्व टिळकांच्यावर लादून ती एक ढाल तयार केली असावी. कांहींहि असलें तरी त्यात वावगें असे कांहींच नाहीं. वऱ्हाडची मंडळी त्या वेळीं मवाळांशीं जुळतेंमिळतें घेऊन कॉंग्रेसप्रवेश करण्याच्या विरुद्ध होती. त्या दृष्टीनें दादासाहेबांचा उपयोग करावा, असें टिळकानीं ठरविलेलें होतें. आपल्या पक्षामध्यें

फूट पडू नये म्हणून परिषदेपूर्वी विचारविनिमय करण्यासाठीं टिळकांनीं कांहीं प्रमुख लोकांना पुण्यास बोलावून घेतलें होतें. या परिषदेला बेळगावकडील जे प्रतिनिधि जमतील त्यांच्यापैकीं बहुतेक सर्वांची मतें टिळकांना अनुकूल पडतील, असे प्रयत्न गोविंदराव, गंगाधरराव यांचे सुरू झाले होते. या बाबतींत त्या दोघामध्यें त्या चर्चा चालत त्या प्रस्तुत लेखकाच्या कानावर मधूनमधून येत असत. या सभेटाला व कॉंग्रेसप्रवेशाला गंगाधरराव प्रथम कांहीं दिवस तरी विरुद्ध होते. परंतु गोविंदराव व बाबासाहेब सोमण त्याला अनुकूल होते. या तिघांचा कडाक्याचा वाद झालेला प्रस्तुत लेखकानें ऐकलेला आहे. शेवटीं टिळकांच्या बुद्धीलाच शरण जावें याबद्दल कोणाचेंच दुमत नव्हतें. म्हणून दादासाहेब खापर्डे यांची या परिषदेचे अध्यक्ष म्हणून झालेली निवड अगर नियुक्ति सर्वमान्यच झाली.

**परिषदेसाठीं मांडव कीं तंबू ?** : या परिषदेसाठीं जनतेनें अपेक्षेपेक्षा अधिक भरपूर आर्थिक साहाय्य दिलें होतें तथापि मंडपात पैसा खर्च न करता एखादा तंबू बनविण्यात येईल तर अनेक वर्षे परिषदासाठीं राष्ट्रीय पक्षाला वापरतां येईल, या हेतूनें तंबू बनविण्याचें ठरलें. तंबूमध्यें शक्य तितके कमी खांब यावेत अशीहि इच्छा व अपेक्षा बाळगूनच तंबू बनविण्यात आला होता. देवल सर्कसचे व्यवस्थापक म्हणून ज्यांनीं जन्मभर काम केलें आणि नित्यश. तंबू उभारणें व उतरवणें हीं कामे केलीं त्या श्री रामभाऊ पटवर्धन यांच्याकडेच हें काम सोपविलें होतें. कल्पनेप्रमाणें तंबू तयार होऊ शकला नाहीं. आणि त्यात रामभाऊ पटवर्धन यांनीं तंबूचा एक खांब कापवून अधिक घोटाळे उत्पन्न करून ठेवले. त्यामुळें तंबूमध्यें खांबच खांब झाले. आयत्या वेळीं ते सर्व विशिष्ट मापाचे खांब मिळविणें व ते खांब तंबूत उभे करण्यास तंबूला त्या त्या ठिकाणीं चामड्यानें शिवावें लागतें, तितके चामडें पुरवणें आणि त्या ऐनवेळीं तितके चांभार मिळवणें व तीं सर्व ठिकाणें चामड्यानीं शिवून किंवा जोडून घेणें आणि एवढा मोठा तंबू चोहों बाजूंनीं ताणून उभा करण्यास ३००।४०० मजूर आणून कामाला लावणें, एवढा मोठा पसारा आणि कामाचा व्याप गोविंदरावांनीं अवघ्या दोनतीन तासात प्रत्यक्ष आवरून दाखवला. किती अचाट कर्तृत्व आणि अतुल सामर्थ्य असलें पाहिजे या वल्भीमसेवकाचें ! जेथे आदल्या दिवशीं सायंकाळीं तंबू उभा राहू शकेल कीं नाहीं याचीच शंका वाटत होती तेथे तंबू उभारून सकाळीं सात वाजण्यापूर्वी तो सुशोभित करूनहि दाखविण्याची अद्‌भुत किमया गोविंदरावांच्या हातीं होती ! !

या परिषदेस बावीसशेपेक्षा अधिक प्रतिनिधि जमले होते. याशिवाय हजारों प्रेक्षकहि जमले होते. तंबूमध्यें प्रतिनिधींना खुर्च्या देण्याऐवजीं खालीं बसण्याची व्यवस्था केली होती. तरीहि सर्व लोकांचा समावेश त्या तंबूमध्यें होऊ शकला नाहीं. लोकमान्यांचीं जाहीर भाषणें दोनतीन झालेलीं असल्यामुळें लोकांचें अशंत' समाधान

झालें असावें. या परिषदेमध्यें लोकमान्याचा कॉंग्रेसप्रवेशाविषयींचा ठराव जवळजवळ सर्वानुमतें मंजूर झाला. याच वेळीं 'होमरूल लीग' चीहि स्थापना करण्यात आली. या वेळचा एक प्रसंगहि तसाच अविस्मरणीय आहे.

बेळगावच्या या परिषदेच्या वेळींच टिळकांच्या खास व्यवस्थेसाठीं प्रस्तुत लेखकाची योजना झाली होती. 'होमरूल लीग'च्या स्थापनेची सभा टिळकांच्या निवासस्थानींच झाली होती. अर्थात् त्या सभेची सर्व व्यवस्था करण्याचें काम ओघानेंच माझ्याकडे आलें होतें. मीं सर्व कांहीं जोडणी जय्यत ठेवली होती. परंतु सभेच्या ठिकाणीं कागद, पेन्सिल, दौतटाक, टीपकागद वगैरे लिहिण्याचें स्टेशनरी सामान ठेवावयास विसरलों होतों. गंगाधररावांच्या नेहमींच्या सवयीप्रमाणें सर्व व्यवस्था पूर्ण झाली आहे किंवा नाहीं याची जातीनें पहाणी करण्यास ते आले. त्याना ही उणीव तेथें दिसून आली. त्याबद्दल त्यांच्याकडून बोलून घेतल्यावर मीं तें सामान लागलीच त्या जागीं आणून ठेवलें. ही गोष्ट टिळकाना समजल्यानंतर ते विनोदानें म्हणाले की, "अहो, त्यांचेंच करणें बरोबर होतें. स्वराज्याची स्थापना करण्यासाठीं लागणारी शाई ही वेगळी आहे. त्यासाठीं वापरावयाची लेखणी किंवा टांकहि वेगळाच असतो. हें सर्व त्याना माहीत आहे असे दिसतें!"

या परिषदेच्या यशाचें सर्व श्रेय गोविंदरावाना होतें, यात शंका नाहीं. या बाबतींत गंगाधररावांनीं आपल्या 'माझी जीवनकथा' या पुस्तकात पुढीलप्रमाणें लिहून ठेवले आहे :

> "या परिषदेच्या आरंभापासून इतिपर्यंतच्या कामीं माझ्या हाताखालीं मुख्य काम करणारे गोविंदरावच होते. माझ्या हाताखालीं म्हणण्यापेक्षा सर्वच भार त्यांच्यावर (गोविंदरावावर) होता. कोठें कांहीं बिघडले किंवा माझ्या मनासारखें झाले नाहीं तर गोविंदरावानाच जबाबदार धरून त्यांच्यावर सर्व राग मी काढीत असें, आणि ते बिचारे सर्व सहन करीत असत. या परिषदेच्या बाबतींत सातआठ वेळा तरी त्यांच्या डोळ्यातून पाणी येण्यापर्यंत माझ्या कठोर शब्दाचा त्यांच्यावर मारा व परिणाम झाला असेल! पण आमचीं अंत:करणें एकमेकाना माहीत असल्यामुळें हा परिणाम अर्ध्या तासापेक्षा जास्त केव्हांहि राहात नसे."
>
> —*माझी जीवन कथा, पृ २५१*

कारण गोविंदराव जणु कांहीं हें जाणून होतें कीं, एका कुशल शिल्पकाराची छिनी अत्यंत भावनाशील सुंदर संगमरवरावर चालत आहे व त्यांतूनच एक मनोहर सुंदर मूर्ति निर्माण होणार आहे. या गुरुशिष्यांनीं एकमेकाचें जीवन सुमारें वीस वर्षे अत्यंत जवळून न्याहळून पाहिले होते, व परस्परांचें यथार्थ मूल्यमापन केलेले होतें.

**परिषदेंतील एक गोड घास :** ही परिषद सर्वांच्या अपेक्षेपेक्षां अधिक यशस्वी झाली. इतका लोकसमूह यापूर्वीं कोणत्याहि सार्वजनिक कार्याकरिता या

बेळगावांत जमलेला नव्हता, आणि इतका उत्साहहि यापूर्वी कधीं दिसून आला नव्हता. सर्व व्यवस्था प्रत्यक्ष पाहून लो. टिळकांनाहि संतोष वाटला. टिळक बेळगाव सोडून जाते वेळीं रीतीप्रमाणें स्टेशनवर त्यांना पोहोंचवावयास बेळगावांतील हजारों लोक आणि या परिषदचे बहुतेक पदाधिकारीहि गेले होते. सर्व प्रतिष्ठित पाहुण्यांच्या गळ्यांत हार घालण्यांत गंगाधरराव गुंतले होते. हारांचें ताट प्रस्तुत लेखकाच्या हातींच होतें. त्यांतील एक हार टिळकांनीं उचलून घेतला आणि गंगाधरराव होते तेथें जाऊन त्यांच्या गळ्यांत तो हार घालीत लोकमान्य म्हणाले, 'तुमच्या श्रमाबद्दल तुम्हांला ही माझी भेट !' तो हार पुढें कित्येक दिवसपर्यंत गंगाधररावांनीं जपून ठेवला होता.

ही परिषद यशस्वी रीतीनें पार पडल्यानंतर बेळगांवांत भयंकर जोराचा पाऊस व वादळ आलेलें होतें. परिषदेचें काम यथासांग पार पडेपर्यंत जणु काय तो सोसाट्याचा वारा व पाऊस वाट पहातच शांत होता. या परिषदेंत गोविंदरावांनीं इतकें काम केलेलें असूनहि कोणत्याहि समारंभाचे वेळीं किंवा फोटोचे वेळीं, केव्हांहि त्यांनीं पुढं पुढें केलेलें नाहीं एवढेंच नव्हे तर ते अशा वेळीं नेमके गैरहजरच असत. पाहुण्यांची मेजवानीची पंगत चालू असतांना पंक्तींतील मध्य ताटावर भोजनास बसण्याचा आग्रह त्यांना कितीहि झाला तरी त्यांनीं तें विनयपूर्वक नाकारलें किंवा टाळलेंच आहे.

गोविंदरावांचा हा प्रसिद्धिपराङ्मुख स्वभाव लक्षांत घेऊन टिळकांनीं त्यांना मुद्दाम पुण्यास येऊन भेटण्याविषयीं गंगाधररावांना पत्र पाठवून कळविलें होत. त्याप्रमाणें गोविंदराव पुण्यास जाऊन लोकमान्यांच्याबरोबर मनमोकळी चर्चा करून आले. लोकमान्यांनीं 'होमरूल लीग'चें काम हातीं घेतलें होतें. त्या कामींहि गोविंदरावांनी झटून काम केलें. हजारों सभासद त्यांनीं मुख्य कचेरीकडे पाठविले. याच वर्षी लखनौ येथें कॉंग्रेसचें अधिवेशन भरलें होतें. त्यासाठीं बेळगावहून पंचवीस प्रतिनिधींसह गोविंदराव लोकमान्यांच्या धोरणाला पाठिंबा देण्यासाठीं गेले होते.

या परिषदेच्या वेळींच बेळगावांत 'होमरूल लीग'ची स्थापना झाली आणि लीगच्या अध्यक्षस्थानीं बॅ. बॅप्टिस्टा यांची निवड झाली होती. त्याप्रमाणेंच 'डेमोक्रॅट' म्हणून एक इंग्रजी दैनिक मुंबईमध्यें सुरू करावें असाहि विचार नक्की झाला होता. या 'डेमोक्रॅट' पत्राचे संपादक म्हणून बाबू अरविंद घोष यांना होमरूल लीगच्या अध्यक्षांनीं म्हणजे बॅरिस्टर बॅप्टिस्टांनींच पत्र लिहावें, असें ठरविण्यांत आलें व त्याप्रमाणें त्यांना पत्रहि पाठविण्यांत आलें. त्या पत्राला बाबू अरविंद घोष यांच्याकडून नकारात्मक उत्तर आलें. तें मूळ पत्रच बॅ. बॅप्टिस्टांनीं गंगाधररावांच्याकडे अवलोकनार्थ पाठविलें होतें. तें पत्र वाचून गंगाधररावांनीं 'येत नाहीं म्हणतात ना, जाऊं द्या !' असे उद्गार काढले व तें पत्र तसेंच आपल्या टेबलावर फेंकून दिलें. बाबू अरविंद घोषांसारख्या मोठ्या माणसाचें तें पत्र असल्यामुळें, मीं तें उचलून माझ्याकडे ठेवलें. आणि हा पत्राला घडीहि पडणार नाहीं, अशा काळजीनें तीस वर्षें तें

मीं जपून ठेवलें होतें. पुढें सन १९५० सालीं बाबू अरविंद घोष यांचें निर्वाण झालें त्या वेळीं मी मुंबईमध्यें होतों. मला त्याच्या सन १९२० सालच्या त्या पत्राचें स्मरण झालें. मीं तें पत्र माझे स्नेही श्री० श्रीपाद शंकर नवरे याना दाखविलें, त्या वेळीं ते 'प्रभात' पत्र चालवीत होते. तें पत्र पहाताच त्यानीं त्या पत्राचा फोटो, त्याची इंग्रजी नक्कल, व त्याचें मराठी भाषांतर किन्ही 'मौज' साप्ताहिकामध्यें प्रसिद्ध करविलें. या पुस्तकाच्या परिशिष्टांत तें इंग्रजी पत्र व त्याचें मराठी भाषांतर दिलेलें आहे.

'डेमोक्रॅट' इंग्रजी दैनिकासाठीं अरविंद बाबूंना बोलविण्याचा प्रश्न जेव्हा बेळगांवांत गंगाधररावांच्या घरीं चर्चिला जात होता त्या वेळीं लोकमान्यांच्या तोंडून उद्‌गार निघाले होते कीं, "त्यांना बोलवण्यास कांहींच हरकत नाहीं. माझ्या मतें त्यानीं पॉडिचरीस जावयास नको होतें. सरकारनें काय चार वर्षे शिक्षा दिली असती तेवढी सोसून बाहेर येताच पुनः सरकारच्या छातीवर बसावयाचें! पण ते डेमोक्रॅटचे संपादक म्हणून येतील तर उत्तम होईल!!"



प्रकरण सव्विसावें

# वेळगावला लोकमान्यांची ओझरती भेट

(सन १९१७)

गदग येथें एक जुनी कापडगिरणी होती. ही गिरणी कांहीं कारणामुळें बंद पडली होती. त्या गिरणीबाबत शेठ मनमोहनदास रामजी व टिळक गदगला जात असताना वाटेंत बेळगाव स्टेशनवर त्यांना भेटण्यासाठीं गोविंदराव, गंगाधरराव व इतर बरीच मंडळी गेली होती. परत पुण्यास जाताना बेळगाव येथें उतरून भाषण करून जाण्याचा आग्रह टिळकांना करण्यात आला होता. 'पाहू या' एवढेंच ते म्हणाले. दोन दिवसानंतर गदगहून लोकमान्य परत निघाल्यावेळीं बेळगाव स्टेशनवर जाऊन त्यांना उतरून घेण्याच्या इराद्यानें गोविंदरावांनीं प्रयत्न चालविला. 'मला येथ उतरण्याचा आग्रह करू नका, माझें भाषण सरकार होऊं देणार नाहीं.' वगैरे कारण सुद्धा टिळकांनीं सांगितलें. पण गोविंदरावांनीं लोकमान्यांचें सामान खालीं उतरवलेंच! लोकमान्य बेळगावांत उतरले आहेत ही वार्ता हां हां म्हणता बेळगाव, शहापूर व आसपासच्या गांवांत पसरली. लोक त्यांच्या दर्शनास गर्दी करू लागले व त्यांच्या भाषणासंबंधीं चौकशी सुरू झाली. सार्वजनिक ठिकाणीं भाषणबंदीची नोटीस बेळगांवांत त्याच रात्रीं लोकमान्यांवर बजाविली गेली. लोक विवंचनेंत पडले व आतां काय होतें याकडे सर्वांचे डोळे लागून राहिले.

यांतून मार्ग कसा काढावयाचा याचा निश्चय गोविंदरावांनीं आपल्या मनांत करून ठेवलेलाच होता. त्यांनीं जोगळेकरांच्या वाड्याचें परसू—खाजगी जागा—आपल्या मनांत हेरून ठेवली होती. तेथें सहज तीनचार हजार लोक बसतील एवढी विस्तीर्ण ती जागा होती. ती जागा साफसूफ करायची, खांबवळंगे पुरवायचे, व पताका तोरणें लावून रातोरात ती शृंगारावयाची म्हणजे त्यासाठीं गॅसबत्त्यांची सोय आणि श्रम करणारे दोन अर्डीचशें स्वयंसेवक तरी सहज लागणार होते. पण गोविंदराव ते गोविंदरावच. तेच करू जाणे हें काम! एवढा स्वयंसेवक श्रमिकांचा तांडा, त्यांना लागणारीं आयुधें, खोरींकुदळी, विळेकोयते, बांबाड्या झाडू सर्व सामान अगदीं अल्पावधींत त्यांनीं उभें

केलें; आणि दुसरे दिवशीं सकाळीं आठ वाजतां त्या ठिकाणीं लोकमान्यांचा सत्कार करण्याचें नक्की केलें. आधल्या रात्रीं जिकडे तिकडे रान माजलेलें, खाचखळगे असलेलें अस्वच्छ परसूं दुसऱ्या दिवशीं पहांटे अगदीं स्वच्छ समास्थान झालें! ही अद्‌भुत किमया पाहून लोक आश्चर्यचकित झाले! राष्ट्रसंत येती घरा! तोचि दिवाळी दसरा! त्यांच्या सन्मानार्थ आनंदानें प्रातःकालापासूनच सनई व चौघडा वाजूं लागला. सकाळीं दिसूं लागल्यापासूनच हजारों लोकांचे थवे त्या तोरण-पताकांनीं शृंगारलेल्या ठिकाणीं जमू लागले. कल्पनेपेक्षा गर्दी वाढली आणि ठरलेल्या वेळीं लोकमान्यांचा भव्य सत्कार-समारंभ झाला.

या सत्काराला उत्तरादाखल बोलतांना 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि तो मी मिळवणारच!' हे त्यांच्या तोंडचें प्रसिद्ध वाक्य ऐकताच लोकांनीं टाळ्यांचा प्रचंड कडकडाट केला. सरकारनें सार्वजनिक जागीं त्यांना भाषण करण्यास बंदी केली असतांना, एवढें मोठें खासगी सुंदर समास्थान शोधून, इतक्या थोड्या अवधींत इतकी जय्यत तयारी केल्याबद्दल टिळकांनीं बेळगांवकरांना धन्यवाद दिले.

पुढें लोकमान्यावर मुंबई हायकोर्टांत ज्या 'स्वराज्य' शब्दाच्या प्रचाराबद्दल खटले होऊन त्यांतून ते दोषमुक्त झाले, अशा आक्षेपित भाषणापैकीं बेळगावचें हें भाषणहि एक होतें. झपाट्यासरशीं तडाखेबंद कामें उरकण्याची गोविंदरावांची ही हातोटी केवळ अनन्यसाधारण आहे. ही कर्तृत्वशक्ति इतरत्र क्वचितच पहावयास मिळते.



प्रकरण सत्ताविसावें

# एक फौजदारी खटला

अगदीं लहान दिसणाऱ्या गोष्टींतून सुद्धा एखादे वेळीं फार मोठ्या गुंतागुंती निर्माण होतात. इ. स. १९१८ मध्यें असाच एक प्रकार घडून आला. शनिवार हा बेळगावातील आठवड्याचा बाजारदिवस. त्या दिवशीं आसपासच्या खेड्यातून अनेक गावाचे खेडूत आपला घरचा बाजारहाट करण्यास येतात. आणि रस्त्यावर बसून आपण बरोबर आणलेला थोडाफार भाजीपाला, तांदूळ-कोंडा, अंडीं, लोणी वगैरे नित्यावश्यक माल विकून त्यातूनच आपणाला लागणारे जिनस खरेदी करीत असतात अशा बाजाराच्या दिवशीं गोविंदरावांच्या दुकानाच्या कट्ट्यावर आणि दुकानाच्या पुढील बाजूस तांदुळाच्या कोंड्याचा व्यापार करण्यासाठीं खेडवळ बायका आपल्या बुट्ट्या घेऊन बसत असत. बहुजनसमाज म्हणजे आपलाच अशी गोविंदरावाची व त्याच्या इतर मंडळीची भावना असल्यामुळें ते कधीं असल्या गोष्टींना विरोध करीत नसत, किंबहुना तो एक आपला मानच समजत असत. आणि रस्त्याच्या कडेला बसता बसता आपल्या बुट्ट्या गोविंदरावाच्या दुकानाच्या पायऱ्यावर व पुढे कट्ट्यावर आणून ठेवून ती जागा व्यापण्यास त्या स्त्रियांहि कधींच रुकोच करीत नसत. दुकान चवाठ्यावर असल्यामुळें तेथें गर्दी होऊ नये किंवा रहदारीला अडथळा येऊ नये म्हणून बंदोबस्ताकरता पोलीस ठेवण्याची वहिवाट होती व आजहि ती तशी आहे.

रस्त्यावर बुट्ट्या ठेवून तांदुळाच्या कोंड्याचा व्यापार करणाऱ्या स्त्रियांना तेथून हलविण्याचा व उठविण्याचा प्रयत्न पोलीस करीत होते यासीन या नावाचा युनिफॉर्म घातलेला एक पोलीस त्या खेड्यापाड्यातील स्त्रियांच्या बुट्ट्या लाथेनें ढोंकरीत असलेला दुकानात बसल्या बसल्या गोविंदराव पहात होते. त्यांनीं आपला नोकर जिवाप्पा शिंदे याला त्या पोलिसाकडे पाठवून तसे न करण्याबद्दल त्याला सांगविलें. 'तू कोण मला सांगणार!' म्हणून तो जिवाप्पा शिंदेबरोबर हमरीतुमरी

करू लागला. हें पाहतांच दुकानांतून भीमा सोनार व श्री. कृष्णराव याळगी तेथें गेले. अर्थात् तरीच गर्दी जमली. यासीन शिपायाला आपला अपमान झाला असे वाटून त्यानें अधिकाधिक चेवानें कोंड्याच्या बुट्ट्या लाथेनें ढोसरण्याचें चालू केलं हे पाहून गोविंदरावांना राहवलें नाहीं. आणि त्याला धरून फौजदार कचेरीमध्यें नेण्यास त्यांनीं आपल्या नोकरास सांगितले. त्याला कचेरीकडे नेलें जात असता जिवाप्पा शिंदे आणि यासीन याच्यामध्यें धक्काबुक्कीला सुरवात झाली. जिवाप्पा हा पैलवानी पेशाचा असल्यामुळें आणि गोविंदरावांचेंहि तो ऐकत नाहीं हें पाहून, त्यानें यासीनला चांगलाच प्रसाद दिला. भीमा सोनारानेंहि त्यात भाग घेतला होता. वास्तविक ही मामुली गोष्ट येथेंच संपावयास पाहिजे होती. परंतु अगावर युनिफॉर्म असलेल्या सरकारी शिपायाकडे जरी चूक असली तरी त्याला प्रसाद मिळावा व तोहि सार्वजनिक ठिकाणीं मिळाला ही गोष्ट वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्यांना झोंबली. यासीनच्या डगल्यापट्ट्यामध्यें इंग्रजी साम्राज्याची शक्ति व अब्रू साठलेली असल्यामुळें ही साधी बाब न वाटून हें प्रकरण चागलेंच रंगलें. पोलीस यासीन आपल्या युनिफॉर्मवरील शिटी वाजविण्याची धडपड करू लागला. तेव्हा जिवाप्पा शिंदेनें ती शीटच तोडून घेतली. वास्तविक जिवाप्पा शिंदे व भीमाप्पा सोनार या दोघांनींच यात खरा भाग घेतलेला होता. परंतु गोविंदराव, कृष्णराव, अर्जुनवाडकर अशा लोकांना, त्यांचा काहींहि संबंध नसतांना त्या संबधात गोविण्यात आलें होतें. आणि या सर्वांवर सरकारी कामात व्यत्यय आणला आणि सरकारी गणवेश धारण करणाऱ्या पोलीस शिपायास मारहाण केली याबाबत गोविंदराव सह सात लोकांवर रीतसर खटला भरण्यात आला.

या घटनेच्या दिवशीं गंगाधरराव गांवात नव्हते. ते जीवनराव याळगी यांना घेऊन चांदास गेले होते. लोकमान्यांनीं कॉंग्रेसप्रवेश केल्यानंतर आणि 'स्वराज्य संघ' स्थापन झाल्यावर त्यांचे दौरे स्वराज्याच्या प्रचारार्थ सारखे चालू असत त्या वेळीं लोकमान्यांचा दौरा वऱ्हाडात चालू होता. चांदा येथें एक राजकीय परिषद बोलावण्यात आली होती. तिच्या अध्यक्षस्थानी दे. भ. गंगाधररावांची निवड व नियुक्ति झाली होती ही सूचना लोकमान्यांनींच स्थानिक कार्यकर्त्यांना केलेली होती या परिषदेस स्वत लोकमान्य उपस्थित राहणार होते. लोकमान्यांच्या उपस्थितीमध्यें आपण अध्यक्षस्थान मांडित करण्यास गंगाधररावांना संकोच वाटत असे. परंतु त्यांना निमंत्रण देण्यास आलेले श्री. दाजीशास्त्री यांनीं लोकमान्यांचें पत्र बरोबर आणिल्यामुळें गंगाधररावांना तें मान्यच करावें लागलें होतें. लोकमान्यांच्या त्या दौऱ्याची सर्व व्यवस्था लोकनायक श्री. माधव श्रीहरी तथा बापूजी अणे आणि श्री दत्तडे यांनीं रात्रंदिवस परिश्रम करून चोख ठेवलेली होती. चांद्याहून परत येतांना वरील घटना गंगाधररावांना समजली

गंगाधरावांना ही हकीगत कळल्यावर त्यांनीं ठाण्याहून श्री. काका पाटील वकील यांना हा खटला चालविण्यासाठीं बोलावून घेतलें. काका पाटील यांनीं चार्जशीट वगैरे पाहून खटला चालविण्याची पूर्वतयारी केली. एकदोन मुदतीच्या वेळीं कोर्टात हजर राहून त्यांनीं कामहि चालविलें. परंतु त्यांना निराळाच अनुभव आला. बेंच कोर्टात शिक्षण खात्यातून निवृत्त झालेल्या एका पेन्शनरापुढे फिर्यादीचें काम चाललें. त्याना कायद्याचें ज्ञान नव्हतें. काकांच्यासारख्या निष्णात वकिलानें मांडलेले मुद्दे ग्रहण करण्याची कुवत किंवा बुद्धीहि त्यांना नव्हती. सर्वांत महत्त्वाची बाब म्हणजे ते अत्यंत राजनिष्ठ असल्यामुळें, गोविंदरावांच्यासारख्यावर धडधडीत खोटे आरोप केलेले आहेत हें सिद्ध झालें तरी पोलिसांच्या इच्छेविरुद्ध जाण्याची त्यांची हिम्मत किंवा छाती नव्हती. या गोष्टीचा विचार करून काकांनीं एके दिवशीं सांगितलें कीं, या कोर्टात माझी वकिली म्हणजे पालथ्या घड्यावर पाणी ओतल्यासारखें होणार आहे. तेव्हा यांतून निराळ्या प्रकारानें कांहीं तरी मार्ग काढला पाहिजे. काकांच्या म्हणण्यात पूर्ण सत्य होतें. विनाकारण या कोर्टापुढें गीता वाचण्यात कांहीं अर्थ नव्हता. प्रथम हा खटला बेंच मॅजिस्ट्रेटपुढें चालला होता. पुढें त्यांनीं गुन्हा आपल्या अधिकाराबाहेरचा आहे, असें ठरवून पहिला वर्ग मॅजिस्ट्रेट बेव यांच्या कोर्टाकडे तो खटला वर्ग करून पाठवला.

खटल्याची सर्व हकीकत गंगाधररावांनीं नीट समजून घेतली. पोलिसाला गोविंदरावांच्या मल्लांनीं मारलें होतें, हें खरेंच होतें. चीड येण्यासारखें पोलिसांचें वर्तन घडलें होतें हेंहि खोटें नव्हतें. पण त्याबद्दल त्याला मारणें हा कांहीं योग्य उपाय नव्हे, असें गंगाधररावांना वाटलें. त्यामुळें हें प्रकरण मिटवावें असाच त्यांच्या मनाचा कल होऊं लागला. गोविंदरावांनीं आपली चूक कबूल केल्यास या प्रकरणाचा निकाल लागणें शक्य आहे किंवा नाहीं याचा अदाजहि गंगाधररावांनीं घेतला. या बाबतींत गोविंदरावांचा विचारहि अजमावला. गोविंदरावांच्या स्वभावाप्रमाणें केवळ शिक्षेच्या भीतीनें ही गोष्ट ते कबूल करणार नाहींत, हें अगदीं स्पष्ट व उघड होतें. हा विचार गोविंदरावांनीं सकृद्दर्शनींच झिडकारून टाकला होता. पण रागाच्या भरात अशी चूक घडली असल्यास ती कबूल करण्यात कोणत्याहि प्रकारचा कमीपणा नाहीं, इतकेंच नव्हे तर तसें करणेंच इष्ट आहे, असें त्यांना पटविण्याचा प्रयत्न गंगाधरराव करीत होते. गंगाधररावांच्याविषयीं गोविंदरावांना नितांत श्रद्धा असल्यामुळें त्यांनीं हो विचार मान्य केला एवढेंच नव्हे तर तो आत्मसात् केला.

त्यानंतर एका स्नेह्यामार्फत ती गोष्ट गंगाधररावांनीं पोलीस सुपरिंटेंडेंटच्या कानावर घातली. गोविंदरावांनीं चूक कबूल केल्यास त्यांच्यावरील फिर्याद काढून घेण्यात येईल, असा त्यांच्याकडून निरोप आला. गोविंदरावांनीं कोर्टात जाऊन चूक कबूल करण्याचीहि आवश्यकता नाहीं. फक्त त्यांनीं आपल्याजवळ येऊन कबुली दिली

तरी पुरे आहे, असेंहि त्यांनीं गंगाधररावांना कळविलें. ठरल्या वेळीं गोविंदरावाना पोलीस सुपरिंटेंडेंटच्या बंगल्यावर पाठविण्यात आलें. तेथें गोविंदरावानीं आपली चूक कबूल केली. ज्या शिपायाला मार बसला होता त्याचीहि चूक होती हें सुपरिंटेंडेंट याना दिसून आलें होतें, म्हणून त्याच्याकडूनहि त्यांनीं चूक कबूल करविली. यानतर ताबडतोब पोलिस सुपरिंटेंडेंट डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे गेले व फियाद काढून घेण्याबद्दल सरकारी वकिलानीं मॅजिस्ट्रेटची परवानगी मागितली. कोर्टानें तशी परवानगी दिली. फिर्याद काढून टाकतेवेळीं गोविंदरावानीं दाखविलेल्या सौजन्याबद्दल त्याचें कोर्टानें अभिनदन केलें. हा अनपेक्षित प्रकार पाहून गंगाधरराव-गोविंदराव याच्या मनावर वेगळाच परिणाम झाला.

त्या वेळीं पहिलें महायुद्ध जोरात सुरू होतें. बेळगावात तेव्हा ब्राऊन हे कलेक्टर होते. खटला काढून घेण्यापूर्वी पोलिस अधिकाऱ्यानीं त्याचाहि विचार घेतला होता. गोविंदरावानीं एक हजार रुपयाचे वॉरबॉंड्स खरेदी करावेत अशी इच्छा मि. ब्राऊन यानीं प्रदर्शित केली. त्याला गंगाधरराव व काका पाटील यानाहि आक्षेप घ्यावा असें वाटलें नाहीं. ब्राऊन साहेबानें इतकें खालीं उतरावयास नको होतें. ही 'ब्रिटिश कॅरेक्टर' नव्हे असें मात्र त्याना वाटत होतें. त्यानीं गोविंदरावाना एक हजार रुपयाचे वॉरबॉंड्स घेण्याचा सल्ला दिला. त्याप्रमाणें गोविंदरावानीं आपल्या इच्छेविरुद्ध ते युद्धरोखे खरेदी केले, आणि पुढें दोन महिन्याच्या आतच ते विकूनहि टाकले. गोविंदराव व त्याच्या सहकाऱ्याना तीनचार महिने या प्रकरणीं खूपच त्रास सहन करावा लागला. परतु गोविंदरावानीं आपल्या सहकाऱ्याना कोणत्याहि प्रकारची झळ लागू दिली नाहीं; आणि त्याच्या मानापमानाचा प्रश्न, दिलदारपणें आपण चुकीचे धनी होऊन परभारेंच निस्तरला. तेव्हा त्यानाहि तक्रारीला जागा राहिली नाहीं व हें वादळ सर्व दृष्टींनीं समाधानानेंच शात झालें.



प्रकरण अठ्ठाविसावें

# तीन नवे सहकारी

समाजातील नवीन होतकरू तरुणाच्या शोधार्थ गोविंदरावाची दृष्टि सारखी फिरत असे. अशा तरुणाना इरतऱ्हेनें मदत पोहोंचवून त्याच्या मनात आपलेपणा उत्पन्न करण्याचें काम गोविंदरावाकडून सहजगत्याच होत असे. तो त्याचा स्वभावच होता. त्याकरता त्याना मुद्दाम प्रयास करावे लागत नसत. आणि पुढे काहीं दिवसांनतर त्याचा व गगाधररावाचा सबध येत असे. सन १९१४ नतर अशा तीन तरुणाचा सबध गगाधरराव–गोविंदरावाशीं आला : (१) श्री. कृष्णराव करगुप्पीकर वकील, (२) श्री. दत्तोपत मजली वकील (३) श्री. भीमराव पोतदार वकील. हे तीन वकील आपल्या धद्यात तर चमकणारे होतेच, पण बेळगावच्या सार्वजनिक कार्यक्षेत्रातहि त्याचें कार्य भिन्नभिन्न दृष्टींनीं उल्लेखनीय असेच झालेलें आहे. त्याचा परिचय करुन देण्याकरिता त्याच्या कार्याचा त्रोटक आढावा घ्यावयाचा म्हटलें तर तो असा आहे,—

**श्री. कृष्णराव करगुप्पीकर वकील** : श्री. कृष्णराव करगुप्पीकर हे बेळगावजवळील करगुप्पी या खेड्याचे राहणारे. ते समतोल बुद्धीनें दोन्ही बाजूना विचार करणारे आणि स्वभावानें सात्त्विक होते. त्याचा बोलण्यातील आणि वागण्यातील गोडवा ध्यानात राहण्यासारखा होता. ल्हानपणापासून सार्वजनिक कामें करण्याचा त्याना नाद होता. गोविंदरावाचा व त्याचा स्नेह जुना होता. त्याना कानडी भाषेचा रास्त अभिमान होता, पण ते अन्य प्रातीयाचा हेवा किंवा द्वेष करणारे नव्हते. ते बेळगावात वकिली करीत. परतु सन १९२० सालीं कॉंग्रेसनें गाधींचा असहकारितेचा ठराव मजूर केल्यानतर श्री. कृष्णराव करगुप्पीकर यानीं आपली वकिली सोडून दिली, व आपलें जीवन सार्वजनिक कार्याला वाहून टाकलें. काहीं काळ स्वत च्या जबाबदारीवर ते एक कानडी मासिक चालवीत असत. खेड्यापाड्यामध्यें पायीं व सायकलनें प्रवास करुन त्यानीं लोकजागृतीचें पुष्कळच काम केलें आहे. निवडणुकीवर कॉंग्रेसनें बहिष्कार घातला होता. त्या बहिष्काराचा प्रचार करण्यासाठीं 'मते अमक्या

उमेदवाराला देणें किंवा तमक्या उमेदवाराला देणें, हें जसे मताधिकार बजावणें आहे, तसें मत न देणें हाहि एक तितक्याच तोलाचा व महत्त्वाचा मताधिकार बजावण्याचा प्रकार आहे' हें लोकाना समजावून सागण्यासाठीं व व्याख्यानें देण्यासाठीं ते सतत खेड्याखेड्यातून दान्यावर असत. प्रस्तुत लेखकालाहि त्याच्याबरोबर सायकलनें प्रचारार्थ फिरण्याची सुसधि लाभलेली होती. आपल्याबरोबर फिरणाऱ्या कार्यकर्त्यांच्या खाण्यापिण्याची ते मन पूर्वक काळजी घेत असत. कृष्णराव करगुपीकराना गगाधरराव प्रेमानें 'शकराचार्य' म्हणत असत, तें त्याच्या सात्त्विक गुणाकडे व प्रचारकार्याकडे पाहून खरें होत असे वाटू लागतें.

सन १९२२ मध्यें ते प्लेगनें आजारी पडले. बेळगावच्या टिळकवाडी या उपनगरात 'स्वराज्याश्रमा'मध्यें त्याना ठेवण्यात आले होतें. प्रस्तुत लेखक व्यवस्थापक या नात्यानें त्या वेळीं 'स्वराज्याश्रम' चालवीत असल्यामुळें त्याची शुश्रूषा करण्याची संधि त्याला मिळाली व त्याच्या दैनिक व्यवस्थेची सर्व प्रकारची काळजी वहावी लागली होती. श्री. बाबासाहेब सोमण व गोविंदराव त्याची सेवा करण्यास सदा तत्पर असत. चारपाच दिवसानतर त्याचा आजार थोडा हलका असें दिसत होतें. आता फक्त त्याची काळजी घेणे व शुश्रूषा करीत राहणें एवढेच काम बाकी आहे, असा डॉक्टराचा अभिप्राय होता. परतु कृष्णराव करगुप्पीकर याच्याकडून एक प्रमाद व अत्याचार घडला आणि त्यामुळें त्याचा मृत्यु ओढवला. त्या वेळीं स्वातत्र्यलढ्यातील एक विनीवरील सैनिक कामीं आला याचे अत्यत दुःख गोविंदरावाना झालें. राजकीय क्षेत्रामध्यें फारच थोडा काळ म्हणजे सुमारें ७–८ वर्षें त्यानीं जी निष्ठापूर्वक समाजसेवा केली होती त्यामुळे सर्वांना त्यानीं एक प्रकारचा चटका लावून ठेवला होता. त्याच्या मृत्यूमुळें जनतेने 'हाय! हाय!' केलें. गोविंदराव-गगाधरराव याना तर आपला एखादा अवयव गेल्याचें दुःख झालें! बेळगावच्या राजकीय क्षेत्रातील त्याची जागा रिकामीच राहिली. ती कधींच भरून निघाली नाहीं.

**श्री. दत्तोपंत मजली वकील :** श्री. दत्तोपत मजली हे बेळगाव जिल्ह्यातील मजली या गावचे रहिवासी. आपली बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यानीं काहीं दिवस मुबईस सचिवालयामध्ये नोकरी धरली होती. त्यानतर काहीं काळ ते नामदार गोखले याच्या 'भारत सेवक समाजा'मध्यें उमेदवार म्हणून होते. तेथें राहणें त्याना पसत न पडल्यानें त्यानीं ती उमेदवारी सोडली, हायकोर्ट वकिलीचा अभ्यास केला आणि ती परीक्षा पास झाल्यावर त्यानीं बेळगावामध्यें वकिली सुरू केली. थोड्याच काळात बेळगाव बारमध्यें ते चमकू लागले. त्याचा स्वभाव भावनाप्रधान असल्यामुळे त्याचीं भाषणें परिणामकारक होत असत. कानडी भाषेवर व विशेषतः इग्रजी भाषेवर त्याच चागलें प्रभुत्व होत. श्री. करगुप्पीकर यांच्या बरोबरच असहकारितेच्या ठरावाला अनुसरून श्री. मजली यानींहि आपली वकिली

सोडून दिली होती. कर्नाटक व महाराष्ट्र या भागामध्यें त्याची माहिती गंगाधररावांच्या इतकीच झाली होती. गंगाधररावांचा उजवा हातच असा बेळगाव जिल्ह्यात त्यांचा लौकिक होता. गोविंदराव, करगुप्पीकर व दत्तोपंत मजली या त्रिकूटाच्या जोरावर गंगाधरराव हे अनेक चळवळींची जबाबदारी आणि स्वातन्त्र्यलढ्यातील बिनी सभाळ ण्यास नेहमीं पुढें येत असत. इ. स. १९१७ ते २२ पर्यंतचीं गंगाधररावांनीं केलेलीं सर्व आंदोलनें व कार्यक्रम या त्रिमूर्तीच्या जोरावरच त्यांनीं निभावून नेलेले आहेत. श्री. दत्तोपंत मजलींनींहि वकिली सोडतांना सार्वजनिक देशसेवा हेंच आपले जीवनकार्य म्हणून जाहीर केलें होतें. या विचाराच्या मदतीवर गंगाधररावांची फार मोठी भिस्त होती. श्री. दत्तोपंत मजली यांना १९२० मध्यें एक वर्ष सक्तमजुरीची शिक्षा झाली आणि पुनः सन १९२१ सालीं नऊ महिन्यांची शिक्षा झाली. पहिली शिक्षा एरवडा तुरुंगात व दुसरी विजापूर तुरुंगात त्यांनीं भोगून संपविली. विजापूरच्या तुरुंगात त्यांची प्रकृति बिघडली व त्यांची स्थिति भ्रमिष्टासारखी झाली. सुटून आल्यानंतर काहीं दिवसांनी त्यांनीं सार्वजनिक कार्यातून आपलें अंग काढून घेतलें, पुन वकिली सुरू केली. त्यांचा भ्रमिष्टपणा तसाच होता. त्यामुळे त्यांच्या वकिलीच्या धंद्यात कमीपणा आला नाहीं वा कधीं खंडहि पडला नाहीं. पण अखेरपावेतों ते भ्रमिष्ट स्थितींतच व्यवहार करीत असत.

विजापूरच्या तुरुंगात दत्तोपंत मजलींची प्रकृति व परिस्थिति बिघडल्याचें गंगाधररावांना कळल्यानंतर गंगाधरराव विजापूरला जाऊन त्यांना भेटून आले. श्री दत्तोपंत मजली यांना मोटारनें बेळगावास घेऊन येण्यासाठीं गंगाधररावांनीं प्रस्तुत लेखकाला विजापुरास पाठविलें होतें. तेथें मजलींना एका कोठडींत बंद करून ठेवण्यात आलें होतें. त्यांच्या खोलीमध्यें जाण्यास लोक भीत असत. पण विजापूरला जाताच मी तेथील लोकांना सांगितलें कीं, मी त्यांच्या खोलींत जाण्यास तयार आहे. श्री. दत्तोपंत मजली अशक्त होते. ते मला मारून मारून असें कितीसे मारतील याची मला कल्पना होती. ते माझ्याइतके सशक्त नाहींत. श्री. दत्तोपंत मजली यांना वेड लागले होते. 'या जगात तीनच मोठीं माणसें आहेत, अरविंद घोष, महात्मा गांधी आणि स्वतः (मजली) ही तीं होत! श्री. तात्यासाहेब सोमण, गोविंदराव याळगी व गंगाधरराव, सर्व मिळून त्यांच्या विरुद्ध कट करीत आहेत!' अशा भ्रमात ते होते. त्या भ्रमातच त्यांनीं एकदा चहाचा कप बाबासाहेबांच्या तोंडावर फेकून मारून त्यांना जखमी केलें होतें. पण प्रत्यक्ष गोविंदराव किंवा गंगाधरराव मजलींच्यापुढें येऊन उभे राहात त्या वेळीं त्यांच्याविषयींच्या आदरानें ते नमूनच वागण्यास त्या भ्रमिष्ट स्थितीमध्येंहि कधीं विसरत नसत.

मी विजापुरास गेलों व त्यांना बेळगावला घेऊन येण्यास तेथील लोकांनीं मोटार कारहि तयार ठेवली मी भोजन करून निघण्याच्या तयारीनें त्यांच्याकडे गेलों. त्यांच्या खोलींत गेल्याबरोबर मी त्यांना नमस्कार केला.

करण्याच्या बाबतींत धर्म, जात, पक्ष, श्रीमत, गरीब, एवढेंच नव्हे तर आपल्याला अनुकूल–प्रतिकूल हा भेद भीमराव कधींच मनात आणीत नाहींत. व्यक्तिगत टीका किंवा निंदा याचा परिणाम ते आपल्या मनावर कधींच करुन घेत नाहींत. श्री. कानविंदे या नावाच्या गृहस्थानीं 'परीक्षक' नामक पाक्षिकातून भीमराव पोतदाराच्यावर गलिच्छ टीका व निंदा कित्येक महिने चालविली होती. पुढें कानविंदे याच्यावरच काहीं प्रसंग आला असता त्याना मदत करण्यास जेव्हा भीमराव तयार झाले, त्या वेळीं श्री. कानविंदे यानीं त्यांच्या या थोर वृत्तीबद्दल त्याना साष्टांग नमस्कार घातला होता अशी आख्यायिका आहे. त्यानीं बेळगाव शहापूर शहरात ज्याना मदत करुन संकटातून सोडविलें आणि सावरुन धरलें आहे असे कित्येक लोक असतील. कोणासहि एकदा ते मदत करण्यास उभे राहिले म्हणजे गरजूनें आपल्या वर्तनात पथ्यापथ्य काहीं पाळलेलें आहे किंवा नाहीं याचा विचार करणें ते, तितक्या पुरतें, गौणच मानतात. कोठलाहि रोग मनुष्याला झाला म्हणजे तो जसा एखाद्या वैद्याकडे जातो आणि वैद्यहि रोग्याचा उच्चनीचपणा ध्यानात न घेता औषध देतो तीच स्थिति भीमराव पोतदार व गरजू लोक यांच्यामध्यें असे व आजहि आहे. सर्व स्थानिक स्वराज्य संस्था, सहकारी संस्था, बँका, अनेक कारखाने, सामाजिक संस्था, व्यापारी वर्ग आणि कित्येक उपकृत लोक यांच्याशीं त्यांचा निकटचा संबंध असल्यामुळें, कोणत्याहि संस्थेला अथवा राष्ट्रीय चळवळींना निधि जमवावयाचा झाल्यास भीमराव पोतदाराचा उपयोग आजवर पुष्कळच झालेला आहे. त्यांच्या मदत करीत राहण्याच्या गुणाचा अनुभव राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळींत व सार्वजनिक कार्यांत गंगाधररावाना अनेक प्रसंगीं आलेला आहे. सरकार व राजकीय चळवळे यांच्यामधील ते एक दुवा असल्याप्रमाणेंच त्यांचें वर्तन असे. कॉंग्रेसच्या निवडणुकी जिंकण्याच्या कामीं तर त्यांचा भरपूर फायदा राष्ट्रीय पक्षानें घेतलेला आहे. त्यांच्या स्वभावातील एक वैशिष्टय म्हणजे कोणत्याहि प्रकारची राजकीय क्षेत्रातील वैयक्तिक महत्त्वाकांक्षा त्याना नव्हती व नाहीं. त्यानीं ज्या शेंकडों लोकाना आपल्या प्रदीर्घ जीवनभरात मदत केलेली आहे त्यांच्याकडून कधींहि एक पैंची देखील अपेक्षा त्यानीं बाळगलेली नाहीं किंवा कधीं काहीं कोणाकडून स्वीकारलेलें नाहीं. काहीं माणसें ज्याीं उपजत बुद्धिमान असतात तसे हे उपजत सहाय्यक आहेत नेहमींच लोकाना सहाय्य करीत राहण्यानें त्याना तें आता व्यसनच होऊन बसल्यासारखें झालेलें आहे. सर्वाना सर्व प्रकारची मदत करीत राहणाऱ्या त्यांच्यासारख्याची जागा घेणारा दुसरा एखादा मनुष्य या भागात अद्यापि जन्माला यावयाचा आहे. लोकाना मदत करण्याची संधीच त्याना न मिळेल तर तीच त्याना मोठ्यातली मोठी शिक्षा ठरेल. लोकाना मदत करीत रहाणें हा त्यांचा आता दुसरा स्वभाव (Second nature) झालेला आहे. उतारवयातील त्यांच्या निवृत्तीच्या काळीं सुद्धा ते जितकी गरजूना मदत करीत आहेत त्याचा अंशमात्र सुद्धा

त्याची त्या त्या संस्थांतील जागा भूषविणारे नवे पदाधिकारी दाखवतील तर भीमरावाच्या सद्गुणांची परंपरा चालू राहिल्यासारखें होणार आहे.

उपकार न करणें एक वेळ परवडेल, पण उपकार केला तर त्याचा डांगोरा पिटणें हें अगदींच अयोग्य होय. हा सामान्यतः शिष्टधर्म मानण्यात येतो. अहिंसा धर्म याच्याहि पुढे जाऊन अशी शिकवण देत असतो कीं, उपकाराचा डांगोरा पिटणें तर बाजूलाच राहो, पण आपण दुसऱ्यावर उपकार करावा व तो विसरून जावा हेंच उपकारधर्माचें रहस्य आहे! श्री. भीमराव पोतदार या चरमसीमेपर्यंत पोहोंचले आहेत. त्यांनीं आपल्या जीवनात कोणाकोणावर उपकार केले आहेत त्याची नोंद मनोमनीं देखील शिल्लक ठेवणें हें सुद्धा त्यांच्या उपकारशील स्वभावाला मानवत नाहीं. इतके ते या बाबतींत वरच्या पातळीवर गेले आहेत.



प्रकरण एकोणतिसावें

# इन्फ्ल्युएंझांतील जनसेवा

केवळ राजकारणातच गोविंदरावाना रस होता असें नाहीं. समाजसेवेचीहि त्याना हौस होती. अशा सेवेची संधि सर्वांनाच मिळते असे नाहीं. अशी संधि सुदैवानें चालून आली तर त्याचा वेळेवर फायदा घेण्याचेंहि सर्वांनाच सुचतें व साधतें असेहि नाहीं. त्याला पूर्वपुण्याई गाठीं असावी लागते. सन १९१८ सालीं अखिल हिंदुस्थानातील प्रांताप्रांतामध्यें या इन्फ्ल्युएंझा रोगाची साथ फैलावत होती. लक्षावधि लोक या रोगाला बळी पडत होते. बेळगावातहि या रोगानें आपलें थैमान माडलें होतें. हजारों कुटुंबें या मार्थीच्या तडाख्यात सापडलीं होतीं. कांहीं कांहीं कुटुंबामध्यें तर कुटुंबातील सर्व ल्हानथोर अंथरूण धरून होते. त्याना डॉक्टराकडून औषधोपचार करणें आणि वेळेवर त्याच्या पोटात औषध घालणें, त्याची शुश्रूषा करणें, त्याच्या पोटापाण्याचें पाहणें, एक कीं दोन, अशीं अनेक कामें अडून पडलेलीं होतीं. केवळ उपचाराच्या अभावीं हीं माणसें मृत्यूचे क्षण मोजीत पडावींत ही अत्यंत करुण स्थिति पाहून गोविंदरावाचें सामाजिक मन कळवळलें. त्यानीं अशा सर्व रोग्याना औषधोपचार, पोटापाण्याची व्यवस्था आणि शुश्रूषा करणें आपलें आद्य कर्तव्य मानलें आणि आपल्याबरोबरच आपले मित्र व सहकारी यानाहि या लोकसेवेच्या गंगेत पावन होण्याची संधि दिली. ते सर्व या वेळीं याच कामात गुतलेले होते.

डॉक्टर अगर वैद्य याची मदत सर्वच गोरगरिबाना मिळणें जवळजवळ अशक्य होतें. वैद्य मोरेश्वर दत्तात्रय गोडबोले याच्या सल्ल्यानें या रोगावर एक काढा व न्युमोनिया रूट याचा उपयोग करण्याचें गोविंदरावानीं ठरविलें. या काढ्यासाठीं ६।७ जिनस लागत होते. ते सर्व जिनस पुरेशा प्रमाणात मिळवून सर्वांना पुरेल इतका काढा रोज तयार केला जात असे. शहरातील सर्व भागातून शंभरापेक्षा अधिक स्वयंसेवक या सेनेसाठीं संघटित करण्यात आलेले होते. सुमारें सहा घागरी काढा या स्वयंसेवकामार्फत रुग्णाना रोज पोंचविला जात असे. या वेळीं याळगीची सर्वच मंडळी

टिळकवाडीवरील आपल्या बंगल्यात राहात असल्यामुळें त्यांनीं आपलें बेळगावातील कडोलकर गल्लींतील घर केवळ याच कामाकरता मोकळें करून दिलें होतें. त्या ठिकाणीं रोज सकाळीं दहा वाजता सर्व स्वयंसेवक आपापल्या गल्लींतील रोग्यांची हालहवाल देत आणि तयार झालेला काढा व इतर औषधें घेऊन जात. घरातील सर्व लोक आजारी असल्यामुळें, ज्यांच्या घरीं स्वयंपाक करण्यास सुद्धा मनुष्य नव्हतें अशा कुटुंबाना भाकऱ्या पुरवाव्या लागत. भाकऱ्या भाजण्यासाठीं आणि त्या गरजू कुटुंबात पोहोंचविण्यासाठींहि अशीच संघटना उभारण्यात आलेली होती. सध्या कडोलकर गल्लींत जेथें नगरपालिकेचा दवाखाना आहे तेथें पूर्वी धर्मशाळेसारखी खुली निवाऱ्याची पडवी होती. तेथें चुली घालून १५।२० स्त्रिया पहाटेपासून भाकऱ्या भाजण्याच्या कामास लागत असत. अशा प्रकारें गावातील सर्व रोग्याना गोविंदरावाकडून आवश्यक ती मदत म्हणजे औषध, अन्न व भाजीभाकरी पोहोंचवण्यात येई. या सेवेचा फारच चांगला परिणाम झाला. इतर शहराच्या तुलनेनें बेळगावातील मृत्यूचें प्रमाण सरासरी एकपंचमाशापेक्षाहि कमी भरलें. बेळगाव शहरात एक दिवसाची जास्तींत जास्त मृत्युसंख्या तिसापेक्षा अधिक कधींच गेलेली नाहीं.

स्वदेशीच्या चळवळीच्या दिवसात पूर्वी बेळगावात कलेक्टर असलेले आणि गोविंदरावाकडे एक राजकीय चळवळे म्हणून पहाणारे ब्रॅंडन साहेब या वेळीं बेळगाव मध्येंच कमिशनरच्या हुद्यावर होते. गोविंदरावानीं या इन्फ्ल्युएंझाच्या साथीच्या दिवसात चालविलेलें यशस्वी समाजसेवेचें कार्य पाहून त्यांनीं अत्यंत समाधान व्यक्त केलें, इतकेंच नाहीं तर या कामाबद्दल गोविंदरावाचें मन पूर्वक अभिनंदन केलें. पुढें तशा आशयाचें एक पत्रहि त्यांच्याकडून गोविंदरावाना आलें होतें. परकीय सत्ताधाऱ्यामध्यें, काहीं बाबतींत मतभेद असले तरी एक उच्च श्रेणीची गुणग्राहकता होती, याचें प्रत्यंतर या ठिकाणीं निदर्शनास आलें. हें काय गोविंदराव जाति, धर्म, किंबहुना पक्षनिरपेक्ष रीतीनें करीत होते. या लोकसेवेचा उपयोग मध्यमवर्गीयाना व गोरगरिबाना फारच झाला. अर्थातच या सेवेबद्दल जनतेनें व अधिकारवर्गानेंहि गोविंदरावाना धन्यवाद दिले. हें ठीकच झालें. ज्या सहकाऱ्यानीं आणि स्वयंसेवकानी या कामीं मन पूर्वक साह्य केलें त्या थोर श्रमिकानाच ते धन्यवाद आणि तीं अभिनंदनें गोविंदरावानीं अर्पण करून ते मोकळे झाले. गोविंदरावाच्या संघटनाचातुर्याला व त्यांच्या स्वभावधर्माला तें साजणारेंच वर्तन झालें. गुणवतानेंच गुणी जनाची पारख केली तर ती अधिक शोभून दिसते.

देवभक्ति आणि देशभक्ति यात अंतर करण्याचें कारणच नाहीं. आपल्या ध्येयावरील अढळ निष्ठा हेंच या दोन्ही भक्तींतील एकमेव गमक आहे. ईश्वर भक्ताची कसोटी पहात असतो असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. पूर्वी मीं निवेदन केलेलेंच आहे कीं, बेळगावात टिळकांच्या आगमनानिमित्त जेव्हा पहिली प्रचंड मिरवणूक काढण्यात आली होती त्या वेळीं गोविंदरावांच्या पहिल्या मुलाचें उन्मत च

निधन झालें होतें; आणि आता या श्रेष्ठ समाजसेवेच्या वेळींहि गोविंदरावावर एक कौटुंबिक आपत्ति आली. त्यांच्या पत्नी केवळ आठदहा दिवसाच्या आजारानंतर कालवश झाल्या. यानंतरच्या जीवनामध्यें गोविंदराव पूर्वीप्रमाणेंच सर्व प्रकारच्या सार्वजनिक कामामध्यें व चळवळींमध्यें प्रामुख्यानें भाग घेत असलेले दिसले तरी त्यांच्या अंतःकरणाला पत्नीनिधनाचा जबरदस्त आघात झाला होता यांत शंका नाहीं.

अशा प्रकारच्या समाजसेवेच्या निरपेक्ष जीवनाचा जो सहजिक व नैसर्गिक परिणाम गोविंदरावाच्या बाबतींत अनुभवास येत राहिला होता त्याचाहि उल्लेख या ठिकाणीं मला करावासा वाटतो. शाहूमहाराजांच्या प्रोत्साहनानें ब्राह्मण ब्राह्मणेतर चळवळ महाराष्ट्रभर चालू झालेली होती. तिचें लोण बेळगावपर्यंत येऊन पोहोंचलेलें होतें. त्यांत गोविंदराव-गंगाधररावांचे कांहीं जैन व मराठा पुढारी कार्यकर्ते भाग घेऊं लागले होते. कॉंग्रेस व तिचे पुढारी लो. टिळक यांच्याविरुद्ध प्रचारसभा घेऊन ते जाहीर भाषणें करीत. 'ही सर्व ब्राह्मणमंडळी आहेत. यांच्या नादाला लागण्यानें आपल्या जैन व मराठा समाजाचें हित कधींहि होणार नाहीं. आपण त्यांच्या चळवळीपासून व कार्यापासून लांब राहिले पाहिजे' अशीं जातिविद्वेषक भाषणें ते करीत असत. कॉंग्रेसच्या सभा उधळून लावण्याचेहि प्रयत्न होऊं लागले होते. व्यासपीठावरील त्यांचीं भाषणें कितीहि विषारी व दिशाभूल करणारीं असलीं तरी गंगाधरराव गोविंदरावांच्या ब्राह्मणेतर पक्षाच्या पुढाऱ्यांशीं असलेल्या खाजगी स्नेहसंबंधास त्यामुळें कधींहि बाध आलेला नाहीं. बेळगावातील पक्षोपपक्षामधील चुरस या दोघांचे विशिष्ट मर्यादेच्या बाहेर कधीं गेले नाहींत याचें कारण मुख्यतः या दोघा पुढाऱ्यांच्या वृत्तींतील दिलदारपणाच होय असे म्हटल्यावाचून राहवत नाहीं.

इन्फ्ल्युएंझाच्या साथीच्या वेळचीच एक आख्यायिका येथें देण्यासारखी आहे. ब्रँडनसाहेब जेव्हां समाजसेवेचें काम पहाण्यास आले होते त्या वेळीं त्यांचा एका कार्यकर्त्याशीं पुढील गमतीदार संवाद झाला.—

"आपण रोग्यांना कोणतें औषध देतां? उपचार काय करतां?" ब्रँडननें चौकशी केली. "आम्ही हा काढा रोग्यांना देतों व नंतर त्यांच्या छातीला थोडासा शेक देतों." कार्यकर्त्यानें माहिती दिली. त्या कार्यकर्त्यांचें इंग्रजीचें ज्ञान बेताचेंच होतें. औषध व काढा दिल्यानंतर छाती शेकण्याचा उपचारहि केला जातो असे त्यांना सांगावयाचें होतें, पण तो कार्यकर्ता आपल्या मोडक्यातोडक्या इंग्रजींत दडपून म्हणाला, कीं, "We give this medicine i e. kadha and then shake the breast for some time " हें वाक्य ऐकून ब्रँडनसाहेब बुचकळ्यांत पडले. त्यांना या उपचाराचा अर्थच आकलन होईना. मग इंग्रजी भाषेचें ज्ञान असलेल्या दुसऱ्या कार्यकर्त्यानें तें साहेबांना विशद करून सांगितलें. मराठींतील 'शेक' शब्द इंग्रजींत तसाच वापरण्यानें झालेला घोटाळा दूर केला तेव्हां थोडी खसखस पिकल्याशिवाय राहिली नाहीं.

प्रकरण तिसावें

# गुरुराव मोकाशींच्या खुनाचे गुन्हेगार शोधून काढले

गुरुराव मोकाशी या नावाचे गृहस्थ सोलापूर येथें हुजूर डेप्युटीच्या हुद्यावर सरकारी अधिकारी होते. त्याच्या कांहीं प्रमादाबद्दल त्यांनीं खालच्या प्रतीच्या हुद्यावर तरी जावें किंवा नोकरीची मुदत भरण्यापूर्वीच त्यांनीं पेन्शन घेऊन कामावरुन दूर तरी व्हावें असा सरकारी हुकूम झाला होता. अर्थात् मोकाशी यानीं अकालीं पेन्शन—मग ती थोडी कमी मिळणार हें उघड होतें तरी—घेऊन नोकरीवरुन दूर होण्याचें पसंत केलें होतें. त्याच्याजवळ डागडागिने व रोख रक्कमहि बरीच होती ही गोष्ट त्याच्या घरीं काम करावयास येणाऱ्या नोकरचाकराना माहीत झालेली होती. त्याच्या चिरंजिवाशीं म्हणजे श्री रामराव मोकाशी याच्याशीं गंगाधररावाच्या ज्येष्ठ कन्येचा विवाह झालेला होता. गंगाधररावाचे व्याही श्री. गुरुराव मोकाशी याच्या घरीं सन १९१८ सालीं चोरी झाली व त्यात चोरानीं त्याचा खून केला होता. त्या वेळीं गंगाधरराव मुंबईमध्यें होते. त्याची ज्येष्ठ कन्या व जामात त्याच्या हुदली नावाच्या खेड्यात होते. चोरीच्या दिवशीं गुरुराव एकटेच आपल्या घरीं होते. सायंकाळींच सहा चोर त्याच्या घरात शिरुन त्याच्या घरामागील भागाच्या माडीवर ते लपून बसले होते. गुरुरावाना हे माहीत नव्हतें. रात्रीं सर्वत्र सामसूम झाल्यावर चोरट्यानीं गुरुरावाचा गळा दाबून खून केला. त्या वेळीं ते ओरडले, किंचाळले होते. शेजारच्या घरांतील मंडळींनीं तो आवाजहि ऐकला होता. परंतु पुढें तेथें कांहीच गडबड झाल्याचा किंवा इतर गोंधळ उडाल्याचा कसलाच आवाज त्या घरातून बाहेर न आल्यामुळें शेजाऱ्याना कसलीच पुनः शंकाहि आली नाहीं आणि कोणी उठून बाहेरहि आलें नाहीं.

चोरानीं त्याचा खून केल्यानंतर तेथे घरीं असलेल्या सर्व सामानाचा उपयोग करून मनसोक्त भोजन केल्याचें पचनीं पडलें होतें. खरोखरी माहीतगाराचेंच टाकलेलें दुसऱ्या दिवशीं झालेल्या पंचनाम्यामध्यें दिसून आल्यामुळें ही गोष्ट उघड झालेली होती.

गुरुराव मोकाशींचें प्रेत माडीच्या शेवटच्या पायरीवर त्या प्रेताच्या पायात धोतर अडकून पाडलेलें होतें. माडीवरून खाली येत असताना पायात धोतर अडकून ते पडले व त्या अपघातात मरण ओढवले आहे, असा पुरावा बनविण्याची ही योजना चोरानीं आपल्या बुद्धीप्रमाणें केली होती. या चोरीमध्यें आठ दहा हजाराचे दागदागिने व २५-३० हजाराच्या नोटा चोरीला गेल्या होत्या. रीतसर पचनामा फिर्यादी वगैरे विधी सुरू झाले. पोलिसाचा तपास सुरू झाला. खून होऊन आठ, पधरा दिवस झाले तरी पोलिसाना या खुनाचा काहींच सुगावा लावता आलेला नव्हता. या पोलीस तपासात अधिक काळ घालविणें म्हणजे चोराना माल व रोकड याची विल्हेवाट लावण्यास सवड देणें आहे, हें जाणून गगाधररावानीं गोविंदरावाना यात थोडें लक्ष घालण्यास सागितलें.

गोविंदरावानीं आपले गण म्हणजे आपले सी. आय. डी. धारवाडला रवाना केले. आपण स्वत देखील अनेकदा धारवाडास जाऊन आले. गोविंदरावाच्या लोकामध्यें बाबू सोनार या नावाच्या मनुष्यानें धारवाडला गल्यानतर गोविंदरावाच्या मार्गदर्शनाखालीं आठदहा दिवसातच या खुनातील गुन्हेगाराचा शोध लावला. गुरुराव मोकाशी याच्या घरीं नेहमीं कामाला येणारा एक गवडी वमवाणी, एक सुतार अर्जुन, आणि एक माळी ईराप्पा, त्याचे तीन साथीदार या लोकानीं ही चोरी व हा खून केला होता. गोविंदरावानीं ही हकीकत धारवाडच्या वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्याना समक्ष भेटून सागितली व सावधगिरीने मुद्देमालासह गुन्हेगाराना अटक करविली. त्याच्याजवळ ८-१० हजाराचे दागिने मिळाले. रोकड व नोटा मात्र गडप झाल्या त्यांचा पत्ता लागू शकला नाहीं.

सुताराच्या घरीं चाळीस तोळ्याचा सोन्याचा गोफ, भिंत पोखरून त्यात ठेवला होता. भिंत पूर्वीसारखी बाधून व लिपून घेतलेली होती. तेवढीच जागा लिपल्या ऐवजीं सबध घरच पुन थापून गिलावा केला होता काहीं दागिने अस्ताव्यस्त पडलेल्या लाकडामध्यें टाकलेले होते. यात दुसरा एक साथीदार हनुमत सुतार काहीं गोड्याच्या चौदाव्या रत्नाच्या उपायानें कबूल झाला होता. गुरुराव मोकाशी तिजोरीची लाब व जाड किल्ली आपल्या जानव्यामध्यें बाधूनच नेहमीं वावरत असत त्याचा खून झाल्यानतर ती किल्ली काढून घेऊनच चोरट्यानीं तिजोरीमधून दागदागिने व रोकड आणि नोटा लाबविल्या होत्या.

दारूच्या गुत्त्यामध्ये दारू पिऊन नशेत एकमेकाच्या चाललेल्या गप्पागोष्टींतून सदर गुन्हा उघडकीस आला होता. बाबू सोनारानें त्या लोकाचा विश्वास सपादन केला होता. बाबू आपल्या पदरचे पैसे खर्च करून, त्याना खूप दारू पाजत असे. ते धुद झाले कीं त्याच्याकडून सर्व माहिती काढून घत असे. अशा तऱ्हेच्या गुन्हेगाराच्या मोक्याच्या जागा धारवाड पोलिसाना माहीत नव्हत्या, असें थोडेंच आहे. परतु

'जिसका फाटे व जिसका टूटे' अशा बेफिकीर वृत्तीनें जेवढें साधता येईल तेवढें साधावयाचें अशी पोलीसखात्याची वृत्ति असल्या कामीं यावें तितकें लक्ष देत नाहीं. आणि थोरामोठ्याचे खटले सुद्धा दिवसगत करून जिरून जातात हा अनेक ठिकाणचा अनुभव आहे. गोविंदरावांनीं स्वतः या प्रकरणीं मन घातल्यानें गुन्हेगाराचा पत्ता लागू शकला. आठदहा हजाराचे दागिने तरी हातीं आले आणि गुन्हेगाराना शिक्षाहि झाली एवढी त्यात समाधान मानून घेण्याला जागा होती.

गुन्हेगारांच्या वतीनें काम चालविणाऱ्या वकिलानें कोर्टापुढें अशी एक कथा उभी करण्याचा प्रयत्न केला होता कीं, गुरुराव मोकाशी व त्याचे चिरंजीव रामराव मोकाशी यांचें मनोमनीं नीट नव्हतें, एकमेकाशीं पटत नव्हतें आणि ही गोष्ट सर्वांना माहीत होती. या चिरंजिवानेंच आपल्या बापाचा खून करून सदर माल म्हणजे दागदागिने गुन्हेगाराकडे ठेवावयास दिले होते. पण हा बनाव कोर्टांत टिकू शकला नाहीं. उलटतपासणीमध्यें गुन्हेगारानीं सर्व कबूल केलें. कोर्टानें तीन गुन्हेगाराना फाशीची शिक्षा आणि तिघाना जन्मठेपेची शिक्षा दिली.

एखादी गोष्ट करावयाची असा निश्चय गोविंदरावाच्या मनाचा झाला म्हणजे मग शेंडी तुटो कीं पारबी तुटो, कशाचीच पर्वा करावयाची नाहीं असा त्याचा खाक्या होता. हा त्याचा स्वभाव या प्रकरणातहि सर्वांच्या अनुभवास आला व त्याचा यशस्वी हात येथेंहि फलदायीच ठरला आहे.



प्रकरण एकतिसावें

# भारतीय मराठा परिषद, बेळगांव

त्या दिवसात ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळ जोरात आली होती. खुद्द शाहूमहाराजांनी त्यात लक्ष घातल्यामुळें नागपूरपासून बेळगावपर्यंत त्या चळवळीला उधाण आलें होतें. जातवार प्रतिनिधित्व मागण्याच्या कल्पनेचा प्रचार ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनी चालविला होता. त्याला आळा घालण्यासाठीं बेळगावात 'अखिल भारतीय मराठा परिषद' येथील ब्राह्मणेतर समाजाकडून बोलाविण्यात आलेली होती. सदर परिषदेमध्यें काम करणाऱ्यामध्यें प्रस्तुत लेखकहि स्वयंसेवक म्हणून होता. अमरावतीचे तरुण बॅरिस्टर श्री रामराव देशमुख त्या परिषदेचे अध्यक्ष होते. श्री. बाळकृष्णपत लाड वगैरे बेळगावच्या मराठा पुढाऱ्यांनीं ती परिषद यशस्वी करून दाखविली व बेळगावांतील 'मराठा जनतेला' ब्राह्मणेतर चळवळ आणि जातवार प्रतिनिधित्व पसत नसल्याचें सिद्ध करून दिलें. या परिषदेच्या अथपासून इतिपर्यंतच्या उलाढालीमध्यें गोविंदरावांनीं खूपच मेहनत घेतली होती.

या परिषदेस अध्यक्ष म्हणून मद्रासकडील एखादा ब्राह्मणेतर पुढारी मिळनता आल्यास पहावा अशी खटपट प्रथम झाली होती, पण त्यात यश आलें नाहीं. शेवटीं वीर वामनराव जोशी व गगाधरराव यांनीं मिळून वऱ्हाडच्या बॅ. देशमुखांची अध्यक्ष म्हणून योजना केली त्या वेळीं ते नुकतेच राजकारणात पडले होते. अध्यक्ष या नात्यानें बेळगावास ते आले तेव्हा त्यांची मिरवणूक स्टेशनपासूनच मोटारींतून काढण्यात आली होती. प्रस्तुत लेखक स्वयंसेवक म्हणून त्यांच्या मोटारीच्या पायरीवरून जयजयकाराच्या घोषणा देत होता. मोटारीमध्यें बॅ. देशमुख यांच्याबरोबर परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री अ. ना. सावत हेहि बसले होते. वाटेमध्यें अध्यक्षाशीं काहीतरी चार शब्द बोलावे म्हणून स्वागताध्यक्ष श्री सावत म्हणाले, "आपण आलात फारच उत्तम झालें. आम्हीं प्रथम मद्रासकडील व इतर ठिकाणचे कोणी ब्राह्मणेतर अध्यक्ष मिळू शकतील किंवा कसे याची पुष्कळच खटपट करून पाहिली, पण चोहींकडून आमची

प्रकरण बत्तिसावें

# महायुद्धानंतरची मंदीची लाट

पहिलें महायुद्ध संपलें आणि देशामध्यें व्यापारात मंदीची जोराची लाट येण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. हिंदुस्थान सरकार आपल्याजवळचें सोनें 'टेंडरपद्धती'नें विकूं लागलें होतें. ही पद्धति अशी होती : 'कमींत कमी एक हजार तोळे सोनें टेंडर म्हणजे मागणी करायचें. त्याची जी किंमत होईल त्याच्या दशांश रकमेची हुंडी सोबत ठेवायची. नंतर तें मागणीपत्र बँकेकडे पाठवावयाचें. दर आठवड्यास एकदां, ठराविक तोळे सोनेविक्रीचीं तीं मागणीपत्रें पाहून त्यांतून प्रथम जास्त दराचीं, नंतर त्यापेक्षा कमी दराचीं, असें करीत करीत ठराविक साठा संपेपर्यंत तीं मंजूर करावयाचीं व बाकीचीं नामंजूर म्हणून परत करावयाचीं. हा क्रम सहा महिने चालला होता. त्यामुळें सोन्याचा बाजारभाव स्थिर राहणें शक्य नव्हतें. एकदां तर सर्वांत कमी दराचें म्हणजे रु. १६ चें मागणीपत्रहि मंजूर झालें होतें. ही टेंडरपद्धति म्हणजे व्यापाऱ्याचा एक प्रकारचा सट्टयाचा खेळच होता.

गोविंदरावांच्या पुण्यामुंबईच्या कांहीं स्नेह्यांनीं या कामांत पडावयाचें ठरविलें व त्यांनीं गोविंदरावांना मुंबईस बोलावून घेतलें. या कामासाठीं भरपूर भांडवलाची आवश्यकता होती. चारपांच मंडळींनीं मिळून एक हजार तोळे सोन्याचें टेंडर प्रत्येक वेळीं घालावयाचें ठरविलें. एखादे वेळीं बाजारभावापेक्षा एकदोन रुपये कमी भावाचें मागणीपत्रहि मंजूर होत असे. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें या कामींहि गोविंदरावांनीं लक्ष घातलें. सोनेंबाजारांतील दलालाच्या मार्फत एका बड्या व्यापाऱ्याशीं सूतहि जुळविण्यांत आलें. त्यामुळें त्यांना या मागणीपत्रासंबंधीं सर्व अभ्यास करतां आला. सरकारनें जाहीर केलेली विक्री, त्यासाठीं आलेल्या मागण्या, त्यांतील नामंजूर किती व मंजूर किती त्यांची आणेवारी, या सर्व गोष्टींचा विचार करूनच पुढील मागणीपत्र भरावयाचें असतें. एखादे वेळीं मागणी मंजूर झालीच तर तातडीनें पैशाची व्यवस्था करून बँकेतून सोनें आणावयाचें. अशा वेळीं गोविंदरावांचे अडते 'लालचंद सदाजी' यांच्या

पेढीचा उपयोग करून घेण्यात येत असे. मुंबईची राहणी, मोठा मित्रपरिवार व खर्चिक स्वभाव या सर्व गोष्टींचा जो परिणाम व्हावयाचा तोच झाला. एकदोन वेळा या असल्या व्यवहारात चांगला नफा झाला. पण पुढे कांहीं प्रसंगीं बाजारभावापेक्षा जास्त भावाचीं मागणीपत्रेंहि मंजूर झालीं. आणि व्यवहार नुकसानींत आला. त्या नुकसानीचा सर्व बोजा गोविंदरावावरच पडू लागला. ज्या स्नेह्यानीं त्याना मुंबईस बोलावून नेलें होतें ते मात्र हळूहळू या व्यवहारातून निसटले.

सन १९१९ च्या ऑक्टोबर नोव्हेंबर महिन्यात या सर्व व्यवहाराची इतिश्री झाली. सर्व हिशोब करून पहाता या व्यवहाराशीं मुंबईच्या अडत्याकडून गोविंदरावाच्या नांवें चोवीस तें पंचवीस हजार रुपये खर्च पडल्याचें दिसून आलें. ज्या वेळीं नफा झाला होता त्या वेळीं कुत्र स्नेह्यानीं आपला पैसा उचलला म्हणजे काढून घेतला होता. त्यामुळें यापुढील खर्च व नुकसानीची सर्व जबाबदारी गोविंदरावावरच येऊन पडली. आपलें धैर्य कधींहि खचू न देणारे गोविंदराव या प्रसंगीं गडबडले, बेचैन झाले होते. त्यातच काहीं स्नेह्यानीं त्याना पुन: लग्न करून घेण्याचा आग्रह चालविला होता. अशा चोहींकडून कोंडींत अडकलेल्या अवस्थेंत त्याची मन स्थिति अत्यंत केविलवाणी झालेली होती.

आपल्या जीवनात गोविंदरावानीं राजकारणाला प्रथम स्थान दिलें होतें. लोकमान्य सन १९१६ सालीं कॉंग्रेसमध्यें गेल्यापासून आपल्या मित्रमंडळीसह ते एकाहि कॉंग्रेसला गेल्याशिवाय राहिले नाहींत. या वेळीं तर अमृतसर कॉंग्रेसच्या अधिवेशनात टिळक Responsive Cooperation म्हणजे प्रतिसहकाराचा ठराव मांडणार होते. जालीयनवाला बागेतील अमानुष कत्तलीसबधानेंहि ठराव येणार होता. गांधी–टिळकाचा घनिष्ट संबधहि या वेळींच जडणार होता. अशा वेळीं मोठ्या उत्साहानें इतर स्नेह्यासह पंजाबला जाण्याची संधि गोविंदरावानीं मुळींच गमावली नसती. परंतु प्रतिकूल परिस्थितीनें त्याना इतकें जखडून टाकलें होतें कीं, त्यामुळें ते कॉंग्रेस अधिवेशनाला उपस्थित राहू शकले नाहींत. एकदोन महिनेच त्याना या परिस्थितीचा जाच सहन करावा लागला. पण नंतर त्याचा मूळ स्वभाव जागा झाला व उफाळून आला. तो त्याना स्वस्थ बसू देईना. झाल्या गेल्या गोष्टींवर पडदा टाकून अडत्याचा हिशोब त्यानीं नक्की केला. त्याचें सर्व देणें वारून टाकण्याच्या उद्योगालाहि गोविंदराव लागले. जी स्नेहमंडळी भागीदार होती त्यापैकीं काहींनीं आता आपल्या कानावर हात ठेवले. 'आम्हीं यापूर्वींच आपला संबध सोडलेला असून आता या नुकसानीची जबाबदारी आमच्यावर येत नाहीं' असे साफ सांगून टाकलें, तर दुसऱ्या काहींनीं देणें कबूल केलें, पण त्याच्याकडे पैसेच नव्हते अशा परिस्थितींत नुकसानीची भरपायी करून देण्याची जोखीम परिणामत गोविंदरावावरच आली. गोविंदरावानींहि तें नुकसान बिनतकार सहन केलें व भरून टाकलें.

प्रकरण तेहतिसावें (१)

# सन १९२० सालची जिल्हा परिषद

लो. टिळक इंग्लंडहून सन १९१९ मध्यें हिंदुस्थानात परत आले. त्याच्या स्वागता करता गंगाधरराव मुद्दाम मुंबईस गेले होते. त्याच्या आगमनाच्या दिवशींच शांतारामाच्या चाळीमध्यें जंगी जाहीर सभा होऊन टिळकाना मानपत्र देण्यात आलें. तें मानपत्र वाचण्याचा मान गंगाधररावानाच मिळालेला होता. त्या मानपत्राला उत्तर देताना 'मॉटेग्यू साहेबाच्या बिलामुळें जें थोडेंबहुत मिळेल तें स्वीकारून बाकीचें मिळविण्याचा प्रयत्न करीत राहणें हेंच शहाणपणाचे आहे,' असे आपल्या राजकारणाचे पुढील घोरण लो. टिळकानीं जाहीर केलें होतें.

विलायतेहून परत आल्यानंतर टिळक मद्रासला गेले. त्याच्याबरोबर त्या वेळीं गंगाधरराव होते. पण वेझंटबाई त्या वेळीं मद्रास येथे नव्हत्या. तेथें जाहीर भाषणातून व खाजगी संभाषणातून लोकमान्यानीं आपलें मत व्यक्त केलें कीं, 'मिळणाऱ्या सुधारणा कितीहि अपुऱ्या असल्या तरी त्या स्वीकारून राबविणें हेंच या वेळीं मुत्सद्देगिरीचें ठरणारें आहे.' '*हिंदू*' पत्राचे संपादक श्री. कस्तुरीरंग अय्यंगार यानीं टिळकाना एक मेजवानी दिली होती. त्या वेळीं राजगोपालाचार्यादि कांहीं प्रमुख मंडळी उपस्थित होती. जेवणानंतर राजकारणावर बरीच चर्चा झाली. तेथील तीन दिवसाच्या मुक्कामात टिळकानीं आपल्या मताचा भरपूर प्रचार केला. मद्रासमध्यें महाराष्ट्रीय मंडळीहि बरीच आहेत. त्यानीं टिळकाचा तेथ गौरव केला. तेथेंहि त्यानीं आपलीं मतें ठामपणे माडली होतीं.

टिळकानीं आपल्या पक्षातील मंडळींसह विचारविनिमय करीत असताना आपलें हेंच धोरण सर्वांना पटवून देण्याचा प्रयत्न केला होता. सरकारनें जाहीर केलेल्या सुधारणा स्वीकारून त्याचा जास्तींत जास्त उपयोग करून घ्यावा आणि त्या दृष्टीनें आगामी निवडणुकी लढवाव्या हा टिळकाच्या विचाराचा राजकीय हेतु होता. म्हणून स्वतः टिळक, बॅ. बॅप्टिस्टा, गंगाधरराव वगैरे मंडळींचीं नावेंहि निवडणुकींतील

असले प्रसंग कित्येक आढळतात. गोविंदरावांच्या मनाचा निश्चय झाल्याबरोबर त्यांच्या उलट जाण्याचें वा वागण्याचें कोणाच्याहि मनांत येत नसे. त्याच्या विचाराला अनुकूल असेंच वातावरण यदृच्छया तयार होत असे. मार्गांतील ढग बाजूला होऊन सर्व वातावरण आपोआप निवळत असे. त्याचप्रमाणें आतांहि झालें. लो. टिळकांची मोटरगाडी दृष्टिपथांत आली. आपल्यासाठीं अर्धा तास मेलगाडी थांबल्याचें व आपणास उशीरा का होईना मेल गांठतां आली याचा टिळकांना अत्यंत आनंद झाला. त्यांनीं त्याच आनंदभरानें सर्वांचा निरोप घेतला आणि मगच गाडी सुरू झाली.

बेळगांवांतील हा लोकमान्यांचा शेवटचाच दौरा किंवा प्रवास ठरला. लोकमान्यांच्या नवीन धोरणाचा प्रचार व लोकजागृति या दृष्टीनें ही मकेश्वरची जिल्हा परिषद अत्यंत यशस्वी ठरली व तिचा बेळगाव जिल्ह्याला फारच उपयोग झाला. या जिल्हा परिषदेनंतर सोलापूरची इलाखा परिषदहि अशीच गाजली. तिची हकीकत आतां पुढील प्रकरणीं पाहूं.



प्रकरण तेहतिसावें (२)

# सोलापूरची मुंबई इलाखा राजकीय परिषद

[सन १९२०]

लोकमान्याच्या नवीन धोरणाचा पुरस्कार करण्याच्या हेतूनेंच सोलापूर येथें 'मुंबई इलाखा राजकीय परिषद' बोलाविण्यात आली होती. अध्यक्षस्थानीं श्री न चिं. केळकर तथा तात्यासाहेब याची निवड झाली होती. मुंबई इलाख्यातील राजकीय परिस्थितीचें आकलन गोविंदरावाना यथार्थ असल्यामुळें या परिषदेला बेळगाव जिल्ह्यातून अधिकाधिक सख्येनें प्रतिनिधि घेऊन जाण्याचा निश्चय गोविंदरावानीं केला होता. बेळगाव जिल्हाभर तशी सघटनाहि करेली होती.

मुंबई इलाख्यातील मवाळ अथवा नेमस्त अग्रणींनीं या परिषदेंत गोंधळ घालण्याचें ठरविले होत. पण लो. टिळकाना विरोध करू शकेल अशा तोलाचा पुढारी त्याना मिळू शकला नव्हता. नेमस्ताची ही अडचण बॅझटाई पुढे झाल्यामुळें दूर झाली होती. दोन्ही पक्षाचें बलाबल या परिषदेंत निदर्शनास यावयाचें होतें नेमस्तानीं दगडफेक करून देखील ही परिषद उधळून लावण्यापर्यंत जाण्याचें ठरविलें होतें. परतु परिषदेमध्यें घुसण्याच्या त्याच्या प्रयत्नाला स्वयसेवकानींच रोखून धरल्यामुळें, त्याचा पहिला बार साफ फुकला होता.

अनुकूल-प्रतिकूल कोणत्याहि पक्षाच्या वक्त्यानीं व्यक्तिश कोणाच्याहि नावाचा उल्लेख करावयाचा नाहीं असा आदेश अध्यक्षानीं दिला होता. वक्त्यामध्यें डॉ सावरकर, गगाधरराव आदींचीं नावें होतीं. गगाधररावाच्या तोंडून रँ. परांजपे याच्या नावाचा उल्लेख अनवधानानें होऊन गला. परतु अध्यक्षाचा आदेश त्यानीं मोडला अशी भावना नेमस्ताच्या व इतर श्रोतृसमुदायाच्या मनात येण्यापूर्वीच गगाधररावानीं त्या त्याच्या नामोच्चाराला एक प्रकारच्या गौरवाचें रूप देऊन, आदेशभगाचा दोप आपल्यावर येऊ दिला नाहीं. या त्याच्या कौशल्यासाठीं श्रोतृसमुदाया कडून त्यानीं टाळ्याचा वर्षाव करून घेतला. नेमस्तानाहि काहीं आक्षेप घता आला नाहीं. डॉ. सावरकर यानीं आपल्या भापणात 'बापासि बाप न म्हणे ऐशासी

काय होय आजोना!' या मोरोपंताच्या आर्येचा केलेला उल्लेख पुष्कळच गाजला होता.

या परिषदेमध्यें मुख्य ठरावावर मतें घेण्यात आलीं. आणि टिळकांचा ठराव प्रचंड बहुमतानें मंजूर झाला. त्या वेळीं नेमस्तांनीं कोणत्या पक्षाला किती मते मिळालीं असतील याबद्दलचा आपला अंदाज परिषदेच्या अध्यक्षांनी जाहीर करावा अशी मागणी केली. 'हा अधिकार अध्यक्षाला नाहीं; असा अंदाज अध्यक्षांनीं जाहीर करू नये' असे लो. टिळक म्हणतात न म्हणतात तोंच 'अध्यक्षांनीं आपला अंदाज व्यक्त करण्यास अध्यक्षाला हक्क असून तो कोणींहि हिरावून घेऊ शकत नाहीं, असे स्पष्ट सांगून राष्ट्रीय पक्षाला २/३ मत व नेमस्तांना १/३ मतें पडलीं असावींत असा आपला अंदाज त्यांनीं जाहीरहि करून टाकला. ही गोष्ट टिळकांना रुचली नाहीं. याबद्दल नेमस्त पक्ष आणि टिळकपक्षातीलहि काहींनीं तात्यासाहेब केळकर यांच्या नि पक्षपातीपणाची व धैर्याची वाहवा केली. प्रस्तुत लेखक त्या परिषदेस हजर असल्याने त्यानें हा प्रकार पाहिला व ऐकिला आहे.

या परिषदेसाठीं गोविंदराव व त्यांची कित्येक स्नेहीमंडळी बेळगावहून सोला पूरला गेली होती. बेळगावहून पुण्यापर्यंत रेल्वेचे तीनचार डबे सरक्षित (रिझर्व्ह) केले होते. या सर्व मंडळींनीं पुण्याहून सोलापुरापर्यंत टिळकांच्या गाडीमधूनच प्रवास केला होता. दिवसाची वेळ असल्यामुळें कित्येक स्टेशनावर लोकमान्यांच्या डब्यांत, त्यांच्यासाठीं फळांच्या करड्या, सुकामेवा वगैरे पदार्थ येत असत. पुण्याच्या मंडळींनीं त्यांचा साठा आपल्या डब्यामध्यें केलेला होता, ही गोष्ट गोविंदरावांच्या ध्यानीं येताच, त्यांनीं एका मोठ्या स्टेशनावर आपल्या काहीं सहकाऱ्यांनिशीं पुणेकरांनी केलेल्या त्या साठ्यावर हल्ला करून त्यातील करड्या प्रत्येक डब्यातील सव सहप्रतिनिधींना पोहोंचविल्या. गोविंदरावांच्या प्रेमळ धूर्तपणामुळें लोकमान्यांच्या या प्रसादाचा आस्वाद सर्वांना घेता आला. आपल्या उभ्या हयातींत स्वत साठीं गोविंदरावांनीं काहींच केलेल नाहीं.

गोविंदरावांनीं या परिषदेसाठीं केलेली पूर्वतयारी आणि आपल्याबरोबर आणलेल्या प्रतिनिधींची सख्या पाहून राष्ट्रीय पक्षाच्या सर्वच मंडळींना गोविंदरावांचा दर्जा व अत करण यांचें साहजिकपणेंच दर्शन झाले.

**परिषदेचे प्रवाह व उपप्रवाह :** होमरूलच्या चळवळीच्या वेळीं बेझट बाईंचे व राष्ट्रीय पक्षाचे बरेच सूत जुळलें होतें, तथापि साक्ष देण्याकरिता दिल्ली कॉंग्रेसमध्यें बेझटबाईंना कॉंग्रेसतर्फे निवडण्यात आलें नाहीं म्हणून व इतरहि काहीं कारणाने बाईंची मर्जी राष्ट्रीय पक्षावर खप्पा झाली होती त्यांनीं नेमस्त पक्षाशीं हातमिळवणी करून राष्ट्रीय पक्षाशीं विरोध मांडला होता. त्याचा फायदा नेमस्तांना झाला. बाईंनीं स्वत. सोलापूरला हजर राहून आपल्या अनुयायांनिशीं नेमस्तांना मदत

करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें त्या सोलापुराला येऊन दाखलहि झाल्या. राष्ट्रीय पक्षातर्फेहि जय्यत तयारी झाली होती. बेळगाव जिल्ह्यांतून राष्ट्रीय पक्षाला अनुकूल असलेल्या ब्राह्मणेतर पुढाऱ्यांना गोविंदरावांनीं बरोबर आणलेले होतेंच. सोलापूरला रोज रात्रीं परिषदेच्या दिवसांत जाहीर सभा भरवून राष्ट्रीय पक्षातर्फे त्याचीं व्याख्यानें होत असत. व्याख्यात्यांमध्यें गंगाधररावांचेंहि नांव होतें. स्वतः टिळकांनींहि तेव्हां भाषणें केलीं होतीं. असे हें राष्ट्रीय विचाराचें प्रचारसत्र गोविंदरावांनीं तेथेंहि चालू ठेवलें होतें.

या परिषदेंत अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर यांनीं आपलें इंग्रजी भाषण वाचून दाखविलें व नंतर त्याचें मराठी भाषांतर गंगाधररावांनीं वाचून दाखविलें. सुधारणासंबंधीं अमृतसरच्या कॉंग्रेसनें मंजूर केलेला ठराव या सालापूरच्या परिषदेंत पास करून घेण्याची राष्ट्रीय पक्षाची इच्छा व प्रयत्न होता. त्याच्याविरुद्ध कलकत्याच्या नेमस्त परिषदेनें मंजूर केलेला ठराव या परिषदेत मान्य करून घेण्याची खटपट नेमस्ताची होती. यामुळे या परिषदत राजकीय मतप्रचाराची चढाओढ एकसारखी चालू होती. परिषदेचे हे प्रवाह व उपप्रवाह होते.



प्रकरण चौतिसावें

# लोकमान्यांचें महानिर्याण आणि गोविंदरावांची प्रतिज्ञा

सोलापूरच्या मुंबई इलाखा परिषदेसाठीं बेळगांवहून जेव्हां प्रतिनिधि निघाले तेव्हां चिक्कोडी स्टेशनवर बेळगांवचे मुन्सफ श्री. काशीनाथराव कुलकर्णी यानीं गंगाधररावांना स्पष्ट शब्दांत सांगितलें होतें कीं, "टिळकांचें आयुष्य संपत आलेलें आहे." कांहीं करावयाचें असल्यास तें आताच लौकर करून घ्या' असें त्यांना सांगा. त्यांच्या मृत्यूची तारीख एक ऑगस्टच्या मध्यारात्रीच्या सुमारास आहे." गंगाधररावांचा ज्योतिषावर विश्वास नसल्यामुळें त्यांनीं त्याकडे लक्ष दिलें नाहीं. परंतु टिळकांच्या शेवटच्या आजारांत गंगाधरराव त्यांच्याजवळ असल्यामुळें त्याना श्री. काशीनाथपंत कुलकर्णी यानीं सांगितलेल्या भविष्याचें स्मरण झालें. त्यांनी सांगितलेलीं इतर भविष्यें भलींहि खोटीं आलेलीं असोत, पण टिळकांच्या मृत्यूचें त्यानीं वर्तविलेलें भविष्य मात्र अगदीं तंतोतंत खरें झालेलें आहे.

कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पार्टी स्थापन करून निवडणुकी लढवाव्यात हा विचार चालू असतांना टिळकांनीं निवडणुकीस उभें राहावें असा विचार त्यांची सर्व सहकारी मंडळी करीत होती. टिळकांचा मृत्यु किती जवळ आला आहे याची त्यापैकीं कोणासहि कल्पना नव्हती. कोणीं ती आणून देण्याचा प्रयत्न केल्यास त्याकडे दुर्लक्ष करण्यासहि कोणीं कमी केलें नसतें.

शहापूरच्या मुन्सफ कोर्टांत गंगाधरराव काम चालवीत असतांना श्री. बाबूराव गोखले यांची मुंबईहून त्यांना तार आली. 'टिळकांची प्रकृति अत्यंत बिघडली असल्यानें तावडतोब मुंबईस निघून या' असा तींत मजकूर होता. पुढें थोड्याच वेळांत गोविंदरावांचीहि मुंबईहून त्याच अर्थाची तार आली. गोविंदराव त्या वेळीं व्यापारानिमित्त मुंबईसच होते. गंगाधररावांच्या अशिलाची भक्तिहि टिळकांवर असल्यामुळें त्यांनीं गंगाधररावांना मुंबईस जाण्याची अनुमति दिली. पण त्या दिवशींची मेलगाडी त्याना न मिळूं शकल्यामुळें गंगाधरराव दुसऱ्या दिवशीं सकाळीं

मुंबईस निघाले. मिरज स्टेशनवर समजलें की, टिळकाची प्रकृति अतिशयच बिघडली आहे. पुण्याच्या स्टेशनवरहि तशाच बातम्या ऐकाव्या लागल्या. मुंबईहून बाहेरगावी ज्या तारा केल्या जात त्याचा संबंध ज्या ज्या तार ऑफिसशीं येत असे तेथें तेथें टिळकांच्या प्रकृतीची बातमी ओघानेंच कळत असे. आमजनतेचें लक्ष टिळकांच्या प्रकृतीकडे लागून राहिलेलें होतें. सकाळीं मुंबईस पोहोंचल्यानंतर गंगाधरराव 'सरदार-गृहात' गेले. तेथे सर्वच मंडळी भेटली. टिळकांनीं गंगाधररावांना ओळखलें. केव्हां आलात ? अशी चौकशी केली. तथापि त्याच्या मेंदूवरील ताबा सुटत चालल्याचें दिसत होतें. ते केव्हा शुद्धीवर असत तर केव्हा बेशुद्ध होत. त्यांची धडपड चालली होती. अखेरच्या दिवशीं गांधी व शौकतअली मुंबईस येऊन टिळकांना भेटले. गांधींना पाहून टिळकांनीं नमस्कार केला. केव्हा आलात ? असे त्यांना विचारलें. टिळकांना भेटून बाहेर पडल्यावर गांधींनीं गुजरातमधील आपल्या एका स्नेह्याला तार केली. 'His will power alone can make him servive'.

टिळकांना शेवटचा श्वास लागला. पाठीचा कणा पंक्चर करण्याची पाळी आली. पण हें काम करण्यास कोणीहि डॉक्टर टिळकभक्तीमुळें किंवा प्रेमामुळें तयार होईना. पण डॉक्टर देशमुख मात्र हें धाडस करण्यास पुढें आले. 'या वेळीं मी डॉक्टर आणि टिळक पेशंट' या एकाच भावनेने त्यांनीं टिळकांना संपूर्ण तपासलें. आणि लोकमान्याच्या पाठीचा मणका पंक्चर करण्यास ते उद्युक्त झाले. त्यांनीं मणक्याला तोंड केलें, पण खिन्न मनःस्थितींतच ते बाहेर आले. 'सर्व संपत आलें आहे—आत जा.' असे सद्गदकंठानेंच ते पुटपुटले. त्यांचा गळा भरून आला. त्यांना पुढें बोलवेना सर्व मंडळी अधीरपणें आत गली. घड्याळांत बारा वाजून चाळीस मिनिटें झालीं होतीं. सर्वत्र शांत शांत होतें. इतकी मंडळी खोलींत होती, पण कोणीच कोणाशीं बोलत नव्हते. लोकमान्यांकडे पहायचें, खालीं मान घालायची आणि डोळ्यांची ओलावलेली कड तर्जनीनें पुसायची हाच सर्वांचा क्रम असे. कालघटीची टकटक मोठमोठ्यानें वाजत होती आणि टिळकांचें स्पन्दन एकदम बंद झालें. सर्वत्र एकच हाहाकार उडाला. रात्रीं सुमारें एक तासाचे आत गांधीजीहि सरदारगृहात येऊन दाखल झाले. टिळकांच्या निधनाची दु:खद वार्ता प्रस्तुत लेखकानेंच गांधीजींना फोन करून कळविलेली होती.

लोकमान्यांच्या शवाचें दहन पुण्यास करावें कीं मुंबईस करावें याची वाटाघाट झाली. दहनक्रिया मुंबईसच व्हावी असे अनेक दृष्टींनीं विचार करून ठरलें. स्मशान यात्रेस अतोनात गर्दी झाली. प्रेताची दहनक्रिया होण्यापूर्वी थोडा वेळ अगोदर लाहोरहून लाला लजपतराय टिळकांना भेटण्याकरिता म्हणून आले होते. पण त्यांना टिळकांच्या शवाचेंच दर्शन झालें ! सरदारगृहातून टिळकांचें शव बाहेर काढताना शौकतअलींनीं खांदा दिला. टिळकांचें निधन झाल्यानंतर पहिली दु:खदर्शक तार कोल्हापूरचे महाराजांची आलेली होती.

त्या वेळीं गोविंदरावहि सट्टाराहातच होते. सोन्याच्या तेजीमंदीचा व्यापार मुंबईत त्या वेळीं ते करीत होते. हा धंदा सोडण्याबद्दल गंगाधरराव त्यांना सारखे सांगत असत. त्यांत त्यांना बरीच मोठी तूट आल्याचें गंगाधररावाच्याहि कानावर आलें होतें. टिळकांच्या या आजारांत गंगाधरराव-गोविंदराव यांची चर्चा याविषयीं चालत होतीच. धंदा करावा, परोपकारासाठीं खूप पैसा मिळवावा व सढळ हातानें खर्च करावा, ही इच्छा वाईट नाहीं, परंतु त्यासाठीं असला आतबट्ट्याचा धंदा करायचा आणि एकदम श्रीमंत होण्याची हाव धरायची हें ठीक नाहीं. असला सट्टा न खेळतां परोपकार न करताच राहिलेले अधिक श्रेयस्कर आहे. 'धंदा करावयाचाच असल्यास पुष्कळ धंदे पडले आहेत. परोपकारासाठींच अधिक पैसा मिळवावा असें वाटत असेल तर आपण परोपकाराशिवायच राहिलेले अधिक श्रेयस्कर आहे. हा विचार गु. गंगाधररावांनीं गोविंदरावाच्या गळीं उतरविण्याची आपल्यापरी शिकस्त चालविली होती परंतु आजपर्यंत तरी त्यांच्या प्रयत्नाला यश आलें नव्हतें शेवटीं सुदैवानेंच दैवें केली. गोविंदरावाच्या अंतःकरणातील तो मंद शांत दीप तेवूं लागला. झालेली नुकसानी भरून येताच हा धंदा सोडण्याचाहि विचार चालू होता. आणि लोकमान्यांच्या मृत्यूच्याच रात्रीं त्यांच्या शवाजवळ बसून तो धंदा पुनः करावयाचा नाहीं असे मनोमनीं ठरविलें. इतकेंच नाहीं, तर त्यानंतर त्यांनी आपलें दुकान बंधूच्या स्वाधीन करून टाकलें आणि सार्वजनिक कामाकरिताच स्वतःचा सर्व वेळ व सर्व शक्ति खर्च करण्याची शपथ त्यांनीं घेतली. याप्रमाणें टिळकांच्या मृत्यूनंतर मुंबईचा धंदा सोडून ते बेळगावकडे परत आले. पुढें आपल्या आयुर्मर्यादेपर्यंत त्यांनीं बेळगावच्या दुकानांत कांहींहि काम केलेलें नाहीं. आपल्या शपथेला जागून त्यांनीं आपलें राहिलेलें सर्व आयुष्य सार्वजनिक कामातच खर्च केलें. मोठ्या प्रमाणावर धंदा करून पैसा मिळवावा व त्याच्या जोरावर देशसेवा किंवा स्वराज्याची चळवळ करण्याची कल्पना यानंतर त्यांनीं सोडून दिली आणि राष्ट्रीय स्वातंत्र्याचा ओलावा समाजांत यशस्वी रीतीनें कायम जिवंत राखण्यास अहर्निश झटण्याचा त्यांनीं निश्चय केला.

चिरोल-प्रकरण व ताईमहाराज-प्रकरण या दोन्ही खटल्यांनीं लो. टिळकांचें बरेंच आयुष्य खाऊन टाकलें होतें. त्यांतल्या त्यांत समाधानाची एवढीच गोष्ट होती कीं, ताईमहाराज-प्रकरणीं टिळकांना न्याय मिळाला होता. याच कामासाठीं टिळक मुंबईस येऊन राहिले होते. हें काम चालू असतांना त्यांची प्रकृति एकाएकीं बिघडली आणि त्यांतच या महापुरुषाचा अंत झाला हें देशाचें दुर्दैव होय.



प्रकरण पस्तिसावें

# कै. श्री. बळवंतराव नातू

गोविंदरावाच्या अनेकविध चळवळींमध्यें त्यानीं स्वतःचें गुप्तचराचें (C. I. D.) जाळेंच उभें केलेलें व पसरलेलें होतें त्यामुळें अनेक लहानमोठ्या क्षेत्रांतील तरुण कार्यकर्ते गोविंदरावाच्या संपर्कात आले होते. एकापेक्षा एक त्यागी व निष्ठावान् कार्यकर्त्यांनीं अशक्य वाटणारी कित्येक कामें शक्य करून दाखविली आहेत. आणि तीं सुद्धा प्रसिद्धिविन्मुख राहून केलीं आहेत! या सर्वांचा त्रोटक वृत्तांतहि मनोरंजक व बोधप्रद होईल. तरीहि तो मोह टाळून जो भाग येथें दिल्याखेरीज गोविंदराव याच्या जीवनचरित्राला पूर्तता येणार नाहीं, तेवढाच म्हणजे श्री. बळवंतराव नातू याचा कालविभाग येथे थोडक्यात देत आहें. याचा उडता उल्लेख यापूर्वीच्या अनेक प्रकरणांतून आलेला आहेच. आता त्याची सुसंगत हकीगत येथें देत आहें.

सावनवाडी संस्थानातील आजगावचे बळवंतराव नातू सन १९००मध्यें बेळगावला आले. त्याच्या भाऊबंदापैकीं लक्ष्मणराव नातू आधीं दोनचार वर्षे बेळगावात चालवीत असलेलें फराळाचें दुकान त्यांनीं स्वतःकडे चालविण्यास घेतलें. सन १९०७ पासून अगदीं अखेरपर्यंत त्याचा संबंध याळगी घराण्याशीं निकट होता. याळगी कुटुंबात ते घरातील एखाद्या वडील माणसाप्रमाणे होते. गोविंदरावाचे ते एक जिवलग स्नेही होते. गोविंदराव व याळगी घराणें या निःस्वार्थी स्नेह्याची योग्यता जाणून होते. गोविंदरावाबरोबर काम करीत असताना त्यांनीं स्वतःच्या कुटुंबाकडेहि विशेषसें लक्ष दिलें नाहीं. त्यांच्या कर्तबगारी फारच थोड्या लोकांना माहीत आहे. एखादी कामगिरी बळवंतरावाकडे सोपविली आणि ती योग्य प्रकारें पार पडली गेली नाहीं असे कधींच घडलेलें नाहीं. गोविंदरावाच्या शेवटच्या आजारामध्यें तर त्यांनीं आपलें दुकान सोडूनच दिल्यासारखें होतें. ते अहर्निश गोविंदरावाच्या बिछान्याशेजारीं बसून राहात असत. त्यांना मूलबाळ नव्हतें. एक मुलगी झाली होती, पण ती बाल्पणींच गेली.

कै० श्री० बळवतराव नातू

गोविंदरावाचा बळवतराव नातू यांच्यावर पूर्ण विश्वास. त्यांच्यापासून लपवून ठेवण्यासारखी गोष्ट गोविंदरावाच्या जीवनात एखादी तरी असेल असे मला वाटत नाहीं. मारुतीगल्लीतील त्यांच्या एका छोट्याशा खोलीमध्यें सर्व चळवळींची योजना व गुप्त घाटाघाटी होत असत. पोस्ट ऑफिस, तार ऑफिस व इतर सरकारी खात्यातून गोविंदरावांच्याकडे येणारी खबर बळवतरावांच्या खोलींतच प्रथम येत असे. गोविंदरावाना काहीं कामासाठीं बोलावून घेण्याची आवश्यकता गगाधररावाना उत्पन्न झाल्यास त्याना बोलावण्यास सागताना गगाधरराव मला म्हणत असत कीं, "गोविंदराव आपल्या घरीं नसले तर बळवतराव नातूंच्याकडे असतील. तिकडेहि पाहूनच त्याना घेऊन ये." इतर कोठें गोविंदराव सापडले नाहींत तर ते बळवतराव नातूंच्याकडे हटकून मिळावयाचे! काहीं मडळींना चर्चेला येण्याची सवय लावण्यासाठीं गोविंदराव प्रथम प्रथम पधरा दिवसाला एकदा लोकाना आपल्या घरीं बोलावीत असत. त्याच्या फराळाची वगैरे सर्व व्यवस्था बळवतरावच ठेवीत असत. परजिल्ह्यातील किंवा अन्य प्रातातून ल्हानमोठे कार्यकर्ते आणि पुढारी याची जा ये बेळगावमध्ये गगाधरराव-गोविंदराव यांच्याकडेच विशेष असे. परतु त्याची सरबराई करणें, व इतर व्यवस्था बळवतरावच पहात असत. पाहुणे लोक यावळगीच्या घरीं उतरले असले तरी घरातील सारा ठेवरेव पहाण्यात बळवतरावांचाच हात असे. गोविंदरावांच्या सहवासामुळें देशातील परिस्थितीचें व राजकीय सत्र स्थितीचें ज्ञान व परिचय त्याना सहज होत असे त्या वेळीं गोविंदरावाचा जणु एक कॅंपच यादला जाई. अनेक प्रातप्रातातील कार्यकर्ते व पुढारी गोविंदराव-गगाधरराव याना भेटण्यासाठीं या 'याळगी कॅंप'मध्यें येत असत. त्या सर्वांचें स्वागत व चहापाणी वगैरे सर्व जबाबदारी बळवतरावावरच येऊन पडत असे. त्यामुळें गोविंदरावाना त्यात लक्ष घालणेंहि जरुर वाटत नसे.

बळवतराव नातू याना गगाधररावांच्याविषयी नितात आदर व प्रेम असे. पण ते त्यानीं बोलावल्याशिवाय गगाधररावांच्याकडे फारसे जात-येत नसत गगाधररावानीं त्याना काहीं प्रत्यक्ष काम सागितलें तर बळवतरावाना तो आपला गौरवच वाटत असे, व तें काम ते अत्यत काळजीपूर्वक करीत असत. गगाधररावानाहि त्यांच्या विषयीं अत्यत आपलेपणा वाटत होता.

त्यांच्या गल्लींतील सार्वजनिक गणपतीपुढे प्रतिवर्षी गंगाधररावांच्या अध्यक्षते खालीं जीवनराव याळगींचें एक व्याख्यान होत असे. त्याबद्दल बळवंतराव यांना धन्यता वाटत होती. याळगी घराण्यातील सर्वच लहानथोर स्त्रीपुरुष आपल्या अडचणी व तक्रारी बळवंतरावांपुढें सांगून आपलें पोट हलकें करून घेत असत. त्यांनीं आपलें म्हणणें लक्षपूर्वक ऐकून घेतलें एवढ्यानेंहि त्या गोष्टीचा परिहार झाला असें सर्वांना वाटत असे.

आजगांवहून बेळगांवला आल्यानंतर लक्ष्मणरावांच्याकडून बळवंतरावांनीं फराळाचें दुकान चालविण्यास आपल्या हातीं घेतलें आणि त्याचप्रमाणें आपलें मरमाराईत चाललेलें फराळाचें दुकान आपल्या पुतण्याच्या हातीं सोपवून बळवंतराव आजगांवला जणु सेवानिवृत्त होऊन परत गेले. तेथेंच सन १९३९ सालीं त्यांनीं आपली इहलोकींची यात्रा संपविली. गोविंदरावांचें निधन झाल्यानंतर बळवंतरावांना अर्धवट झोंपेमध्यें एक स्वप्न पडलें. एक तरुण गोरापान सन्यासी याळगींच्या घरातून निघून बाहेर गेल्याचें दृश्य त्यांना त्या स्वप्नात दिसलें. हें स्वप्न ते अनेकांना गोविंदरावांच्या आठवणी निघाल्या कीं मोठ्या गंभीरपणानें व श्रद्धापूर्वक सांगत असत. याळगींच्या घराण्याशीं आणि गोविंदरावांच्या कार्याशीं बळवंतराव जितके समरस व एकजीव होते तितके ते आपल्या स्वतःच्या घराशीं तरी एकरूप झाले होते किंवा नाहीं याची शंकाच आहे. गोविंदराव म्हणजे सार्वजनिक जीवन अशीच त्यांची भावना होती.

सन १९२४ सालीं बेळगांव कॉंग्रेसच्या वेळीं ऑ. इ. कॉं. क. च्या आणि कॉं. वर्किंग कमिटीच्या सर्व पुढाऱ्यांच्या जेवणाखाण्याची, रहाण्यासवरण्याची सर्व व्यवस्था श्री. बळवंतराव नानू यानीं आपल्या अंगावर घेऊन चोख ठेवलेली होती. त्यांनीं ठेवलेल्या व्यवस्थेची प्रशंसा त्या त्या सर्व पुढाऱ्यांनींहि केली होती, एवढें सांगितलें तर इतरांच्या प्रशस्तीची जरूरीच नाहीं.

त्यांच्या अगदीं शेवटच्या दिवसांत म्हणजे सन १९३९ सालीं त्यांना औषध पाण्यासाठीं व शुश्रूषेसाठीं बेळगांवला बोलावून आणण्याच्या हेतूनें श्री. जीवनराव याळगी व त्यांच्या पत्नी सौ. रमाबाई मुद्दाम बळवंतरावांच्या खेड्यामध्यें गेले होते. पण त्यांनीं बेळगांवला येण्याचें मान्य केलें नाहीं. याळगींच्या घरीं येण्यांत त्यांना कसलाहि संकोच वाटत होता असें मुळींच नाहीं. परंतु इतरांची झटून सेवा करण्यांत त्यांना जितकी हौस व उमेद वाटत होती तितकाच तिटकारा दुसऱ्याकडून स्वतःची व्यक्तिगत सेवा करून घेण्यास वाटत होता. निरपेक्ष सेवाभावी महाभागांत त्यांची गणना व्हावी असेंच त्यांचें वर्तन असे.



प्रकरण छत्तिसावें

# लोकमान्यानंतर गांधीजींचा भारतभर दौरा

लोकमान्यांचें महानिर्वाण झाल्यानंतर राष्ट्रीय पक्षामध्यें असा एकहि पुढारी नव्हता की, ज्याचा शब्द सर्व लोक मानतील. लोकमान्यांच्या निधनादिवशींच महात्मा गांधींनीं मुसलमानांच्या खिलाफत चळवळीला मदत करण्याचें व सरकारीं असहकाराचें धोरण निश्चित केलें. लोकमान्यांच्या हातातील निशाण महात्माजींनीं जणुं आपल्या हातीं घेतलें. महात्माजींचा स्वभाव चार युक्तीच्या गोष्टी सांगून स्वस्थ बसण्याचा नव्हता. ते प्रत्यक्ष झपाट्यानें कार्यालाच लागले. त्या प्रवाहात सर्वस्वी सामील तरी व्हावें किंवा परिणामकारक विरोध तरी करावा. याशिवाय तिसरा मार्गच राहिला नव्हता. राष्ट्रीय पक्षातील बहुतेक सर्व पुढारी महात्माजींच्या असहकारितेच्या विरुद्धच होते. राष्ट्रीय पक्ष पूर्वीप्रमाणेंच सुसंघटित रहावा म्हणून राष्ट्रीय पक्षातील दहा पुढाऱ्यांचें एक मंडळ निर्माण झालें. त्या मंडळाचा आदेश राष्ट्रीय पक्षानें मानावा असेंहि ठरलें. त्या मंडळाचे गंगाधरराव एक सदस्य होते. त्यांच्या मनाचा ठाम निर्णय त्या वेळपर्यंत झालेला नसला तरी त्यांचा कल अधिकाधिक गांधींच्या असहकारितेच्या आंदोलनाकडे झुकूं लागला होता. तीच स्थिति गोविंदरावांच्याहि मनाची झालेली होती. त्यांचे विचारहि असहकारानुकूल होते.

गांधींच्या असहकार युगाला प्रारंभ झाला. नागपूर काँग्रेसच्या अधिवेशनापुढें असहकारितेचा ठराव मांडला जाणार होता. भावी कार्याच्या दृष्टीनें बेळगावची काँग्रेस संघटना बळकट करावी या विचारानें गोविंदरावांनीं बेळगाव जिल्हा काँग्रेसचें ऑफिस, नवीनच बांधलेल्या आपल्या दुकानाच्या माडीवर उघडलें. त्यासाठीं एका कायमच्या माणसाची व्यवस्था केली. गांधींचे विचार लोकांना समजावून सांगण्याच्या दृष्टीनें गोविंदरावांनीं नवीन पुस्तकें आणविलीं. उत्साही तरुणांचा मेळावा आपल्या हाताशीं राहावा अशी योजना केली. आतां निवडणुकी लढविण्याचें बाजूलाच राहिलें

आणि असहकारातील महत्त्वाचा कार्यक्रम म्हणून निवडणुकीवर बहिष्कार घालण्याचे ठरलें व तसा प्रचार सुरू झाला.

कलकत्त्याच्या स्पेशल कॉंग्रेसच्या अधिवेशनात असहकारितेचा ठराव मंजूर झाला. गंगाधरराव, जीवनराव व मंजली हे या कॉंग्रेसला उपस्थित होते. पक्षाची शिस्त म्हणून राष्ट्रीय पक्षातील सर्वच पुढाऱ्यांनी असहकारितेच्या ठरावाला विरोधी मतें दिलीं होतीं. पक्षशिस्त म्हणून गंगाधररावांनीहि ठरावाला विरोध दर्शविला होता पण कॉंग्रेसनिष्ठा म्हणून बहुमताच्या निर्णयाला मान्यता देऊन कलकत्त्याहून परत येतांना गंगाधररावांनी वाटेंत मोठमोठ्या शहरीं प्रचंड सभा घेतल्या आणि असह कारितेचा प्रचार करण्याचा धूमधडाका चालू केला. श्री. खाडीलकर, श्री. शि. म परांजपे, वामनराव जोशी ही टिळकपक्षीय मंडळीहि याच प्रवृत्तीची होती. गंगाधररावांचें मन गांधीजींना माहीत झालें होतें. तेव्हा टिळक पक्षातील ही महाराष्ट्रीय मंडळी आपल्या विचाराकडे झुकत आहेत याचा गांधींना आनंद झाला.

कलकत्त्याच्या कॉंग्रेसनंतर कॉंग्रेसच्या ठरावाप्रमाणें चालण्याचें बेळगांवातील गोविंदरावादि मंडळींनी ठरविल्यानंतर गंगाधरराव गांधीजींना भेटले. त्यांच्या असह कारितेच्या चळवळींत बेळगाव जिल्हा भाग घेणार असे त्यांनीं कळविले. त्याप्रमाणें कामाला आरंभ केला. महात्माजींनीं देशभर दौरा काढून नागपूरच्या कॉंग्रेस अधि वेशनासाठीं लोकमत अनुकूल बनविण्याचें काम सुरू केलें. या दौऱ्यात कर्नाटकातहि काहीं ठिकाणीं जाण्याचें त्यांनीं ठरविलें आणि कर्नाटकातील नक्की कार्यक्रम ठरविण्याचें त्यांनीं गंगाधररावांच्यावर सोपविलें. गंगाधररावांनीं कर्नाटकातील मुख्य मुख्य ठिकाणीं महात्माजींच्या दौऱ्याचा व भाषणाच्या कार्यक्रमाचा आराखडा केला. त्याप्रमाणें या दौऱ्यात महात्माजींचीं भाषणें होत. गांधीजी फंडहि गोळा करीत असत. महाराष्ट्रामधूनच महात्माजी बेळगाव जिल्ह्यामध्यें येणार होते. बेळगाव जिल्ह्यातील कार्यक्रम यशस्वी व्हावा म्हणून गोविंदरावांची सारखी धडपड चालू होती. दौऱ्यात महात्माजींना फंड भरपूर मिळेल याकडेहि त्यांचें लक्ष असे. ते निपाणीस येण्यापूर्वी गोविंदराव गंगाधरराव एकदा तेथे जाऊन आले. निपाणीहून चिकोडी, हुक्केरी, संकेश्वर हीं गावें आटोपून त्यांचें बेळगावात आगमन होणार होतें. बेळगावच्या सर्व व्यवस्थेची जबाबदारी गोविंदरावांनीं आपल्या शिरावर घेतली होती. ऑक्टोबर १९२० मध्यें बेळगाव जिल्ह्याच्या दौऱ्यावर महात्माजी आणि शौकतअल्ली आले. गांधींना 'महात्माजी' म्हणण्यास लोकांनीं प्रारंभ केल्यानंतर ते प्रथमच बेळगाव जिल्ह्यात दौऱ्यावर येत होते. जनतेमधील उत्साह अगदीं शिखराला पोहोंचलेला होता. बेळगाव जिल्ह्यातील व बेळगाव शहरातील गांधीजींच्या दौऱ्याचा कार्यक्रम व्यवस्थित पार पडावा म्हणून गोविंद रावांनीं जिवापाड मेहनत घेतली. ठरल्याप्रमाणें निपाणी, चिकोडी, हुक्केरी व संकेश्वर येथील कार्यक्रम उरकून सूर्यास्तापूर्वी गांधीजींना बेळगावात आणण्याचें ठरलें होतें.

सूर्यास्तानंतर गांधीजी कांहीं खात नाहींत. कसलाहि अडथळा न होतां गोविंदरावांच्या फोर्ड गाडींमधून महात्माजी सूर्यास्तापूर्वी बेळगांवास पोहोंचले. सिव्हिल हॉस्पिटलपासून जेलच्या बंगल्यापर्यंत रस्त्याच्या दुतर्फा त्यांच्या दर्शनासाठीं हजारों लोक दाटीवाटीनें उभे होते. टिळकवाडीस मुक्कामीं पोहोंचल्यानंतर त्यांचा उपहार वगैरे सर्व कांहीं वक्तशीर व व्यवस्थित झालें. किल्ल्याच्या मैदानावर त्यांच्या सभेची व्यवस्था केली होती. सभेची वेळ रात्रीं दहा वाजतां ठेवली होती. सुमारें वीस हजारावर लोकसमुदाय सभेस हजर होता. सभेंत व्यासपीठाची व दिव्याची तजवीज उत्तम होती. त्या वेळीं दीर्घध्वनि (लाऊडस्पीकर) प्रचारांत नव्हता. तथापि महात्माजींचा सर्व आवाज सभेंतील सर्वांना ऐकूं जाईल इतकी शांतता सभेंत होती. एवढी प्रचंड जाहीर सभा त्यापूर्वी बेळगांवांत कधींच झालेली नव्हती. त्या सभेंत असहकारितेचा संदेश देतांना गांधीजींनीं आपण या निर्णयाला कसे आलों आणि हें सैतानी राज्य नाहींसें झाल्याखेरीज आपला तरणोपाय कसा नाहीं हें विशद करून सांगितलें. हा लोकमान्यांचा बेळगांव जिल्हा या लढ्यांतहि मागें राहाणार नाहीं असा विश्वासहि त्यांनीं तेव्हां बोलून दाखविला सभेचें काम व्यवस्थित चालत असल्याचें सभेच्या बाहेर दूर अंतरावर उभे राहून गोविंदराव पहात होते. गांधीजींचा सर्व कार्यक्रम व्यवस्थित झालेला पाहून गोविंद रावांना फारच समाधान झालें. आणि त्याबद्दल त्यांनीं आपल्या सर्व सहकाऱ्यांना धन्यवादहि दिले!

या सभेंत गांधीजी व शौकतअली यांना रुप्याच्या करंडकांतून मानपत्रें दिलीं होतीं. महात्माजींना दिलेल्या करंडकापेक्षां शौकतअलींना दिलेला करंडक किंचित् लहान होता. हा भेदभाव गांधींच्या लक्षांत आला. त्यांचा आपल्या भाषणांत उल्लेख करून त्यांनीं व्यवस्थापकांना व स्थानिक पुढाऱ्यांना दोष दिला. यांत गांधींच्या स्वभावाची पारख अधिक सुस्पष्ट होते. परंतु ही चूक व्यवस्थापकांनीं जाणूनबुजून केली असें मुळींच नव्हतें; तर करंडक देतांना मानपत्राचीहि अदलाबदल होऊं नये म्हणून घेतलेली ती दक्षता होती. एरवीं इतका खर्च करणाऱ्या स्थानिक पुढाऱ्यांना आणखी दहावीस रुपये खर्चून दोन्ही करंडक सारखे ठेवणें अशक्य नव्हतें. पण धर्म करतां कर्म उभे रहावें तसें येथें झालें आणि नेमकी तीच दक्षता गांधीजींना दोषार्ह वाटली!!

या सभेचें अध्यक्षस्थान श्री. बेळवी यांनीं मंडित केलें होतें. सभेंत टोपी फिरवून वर्गणी जमविण्यांत आली. ती सुमारें एक हजार रुपये जमली होती. याप्रमाणेंच केवळ बायकांच्यासाठींहि एक सभा झाली. आणि त्यांतहि सुमारें दोन हजार रुपयांचे दागिने आणि कांहीं रोकड जमली होती. शहापुरास सभा होऊन तेथील लोकांनीं, व्यापारी वर्गानें व इतर जनतेनें महात्माजींना थैली अर्पण केली. कर्नाटकांतील त्यांचा बाकीचा दौरा गदग येथें संपवून महात्माजी थेट मिरज-सांगलीकडे गेले. त्याचें कारण व त्यांची झालेली स्वागत सांगणें हा या चरित्राचा विषय नव्हे.

कलकत्त्याच्या जादा कॉंग्रेस अधिवेशनांत महात्माजींचा असहकारितेचा ठराव बहुमतानें मंजूर झाल्यानंतर, नागपूरच्या वार्षिक अधिवेशनात तो माहून रीतसर मंजुरी मिळवणें आवश्यक होतें. त्या दृष्टीनें बेळगांव-धारवाडकडून शक्य तितके बहुसंख्य प्रतिनिधि नागपूरच्या कॉंग्रेस अधिवेशनाला पाठविण्याच्या मार्गाला गोविंदराव लागले. त्यांच्या प्रयत्नाला यश येऊं लागतांच त्यांनीं रेल्वेअधिकाऱ्यांशीं पत्रव्यवहार सुरू केला. बेळगांवहून नागपूरसाठीं खास स्पेशल गाडीची व्यवस्था केली. ठरलेल्या दिवशीं सर्व प्रतिनिधि बेळगांवमध्यें एकत्रित झाले. आणि खास आगगाडीनें सुमारें २०० हून अधिक प्रतिनिधि बेळगांवाहून नागपुरास रवाना झाले. त्याना निरोप देण्यासाठीं रेल्वेस्टेशनवर हजारों नागरिक उपस्थित होते.

नागपूरहून परतल्यावर गोविंदरावांनीं आमरण खादी परिधान करण्यास सुरुवात केली, डोक्यावरील रुमाल काढून त्या जागीं गांधीटोपी चढविली. या पोषाखात गोविंदराव अधिक सतेज व चुणचुणीत दिसतात हें त्यांचीं त्या त्या पेहरावातलीं छायाचित्रें पहाणाऱ्याच्या तेव्हांच लक्षांत येईल.



प्रकरण सदतिसावें

# गोविंदरावांच्या जीवनांतील विचारक्रांतीचें वर्ष

कलकत्याच्या स्पेशल कॉंग्रेसपेक्षा नागपूरच्या वार्षिक कॉंग्रेसमध्यें म. गांधींच्या असहकारितेच्या ठरावाची पाळेंमुळे भारतात अधिक खोल गेलीं. सर्वच प्रातातील प्रतिनिधि आपलें बलाबल अजमाविण्याच्या दृष्टीनें संघटित होऊन शक्य तितक्या अधिक संख्येनें नागपूरला कॉंग्रेस अधिवेशनाच्या दिवसातहि बहुतेक सर्व प्रांताच्या छावण्यामधून जाहीर सभा भरवून लोकमत अजमाविण्याचे व तें अधिक शिक्षित करण्याचे प्रयत्न होत होते. बंगालमधील प्रतिनिधींमध्यें दासबाबूंनीं लोकमत आपल्या बाजूला वळविण्याची पराकाष्ठा केलेली होती. पण त्यात त्याना यश आलें नाहीं. कर्नाटक व महाराष्ट्राची मिळून एकच सभा भरविण्यात आली होती. नाशिकचे श्री. पाटणकर यानीं या सभेचें अध्यक्षस्थान मंडित केलेलें होतें. असहकारितेच्या ठरावाला अनुकूल असें गंगाधररावाचें भाषण झालें. बेळगावचे दत्तोपंत बेळवी यानीं या ठरावाला त्या सभेंत विरोध केला होता. काकासाहेब कालेलकर, महादेवशास्त्री दिवेकर याचीं भाषणें असहकाराला अनुकूल झालीं. बहुमत असहकाराला अनुकूल आहे असें स्पष्ट दिसून आलें. त्या काळपर्यंत लोकमत घडविण्याची ताकद असलेले बहुतेक पुढारी प्रथम या ठरावाला विरुद्धच होते. बहुमतानें मंजूर झालेला ठरावच मान्य करून तोच अमलात आणला पाहिजे या विचारानें असहकाराचा ठराव मानून त्याचाच विचार व प्रचार जे करू लागले तेवढेच पुढारी व लोक प्रवाहाबरोबर जाऊन समाजाचे मार्गदर्शक म्हणून टिकूं शकले. शेवटपर्यंत ज्या पुढाऱ्यानीं आपला विरोध चालू ठेवला ते या राजकारणाच्या आंदोलनातून आपोआपच बाजूला टाकले गेले. त्याच्या विरोधाकडे कोणीं लक्षहि दिलें नाहीं.

आणि असें होणें अगदीं स्वाभाविकहि होतें. त्या पुढाऱ्याच्या धैर्याबद्दल व ते आपल्या मताशीं चिकटून राहिल्याबद्दल आजहि त्याचा गौरवच करावा लागेल. या वेळीं देशामध्यें विचारक्रांति होऊ लागली होती आपल्या निष्ठा, आपले आजवर

मोडला आहे आणि तें वर्तन कायद्याला अनुसरून व कोर्टाच्या मतानें गुन्ह्याचें ठरत असेल तर त्या कायद्यानें दिलेली शिक्षा आनंदानें मान्य करून तुरुंगवास पत्करावयाचा; वकील वा बॅरिस्टर देऊन खटला लढवून खटल्यातून निर्दोष सुटण्याचा प्रयत्न किंवा शक्य तितकी कमी शिक्षा होईल असा यत्न करावयाचा हा आजपर्यंतचा शिरस्ता सोडून गुन्हा छातीठोकपणें कबूल करावयाचा, इतकेंच नाहीं, तर कायद्याप्रमाणें अधिकांत अधिक शिक्षा देण्यास कोर्टास विनंती करावयाची आणि शिक्षा भोगून सुटून आल्यानंतर मी हाच उद्योग किंवा कायदेभंग पुन: करीत राहणार आहें असें जाहीर करण्याचें युग सुरू झालें होतें. मी राजद्रोहाचा गुन्हा केला नाहीं, असें सिद्ध करण्याऐवजीं, 'राजद्रोह करणें हा माझा धर्म आहे, माझा प्रत्येक श्वासोच्छ्वास राजद्रोहानें ओथंबलेला आहे', असें गांधींनीं यंग इंडियामधील एका लेखांत जाहीर करून टाकलें होतें. अर्थात् कोर्टांत वकील देऊन खटला चालविण्याची आवश्यकताच राहिलेली नव्हती. 'गुन्हा मला मान्य आहे, अधिक चांगल्या प्रकारें मी हा गुन्हा करूं शकलों नाहीं, याचेंच मला दु:ख आहे. मला अधिकांत अधिक शिक्षा द्या' असें सांगण्यास वकिलाची काय आवश्यकता आहे? अशा तऱ्हेचें वातावरण गांधीजींनीं देशांत बघता बघता निर्माण केलें व चेतविलें होतें. यासारख्या परस्परविरुद्ध मतांचें द्वंद्व गोविंदरावांच्या डोक्यातहि कांहीं काळ थैमान घालीत असलें पाहिजे. अखिल भारतीय कीर्तीचे पुढारी देशभर दौरा काढून अशाच प्रकारचें वातावरण चेतवीत व फैलावीत होते. त्याचाहि परिणाम गोविंदरावांच्या मनावर होत होता. त्याच सुमारास पंजाबचे दे. भ. लाला लजपतराय बेळगावांत आले होते. महात्माजींनीं चालविलेल्या चळवळीस आपला पूर्ण पाठिंबा असल्याचें त्यांनीं बेळगावच्या जाहीर सभेंतील भाषणांत विशद करून सांगितलें होतें. पुढें लाला लजपतराय दुसऱ्या दिवशीं, धारवाडच्या गोळीबार प्रकरणीं तुरुंगांत डांबलेल्या तेथील पुढाऱ्यांना भेटावयास धारवाडास गेले. धारवाडच्या एका प्रसिद्ध व जबाबदार गृहस्थानें लालाजींना एक मार्मिक प्रश्न विचारला कीं, "आपण हिंदुस्थानचे महान् पुढारी आणि या अहिंसक गांधींच्या मागें काय लागला आहांत?" त्याला लालाजींनींहि तसेंच एक मार्मिक पण सर्वांना सहज पटेल असें उत्तर दिलं होतें. ते म्हणाले, 'गांधी एक थोर पुरुष आहेत. त्यांनीं आफ्रिकेंत फार मोठें कार्य यशस्वी करून दाखविलेलें आहे. आतां ते हिंदुस्थानातहि आपल्या प्रभावानें स्वातंत्र्य मिळवून देणार आहेत. अशा परिस्थितींत, मी देशातील गुलामगिरी नष्ट करून स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्यास इतका अधीर, इतका उत्सुक झालों आहें कीं, रस्त्यात भटकणाऱ्या एखाद्या पोरानेंहि मला सांगितलें असतें कीं, 'मी हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळवून देणार आहें!' तर त्याच्याहि मागें जाण्यास मी तयार झालों असतों मग गांधीजींसारख्या थोर प्रभावी व कर्तबगार पुढाऱ्याचा अनुयायी होण्यात काय

बिघडलें ?" गुरुवर्य गंगाधररावांनीं गांधीजींच्या मार्गानें जाण्याचें ठरविलें होतेंच. अशा वेळीं लालाजींसारख्या जगद्विख्यात देशभक्ताचें मत गोविंदरावांना ऐकण्यास मिळाल्यावर त्यांनीं आपल्या मनांतून गांधींच्या मार्गाविषयींचा संशय काढून टाकला, व मनाचा घडा केला कीं, स्वातंत्र्याच्या लढ्यामध्यें यापुढे गांधीजींच्या मार्गानेंच पाऊल टाकावयाचें! त्याबाबत त्यांचाच शब्द मानावयाचा!

गोविंदरावांचा आजपर्यंतचा अनुभवहि त्यांना तेंच सांगत होता. भारतांतील पंजाब, बंगाल व महाराष्ट्र या तीन प्रांतांतील क्रांतिकारकांच्या प्रयत्नांचा इतिहास व त्याचे बरेवाईट परिणामहि त्यांच्या डोळ्यांपुढें होते. एका युरोपियन किंवा देशी अधिकाऱ्याचा खून करावयाचा किंवा क्रांतिकारकांना तशा प्रकारचें शिक्षण द्यावयाचें म्हणजे किती धोरणें सांभाळावीं लागतात! किती भानगडी कराव्या लागतात! त्यासाठीं लागणारीं हत्यारें मिळवणें व तीं सुरक्षित जागीं ठेवणें किती कठीण असतें! कोठें तरी ल्हानशी चूक झाली तर, निश्चप्रयत्न करून तीं मिळविता आलीं तरी त्यांचा उपयोग होण्याच्या पूर्वीं किंवा नंतर तीं मिळविलेलीं हत्यारें व पुस्तकें नाहींशीं करण्यामध्यें आपली सर्व बुद्धि व शक्ति कशी खर्च करावी लागते, यासाठीं करावा लागणारा खर्च भागवतांना किती व कशा अनेक भानगडी व अडचणी उपन्न होतात, आणि या सर्व धोक्यांना व संकटांना तोंड देत देत साधनसामग्री मिळवतां आली तरी क्रांतिकारकांच्या भिन्या संसारी लोकांना सरकारी छळ कसा व किती सोसावा लागतो, आपला अगदीं अंतर्वर्तुळांतील एखादा सानीचा मनुष्य देखील माराच्या भीतीनें कसा कबुली जबाब देतो व त्या आधारावर कितीतरी लोकांच्या गळ्याला कशी तात लागते आणि तो गुप्त कट शोधून काढण्याच्या हेतूनें सुक्याबरोबर ओलेंहि कसें जळून भाजून निघतें आणि अधिकाऱ्याच्या खुनाबरोबर या फितुराचेहि कसे मुडदे पाडावे लागतात, कांहीं लोकांना भूमिगत करून पळवावें लागल्यास त्यासाठीं किती खर्च करावा लागतो, आणि भूमिगत कुटुंबाचा भार कोठवर उचलावा लागतो, या सर्व गोष्टींचा चित्रपट गोविंदरावांच्या डोळ्यांपुढून झरझर सरकत होता. असल्या चोरट्या बारा भानगडी करण्यापेक्षा गांधीजींचा खुल्लमखुल्ला व्यवहार शतपट बरा. त्यांत ना खर्च ना उपरिनिर्दिष्ट जबाबदारी! जें काय व्हायचें असेल तें स्वतःपुरतें. सत्य, आत्मनिष्ठा व धैर्य एवढ्या भांडवलावर केव्हांहि स्वातंत्र्याच्या लढ्यासाठीं कोठेंहि उभें राहावें आणि आपल्या बुद्धीला योग्य वाटेल तें करावें. किती सोपा उपाय आहे हा! असल्या तौलनिक विचारानें गोविंदराव गांधींचे अनुयायी बनले.

रौलट रिपोर्ट लक्ष लावून वाचल्यास कोणाच्याहि असेंच प्रत्ययास येईल कीं, इंग्रज अधिकाऱ्यांना मारण्याची योजना सफल झाल्याचें एखादें उदाहरण क्वचित् कोठें दिसून येत असलें तरी त्यासाठीं साधनसामग्री व वाङ्मय जमविण्यामध्यें व तें गुप्तपणें नीट जपून ठेवण्यामध्यें आणि ही बातमी सरकारला लागल्यामुळें अथवा तसा संशय

आल्यामुळे, विश्वप्रयत्नानें मिळवलेलीं साधनें शक्य तितक्या शीघ्रतेनें नष्ट करून टाकण्यामध्यें नित्येक सोयासारख्या क्रांतिकारकाची शक्ति, पैसा व बुद्धि आणि नित्येक प्रसंगीं जीवितहि कसें खर्ची पडलेलें आहे याचाच इतिहास रौलट रिपोर्टांत वाचावयास मिळतो. क्रांतिकारकांनीं साधनें व वाङ्मय शिताफीनें जमविणें व शिताफीनें नष्ट करणें यात जें कौशल्य, जी निर्भयता व जें धाडस आपण दाखविलें त्याचाच अभिमान बाळगून आपल्या मनाचें समाधान करून घ्यावें लागतें. एरवीं त्यात मोकळेपणा नाहीं, मुक्त आनंद नाहीं!

गांधीजींच्या नवीन योजनेप्रमाणें किंवा तत्त्वज्ञानाप्रमाणें सर्व गोष्टी अनावृत करावयाच्या असतात. जाणूनबुजून सरकारला आपल्या योजनाची आगाऊ प्रगटना द्यावयाची व मग त्याप्रमाणे वागावयाचें असतें. कारण या तत्त्वज्ञानात Secrecy is sin म्हणजे गुप्तता हें पाप मानलेलें आहे. या नव्या मतानें जनमानसातून भीति नाहींशी होते. जनतेचें शील वाढतें. कोणासहि त्यात भाग घेता येतो. हिंसक लढ्यापेक्षा *एका अर्थी अहिंसक लढ्यामध्यें अधिक धैर्य व अधिक त्यागाची आवश्यकता* असते. अशा लढ्यामध्यें पुढें गांधीजींच्या नेतृत्वाखालीं हजारों नव्हे लाखों लोकांनीं भाग घेतलेला आहे. या सर्व गोष्टींचा दूरदृष्टीनें विचार करून, हिंसेच्या मार्गाइतका तरी गांधीजींच्या अहिंसक मार्गाचा प्रयोग करून पहाण्यास कोणती हरकत आहे! असा विचार करुन गोविंदरावांनीं या मार्गावर पदार्पण केलें. जसजसा त्यात अनुभव येत गेला तसतशी त्यांची त्या मार्गावरील श्रद्धा दृढ होत गेली. नाहींतरी तसेंच पाहिल्यास राजकारणामध्यें एक प्रकारचा 'डेडलॉक्' म्हणजे मरगळच आलेली होती. मवाळांच्या सनदशीर मार्गावर तरी जावें नाहींतर केलेलेंच पुनः करीत बसावें, मग त्यात नितीहि का नुकसान येईना. याशिवाय गत्यंतर उरलेलें नव्हतें.

अहिंसक असहकार म्हणजे नॉन-व्हायओलंट नॉन-कोऑपरेशन हें मानिकारी तत्त्वज्ञान देशापुढें मांडून गांधीजींनीं ही देशातील मरगळ (डेडलॉक) नाहींशी केली. देशातील नवयुवकांपुढे कतबगारीचा, धैर्याचा, त्यागाचा, कष्ट सहन करण्याचा व आत्मबलिदान करण्याचा एक नवा राजमार्ग गांधीजींनीं दाखवून दिला. स्वातंत्र्याच्या लढ्यांतील सबध देशाचा हिंसाचाराचा तसाच अहिंसक मार्गावलंबनाचा आढावा काढून पाहिल्यास वर उल्लेखिलेला कोणताहि सद्गुण गांधीजींनीं वाया जाऊ दिलेला नाहीं. सरकारचा दारुगोळा, सैन्य, तुरुंग, गोळीबार, लाठीमार, दंड, शिक्षा, गुप्तचरखातें वगैरे काढून सारे शासकीय दडपशाहीचे उपाय निष्प्रभ होऊन गेले 'जर्नल' अशी नामी युक्ति गांधीजींच्या या अनत्याचारी असहकारानें देशातील तरुणांना मिळवून दिली. लोकांच्या मनातील भीति पार नाहींशी करून टाकली. अनेक तऱ्हेच्या भीतींच्या जोरावर परकीय लोक आपल्या देशावर राज्य करीत आहेत, या वस्तुस्थितीच्या मर्मीं कुऱ्हाडी घालून त्याच्या नडुपालाच गांधीजींनीं हात घातला. गोविंदरावाच्याबरोबर त्यांच्या

मित्रमंडळींचीहि राहणी-करणी आणि विचारसरणी या गांधीजींच्या नवतत्त्वज्ञानानें आमूलाग्र बदलून गेली. म्हणूनच नवीन वातावरणात नव्या राजकीय सिद्धान्ताप्रमाणें पूर्वीच्याच कळकळीनें व जोमानें ते कार्य करूं शकले. या कामातहि पोलीस अधिकाऱ्यावर गोविंदराव मात करूं शकले होते. हा अनत्याचारी असहकाराचा मार्ग उघडा उघड असल्यामुळें पोलिसाच्या लबाडीच्या कर्तबगारीला फारसा वाव उरत नसे; किंबहुना कांहीं वेळा तरी ते गडबडून जात आणि त्याची बुद्धि हतप्रभ होऊन ते निष्क्रिय बनत. हा नवा अनुभवहि तरुणाच्या कर्तृत्वशक्तीला उत्तेजन देणाराच ठरलेला आहे. गांधींचें हें नवें तत्त्वज्ञान मान्य केल्यावरहि पूर्वसंस्कारामुळें असेल किंवा नवविचाराचा साकल्यानें अनुभव घेऊन तो दृढ होण्यासहि अद्याप अवधि असल्यामुळेंहि असेल, कधीं कधीं गंगाधरराव विचलित होण्याचा समय त्याना दिसून येई; अशा वेळीं गोविंदरावानीं त्याना सावरलें आहे, किंवा इष्ट मार्गापासून विचलित होऊं दिलेलें नाहीं. गंगाधररावाच्या जीवनात असे प्रसंग हाताच्या बोटावर मोजण्याइतके कमी आले असतील, पण ते आले होते असे दाखवून देता येईल.



प्रकरण अडतिसावें

# गंगाधररावांवरील असहकारी खटल्याची पार्श्वभूमि

असहकाराच्या युगात 'धारवाड जिल्हा राजकीय परिषद' गंगाधररावांच्या अध्यक्षत्वाखालीं भरली होती. त्याच वर्षी 'रत्नागिरी जिल्हा परिषद' हि चिपळूण येथें गंगाधररावांच्याच अध्यक्षतेखालीं भरली होती. ध्येयासाठीं केवळ वाद करीत बसण्यापेक्षा ध्येय साध्य करून घेण्याच्या साधनाकडे विशेष लक्ष देणें जरूर आहे. त्यासाठीं अहिंसात्मक असहकार हाच उत्तम उपाय आहे, असें गंगाधररावांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणात प्रतिपादन केलें होतें. त्याचप्रमाणें या साधनानें आपलें ध्येय प्राप्त न झाल्यास करबंदीची चळवळ हातीं घेण्याचा प्रसंग येईल, असें भाषणाच्या ओघात ते बोलून गेले. धारवाडच्या गोळीबाराच्या प्रकरणाचा उल्लेख करून कलेक्टर पेंटरवरहि त्यांनीं आपल्या भाषणात शस्त्रास्त्रें चालविलीं होतीं, तोंडसुख घेतलें होतें. अर्थात् गंगाधररावांच्या भाषणाबद्दल त्यांच्यावर १२४ अ कलमाप्रमाणें खटला भरण्यास सरकारची मंजुरी धारवाडचे कलेक्टर मि. पेंटर यांनीं मागितली होती.

याच सुमारास कराची खिलाफत परिषद भरून तींत हिंदुस्थानातील सेनादलातील शिपायांनीं आणि पोलिसांनीं कॅंग्रेसच्या असहकार ठरावाप्रमाणें आपल्या नोकऱ्या सोडाव्यात अशी त्यांना विनंती करण्यात आलेली होती. त्याबद्दल अलीबंधु वगैरे पुढाऱ्यांवर खटले भरण्यात येऊन त्यांना अटक करण्यात आलेली होती. गांधीजी त्या वेळीं मद्रास इलाख्यात दौऱ्यावर होते. त्यांना हें समजताच ते मुंबईस आले व काहीं प्रमुख पुढाऱ्यांना मुंबईस त्यांनीं बोलावलें. त्यात गंगाधररावांनाहि निमंत्रण होतें. त्या खाजगी सभेला लाला लजपतराय, पटेल वगैरे मंडळी उपस्थित होती. त्या वेळीं अलीबंधूंवर खिलाफत परिषदेच्या त्या ठरावाबद्दल खटला भरण्यात आला होता, तो ठराव मान्य असल्याबद्दल सर्वांना मिळून जाहीरनामा काढावा व त्या प्रकारचे ठराव सर्व देशभर सार्वजनिक सभा भरवून मंजूर करावेत, असें सर्वानुमतें ठरलें. जाहीरपत्रकाचा मसुदा तयार झाला. तेथें हजर असलेल्या सुमारें चाळीस पुढाऱ्यांच्या

सर्वांच्या सहीनें निघालेल्या जाहीरनाम्यास पाठिंबा देण्याकरितां पुण्यामध्यें जाहीर सभा होती. या सभेला गंगाधरराव उपस्थित होते, एवढेंच नव्हे, तर त्यांचें तेथें भाषणहि झालें.

वेळगांवास कसें व केव्हां जावयाचें याची योजना ठरवूनच गोविंदराव पुण्याहून वेळगांवीं आले असले पाहिजेत. योजनेंतील इतर सर्व गोष्टी अर्थातच गोविंदरावांनींच ठरवावयाच्या होत्या. या सर्व भानगडीच्या वेळीं मी गंगाधररावांच्याबरोबरच होतों.



सह्या त्यावर झाल्या. त्यात बॅ. जयकर हेहि होते. पुढें देशभर ठिकठिकाणीं जाहीर सभा भरून तसे ठरावहि मंजूर करण्यात आले. पण हें जाहीर पत्रक काढणाऱ्यावर अथवा इतर कोणावरहि सरकारनें खटले भरले नाहींत. अगर त्याविरुद्ध कोणतीहि अन्य उपाययोजना केली नाहीं.

या खाजगी सभेसाठीं गंगाधरराव मुंबईस गेले असताना गंगाधररावांच्यावर कलम १२४ अ प्रमाणें खटला भरण्यास सरकारची मंजुरी मिळाली असल्याची बातमी समजली. गांधीजींनाहि गंगाधररावांनीं ही हकीगत लागलीच कळविली होती. गांधीजींनीं त्यांना उत्तेजनपर दोन शब्द सांगितले. गंगाधररावांना पुण्यास चार दिवस राहण्याची आवश्यकता होती. त्यांनीं गोविंदरावांना पुण्यास बोलावून घेतलें. गंगाधररावांवर खटला भरण्यास सरकारनें परवानगी दिली आहे ही बातमी गोविंदरावांनीं आपल्या सराफी धंद्याच्या मार्फत तारेनें कळविली होती. दागिने तयार आहेत (Ornaments ready) अशी ती तार होती. दागिने म्हणजे हातकडी तयार आहेत असा अर्थ त्या तारेचा होता व तो गंगाधररावांना बरोबर समजला होता. त्यामुळें आता या बातमीच्या खरेखोटेपणाचा संशयच राहिलेला नव्हता. परंतु पुण्यातील काम संपण्यापूर्वीच अटक झाल्यास कांहीं कामें तशींच अर्धवट सोडून द्यावीं लागतील, तेव्हा काय करावें या विचारात गोविंदराव-गंगाधरराव होते. त्या वेळीं गंगाधरराव श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या घरींच उतरले होते. ही हकीकत समजल्यानंतर त्यांनीं एक युक्ति सुचवली.

> "मला अटक करण्याबद्दलचें वॉरंट धारवाड मॅजिस्ट्रेटकडून आल्याचें समजतें. पण कांहीं जरुरीच्या खाजगी कामासाठीं मला पुण्यास चार दिवस रहाण्याची जरुरी आहे. तोंपर्यंत वाट पहावी."

अशी तार गंगाधररावांनीं बेळगावच्या पोलीस सुपरिंटेंडेंटला करावी आणि काय होतें तें पहावें, असें तात्यासाहेबांनीं सुचविलें. त्याप्रमाणें गंगाधररावांनीं तार केली आणि या बाबतींत पोलीस सुपरिंटेंडेंटना गोविंदरावांनीं स्वतः भेटून ते काय निर्णय घेतात तें गंगाधररावांना तारेनें कळवावें असें ठरून गोविंदराव बेळगावला रवाना झाले. बेळगाव स्टेशनवरून ते परस्पर पोलीस सुपरिंटेन्डेन्ट साहेबांना जाऊन भेटले. पोलीस अधिकाऱ्यांनीं चार दिवस वाट पहाण्याचें ठरविलें असल्याची तार दुसरे दिवशीं गोविंदरावांच्याकडून गंगाधररावांना गेली. त्यामुळें पुण्यास चार दिवस राहून गंगाधररावांनीं आपलीं कामें संपविलीं.

तेव्हापासून मात्र गंगाधररावांच्यावर पुण्याच्या पोलिसांनीं नजर ठेवण्यासाठीं तात्यासाहेब केळकरांच्या दरवाजात सकाळपासून संध्याकाळपर्यंत एक साध्या पोषाखातील पोलीस बसविलेला होता. बेळगावच्या पोलीस अधिकाऱ्यांच्या सांगण्याप्रमाणें ही व्यवस्था झाली असली पाहिजे. गंगाधररावांच्या या पुण्याच्या मुक्कामातच, मुंबईस

सर्वांच्या सहीनें निघालेल्या जाहीरनाम्यास पाठिंबा देण्याकरितां पुण्यामध्यें जाहीर सभा होती. या सभेला गंगाधरराव उपस्थित होते, एवढेंच नव्हे, तर त्यांचें तेथें भाषणहि झालें.

बेळगांवास कसें व केव्हां जावयाचें याची योजना ठरवूनच गोविंदराव पुण्याहून बेळगांवीं आले असले पाहिजेत. योजनेंतील इतर सर्व गोष्टी अर्थातच गोविंदरावांनींच ठरवावयाच्या होत्या. या सर्व भानगडीच्या वेळीं मी गंगाधररावांच्याबरोबरच होतों.



प्रकरण एकोणचाळिसावें

# सीमोल्लंघन गंगाधररावांचें पण योजना गोविंदरावांची

अखिल भारतीय प्रख्यातीच्या अनेक पुढाऱ्यांच्या सहवासांत राहण्याचें भाग्य मला लाभलेलें आहे. त्यांत कांहीं पुढारी आपल्या स्वतःच्या जीवनाला धोक्यामध्यें घालूनहि देशसेवा करण्याची हौस असलेले आहेत. *त्यांत गंगाधरराव-गोविंदराव* यांची गणना प्रामुख्यानें करावी लागेल. त्यांच्या जीवनांतील अशाच एका प्रसंगाचें स्मरण या ठिकाणीं मी नोंदवून ठेवीत आहें.

असले प्रसंग त्या काळचें वातावरण ध्यानांत घेऊनच परीक्षिले पाहिजेत. इंग्रजांची शिस्त, इंग्रजांच्या गुप्तहेरखात्याचें पसरलेलें जाळें, सच्चा देशभक्तांच्या पाठीमागें इंग्रज सरकारनें लावलेला ससेमिरा, कायद्याच्या कचाटीमध्यें देशभक्तांना—विशेषतः टिळकपंथीय देशभक्तांना—पकडून शिक्षा ठोठावण्याचा इंग्रज सरकारनें चालविलेला सपाटा आणि देशामध्यें स्वातंत्र्य चळवळीस आलेलें भरतें किंवा जोर या गोष्टी ध्यानांत घेऊन या प्रसंगाचें महत्त्व व गांभीर्य अजमावलें पाहिजे.

गंगाधरराव देशपांडे मुंबईस असतांना गोविंदरावांनीं बातमी दिली कीं, *गंगाधररावांच्यावर १२४ अ प्रमाणें खटला भरण्यांत आलेला आहे. त्या काळीं* सरकारी गोटांतील विशेषतः सी. आय्. डी. व पोलीस खात्यांतील बातमी काढणें ही एक महत्त्वाची बाब समजली जात असे. हें काम हमखास करण्याची शक्ति व शैली गोविंदरावांच्या ठिकाणीं भरपूर होती. सरकारी सर्व खात्यांमध्यें खाजगींचे अनेक स्नेहीसोबती पेरलेले असत. किंबहुना असल्या राजकीय बातम्या अगर माहिती गोविंदरावांना कळविणें आपलें कर्तव्यच आहे असें मानणारे पण गोविंदरावांशीं बिलकुल परिचय नसलेले लोकहि बहुतेक सर्व सरकारी खात्यांमध्यें होते. गोविंदरावांच्या Ornaments ready या धूर्त तारेचा अर्थ गंगाधरराव समजावयाच्या तोच समजले. त्या वेळीं मी त्यांच्याबरोबर मुंबईस गेलों होतों. अशा अटीतटीच्या राजकीय संकटाच्या वेळीं गंगाधररावांच्या अंगांत साठ हजार हत्तींचें बळ संचरत असे. त्यांचा पवाय

वर्षांच्या राजकीय जीवनामध्यें असले कितीतरी प्रसंग मीं पाहिलेले आहेत. अशा प्रसंगीं त्यांची धाडसी वृत्ति व समयसूचकता फारच वेगळ्या तऱ्हेची दिसे. त्यांच्यावर आलेलीं संकटें दुसऱ्या एखाद्यावर आलीं असतीं तर त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडून गेल्या असत्या.

गंगाधरराव पुण्यामध्यें असताना अनेक पुढाऱ्यांच्या भेटीगाठी, विचारविनिमय, मसलती आणि भावी कार्याची व्यवस्था वगैरे झाल्यानंतर पुण्याहून बेळगावास निघण्याचें ठरलें. मी सतत गंगाधररावांच्याजवळच होतों. कोणत्याहि चर्चेच्या वेळीं मी उपस्थित असें. तथापि बेळगावास कसें व केव्हा निघावयाचें ठरविण्यात आलें हें मात्र मलाहि उमजू दिलें नव्हतें. दुसऱ्या दिवशीं रात्रीं मेलनें पुण्याहून जाण्याचें ठरविण्यात आल्याचें मला सांगितलें असल्यामुळे मी त्या दिवसाची मेलची एक पहिल्या वर्गाची बर्थ रिझर्व्ह करून आलों होतों.

बेळगावच्या लोकांना गंगाधररावांच्या या अटकेप्रीत्यर्थ त्यांचा सत्कार करण्याची संधि मिळू नये, लोकांना तशी संधि मिळाल्यास होणारी राजकीय जागृति टाळावी ही इंग्रज सरकारची इच्छा होती. त्यांच्यावरील हा खटला धारवाडला चालणार होता. सरकारचा हा डाव हाणून पाडावा, गंगाधररावांच्या अटकेनिमित्त होणाऱ्या सत्कारानें शहरात जी राजकीय जागृति व खळबळ उडेल तेवढी साधून घ्यावी आणि आपल्या घरीं आपल्या मातोश्रींना व भगिनींना गंगाधररावांना भेटता यावें अशी गोविंदरावांची इच्छा होती. इंग्रज सरकारनें आपलें पकडवॉरंट बेळगाव स्टेशनवर तयार ठेवलेलें होतें. त्याच मेलगाडींतून आणि त्याच डब्यांतून गंगाधररावांना थेट धारवाडला न्यावें अशी सर्व तयारी इंग्रज सरकारनें बेळगाव स्टेशनवर करून ठेविली होती. ही बातमी देखील बेळगाव शहरामध्यें कोणास कळू न देण्याची शक्यतों सर्व काळजी सरकारनें घेतली होती. परंतु त्यांच्या त्या कडेकोट बंदोबस्तांतूनहि ही बातमी गोविंदरावांना कळलेली होती. केवळ सरकारवर मात करण्याच्या इराद्यानें गोविंदरावांनी सुद्धा हीच बातमी तोंडातोंडीं आपल्या सर्व स्नेह्यांना व त्यांच्यामार्फत सर्व आप्तसुहृदांना कळवून टाकली होती. कदाचित् सरकारची ही बातमी बाहेर फुटल्यास लोकसमुदाय स्टेशनवर असंख्य प्रमाणात लोटेल हें आगाऊ हेरून स्टेशनवर मेलगाडीच्या वेळीं पोलीस बंदोबस्त उत्तम रीतीनें ठेवण्याचें त्या खात्यानें योजिलें होतें. पण यामध्ये गोविंदरावांनी पोलीसखात्याला व सी. आय्. डी. ला बेमालूम चकविलें. रेल्वेमार्गानेंच व मेलनेंच गंगाधरराव बेळगाव स्टेशनवर येणार अशी गोविंदराव याळगींची खात्री आहे आणि म्हणूनच ती शंभर टक्के खरी असली पाहिजे, असें सरकारनें निश्चित मानलें होतें. त्यामुळे सरकार निश्चित राहून सर्व बंदोबस्त त्याच धोरणानें करीत होतें.

गंगाधरराव कोणत्या गाडीनें पुण्याहून निघणार आहेत, त्यांच्यासाठीं बर्थ रिझर्व झालेली आहे आणि ते निश्चितपणे कोणत्या दिवशीं पुण्याहून निघणार वगैरे माहिती

पुण्याहून बेळगाव कलेक्टरला कळत होतीच. बेळगावहून गोविंदराव याळगी यांच्या कडून पुण्यास रोज निरोप जात येत असत. इतरांचीच काय, पण त्यांच्या सानिध्यात असलेल्या माझीहि अशी ठाम समजूत होती व खात्री झालेली होती की, आपण दुसऱ्या दिवशीं रात्रीं मेलनें बेळगावला जाण्यासाठीं निघणार आहोंत. मला याविषयीं जे जे लोक विचारीत त्यांना त्यांना मीहि तसेंच म्हणजे 'उद्या मेलनें निघणार आहोंत', असें सांगत असे. पुणें स्टेशनवर त्यांना हार वगैरे घालून निरोप देण्याचाहि विचार काहीं लोकांच्या मनात असावा असें मला वाटे. आणि माझ्याकडे होत असलेल्या चौकशीस मी त्याच भावनेनें सर्व माहिती पुरवीत असे.

**तात्यासाहेब कां हसत ?** : पुणें मुक्कामांतील गंगाधररावांचे शेवटचे दोन दिवस तात्यासाहेब बेळकर आपल्या घरून केसरीकडे जातांना तोंडाला उपरणें लावून का हसत जात असत याचें गूढ मात्र मला उकललें नव्हतें. आपल्या घराच्या दरवाजासमोर बसलेल्या सी. आय. डी. पोलिसाकडे पहात ते गालातल्या गालात हंसत जात येत असत. सी. आय. डी. त्यांला चुकवून पुण्याहून बेळगावला जाण्याची योजना ठरवण्यामध्यें श्री. दा. वि. तथा बाबूराव गोखले यांचाहि हात किंवा मनसुबा होता यांत शंका नाहीं. दुसऱ्या दिवशीं रात्रीं मेलनें जाण्यासाठीं गंगाधर रावांच्या सामानाची आवराआवर किंवा व्यवस्था करून ठेवण्यास मला आदले दिवशीं रात्रीं म्हणजे चोवीस तास अगोदरच सांगण्यांत आलें होतें. त्या वेळीं मात्र माझ्या मनांत शंका उत्पन्न झाली; वाटलें कीं, 'यांत काहींतरी भानगड आहे' असल्या प्रसंगीं नसती चांभारचौकशी अथवा 'वयस्ते बजे' कारभार करू नये एवढें मला माहीत होतें. योग्य वेळीं जरूर तेव्हा मला सर्व गोष्टी कळतीलच या विश्वासानें मी केवळ 'उग राहून जें जें होईल तें तें पाहण्याचें' ठरविलें. सामानसुमानाची आवराआवर व व्यवस्था करून ठेवली.

दुसऱ्या दिवशीं पहांटे चार वाजतांच घरची सर्व मंडळी झोंपून उठली. पुढें दहा मिनिटांच्या आंतच श्री. दा. वि. गोखले व त्यांचे बंधु गंगारामपंत गोखले आणि अतुकाका फडणीस हे तात्यासाहेब बेळकरांच्या घरीं आले. आतां मात्र माझी अधिकच खात्री झाली कीं, 'त्यांत काहींतरी भानगड आहे.' माझ्या स्वभावाला असल्या राजकीय भानगडी आवडत असल्यामुळें मी उत्साहानें सर्व कामें करीत होतों पहांटे सर्वांचा प्रातर्विधी आटोपल्यावर सर्वांचा चहा व अल्पोपहार म्हणजे 'छोटी हजेरी' झाली. 'काहीं थोडें खाऊन घे' असें मलाहि सांगण्यांत आलें, मग तर माझी चांगलीच खात्री झाली कीं, 'खास आज काहीं तरी गडबड आहे.' इतक्यांत तात्यासाहेब बेळकर सर्वांना उद्देशून म्हणाले, 'कसेंहि आज आपण लौकर उठलों आहोंत. आणि चहा व अल्पोपहारहि झालेला आहे. तेव्हां थोडें फिरायला जाऊन येऊ या कीं !!' आतां माझ्या मनांत शंका येऊं लागली. 'पहांटे फिरायला

आजच कां व कोठें जावयाचें ? काय बेत तरी काय आहे यापुढचा ?' माझें कुतूहल जागें झालें. मन चुळबुळ करूं लागलें. कोणीच कसें कोणीहि सांगत बोलत नाहीं ! कोणाला विचारून तरी पाहावें. असा विचार माझ्या मनात येतो आहे तोंच आम्ही सर्व मंडळी पहाटे फिरावयास निघालों. गांवाबाहेर चांगले मैलभर चालून गेल्यानतर तेथें एक मोटारगाडी मला दिसली. त्यात गंगाधरराव, बापुराव गोखले, अंतुकाका फडणीस, आणि मी स्वतः इतकी मंडळी बसलों. मोटार चालू होताच तात्यासाहेब केळकर म्हणाले, 'गंगाधरराव, या गाडींतून जरा फेरफटका करून लौकर घरीं परत या, बरें का !' हें तात्यासाहेबांचे बोलणें ऐकून मात्र मला हसूं आलें. ही सर्व बतावणी आहे, आम्ही या मोटारनेंच बेळगावला जात आहोंत, हें कळण्यास मला वेळ लागला नाहीं. पण मी एक शब्दहि बोललों नाहीं. अंतुकाका फडणीस याना मात्र या सर्व मानगडीचा मागमूसहि नव्हता. तात्यासाहेबांच्या तोंडून वरील वाक्य बाहेर पडताच अंतुकाकानीं सहज विचारलें, 'किती वाजेपर्यंत घरीं येऊन पोहोंचावयाचें आहे ?' या त्यांच्या प्रश्नाला कोणींच उत्तर दिलें नाहीं. तात्यासाहेब केळकर व गंगाराम गोखले दोघेहि घरीं परतले आणि आमची मोटार साताऱ्या रोखानें चालू झाली.

**मोटार कोणीं व कोठून आणिली ?**—ही सर्व योजना गोविंदरावानींच आखली होती. पुण्याहून निघणाऱ्या या लोकानीं ती मान्य केली होती. मोटारच्या नंबरनें माग काढता येऊ नये म्हणून ही मोटार साताऱ्याहून आणविली होती व पुण्याच गांवाबाहेरच उभी केली होती. मोटारचा ड्रायव्हर कऱ्हाडचा होता. बेळगावहून मोटार आणण्याचें मुद्दाम टाळण्यात आलें होतें. स्वतः गोविंदरावानीं बेळगावहून बाहेरगावीं जाण्याचें जाणूनबुजून टाळलें होतें. बेळगावमध्यें ही गोष्ट कोणालाहि माहीत होऊ दिलेली नव्हती. मोटार ज्या मालकाकडून मागून आणलेली होती त्यानाहि यापैकीं एकहि गोष्ट शेवटपर्यंत कळू दिलेली नव्हती. सुमारें अकरा वाजता सातारा शहराच्या अलीकडे सुमारें तीन मैल अंतरावर रस्त्याच्या बाजूलाच असलेल्या एका मळ्या-शेजारीं आमची मोटार येऊन थांबली.

आम्ही सर्वजण खाली उतरलों. मोटारड्रायव्हरलाहि उतरविलें. मग आम्ही सर्व मंडळी त्या मळ्यातील एका घरामध्यें जाऊन थांबलों. तेथें स्नानें उरकून घेण्यासाठीं गरम पाण्याची व्यवस्था केलेली होती. त्यानतर भोजनासाठीं केळीचीं पानें व पाट मांडून सर्व तयार ठेवलेलें दिसलें. त्या दिवशीं आम्हा सर्वांना श्री. दादासाहेब करंदीकर यानींच स्वतः जेवण वाढलें. हा दिवस ता. ११ ऑक्टोबर १९२१ चा दसऱ्याचा होता. आमचें सणाचें वनभोजन झालें ! तेथून निघताना श्री. दादासाहेब करंदीकर गंगाधररावाना कडकडून भेटले. आणि त्यानीं मोठ्या प्रेमभावानें निरोप दिला. आम्ही पुनः मोटारींत बसलों व तिनें पुढचा रस्ता धरला.

ही कल्पना गोविंदराव याळगी आणि त्यांच्या तालमींत तयार झालेले साथीदार यांच्यामध्यें पूर्णत्वानें असल्याचें प्रत्ययाला येते. वास्तविक मोटार फागल रस्ता सोडून कोल्हापूर शहरात शिरत आहे हें श्री. बाबुराव गोखले यांना प्रथमच समजावयाला हवें होतें, पण अनवधानानें ती चूक त्यांच्या लक्षात आली नाहीं. आपण कोल्हापूर शहरात शिरत आहोंत हें त्यांना उमगलेंच नाहीं. कोल्हापूरमध्यें त्या दिवशीं गंगाधरराव देशपांडे व बाबुराव गोखले पकडले गेले असते तर आगींतून सुटून फोफाऱ्यात पडल्यासारखें दोघानाहि झालें असतें. श्रीशाहूमहाराजांना ही गोष्ट कळल्यानंतर त्यांना काय वाटलें असेल व गंगाधररावांना पकडण्यासाठीं त्यांनीं किती तातडी व धावाधाव केली असेल याचें मनोरम चित्र वाचकानीं आपल्या डोळ्यांपुढें आणावें, म्हणजे आपलें चित्र प्रत्यक्षापेक्षा किती फिकें आहे याचा त्यांनाच प्रत्यय येईल. सत्य हें कल्पितापेक्षा नेहमींच भव्य दिव्य असतें याला ही कथा तरी कसा अपवाद होईल?

**बेळगांवच्या सरकारी डाकबंगल्यांत :** गंगाधररावांची मोटार बेळगाव पर्यंत सुखरूपपणें पोहोंचली. ते सरकारी डाकबंगल्यात येऊन पोहोंचण्यापूर्वींच बेळगावमधील पांचसात मंडळी तेथें येऊन बसली होती. त्यात श्री. भीमराव पोतदारहि होते. बेळगाव जिल्ह्यापुरते तरी ते सरकार आणि चळवळे लोक यांच्या मधील एक दुवा होत. त्यांच्यापासून सरकारपेक्षा चळवळ्या लोकांनाच जास्त फायदा झाला आहे, मदत झाली आहे. त्यांच्यामार्फत डाकबंगल्यामध्यें गंगाधररावांच्या चहाची व त्यांच्या विश्रांतीची गोविंदरावानीं व्यवस्था करविलेली होती. या डाकबंगल्यामध्यें कोण व केव्हा येणार आहेत याची खरी कल्पना सरकारला किंवा तेथें अगोदर येऊन बसलेल्या लोकांनाहि नव्हती. असलीच तर श्री. पोतदारांना मात्र थोडीबहुत माहिती असावी. तथापि त्यांना देखील पुण्यापासून बेळगावपर्यंतची सर्व योजना गोविंदरावानीं सांगितली असेल असें मला वाटत नाहीं. तो त्यांचा स्वभावच नव्हे. सायंकाळ झाल्यानंतर त्या डाकबंगल्यापासून मोगरींतूनच आम्ही सर्वजण गंगाधररावांच्या घरीं येऊन पोहोंचलों. या आगमनाचा पत्ता बेळगावच्या सी आय. डी. ला किंवा पोलीस खात्याला अद्यापि लागलेला नव्हता. आरंभापासून आतापर्यंत तरी गोविंदरावांची सर्व योजना व कार्यक्रम यथासांग आणि पूर्वनियोजनाप्रमाणें (According to plan) पार पडला. आतां फक्त सकाळपर्यंत याचा गांवात बोभाटा होऊं न देण्याचें कामच तेवढें शिल्लक राहिलें होतें.

यांत दुसऱ्याच्या दिवशीं गंगाधररावांच्या बहिणीचे जामात गदगचे डॉ. व्यंकटराव हुईलगोळ यानीं गंगाधररावांच्या मातोश्रींना सांगितलें हात कीं, "माझी प्रकृति थोडी बिघडली आहे. मला आज सायंकाळीं गरम पाण्याचें स्नान करावयाच आहे तेव्हां स्नानासाठीं गरम पाणी सायंकाळीं तयार ठेवा." गोविंदरावांच्या सांगण्याप्रमाणें

डॉ. त्र्यंबकराव हुईलगोळ यानीं घरीं तसें कळविलें होतें. गोविंदराव सांगतील तें का व कशासाठीं असेल हें न विचारतां, किंवा अधिक चांभारचौकशी न करता, तसें निमूटपणें वागायचें हा शिरस्ताच पहल्यासारखा झालेला होता. डॉ. हुईलगोळ यांना हें स्नानासाठीं गरम पाणी कशाकरता आहे याचा कांहींच मागमूस नव्हता. गंगाधरराव घरीं येऊन पोहोंचल्यानंतर व रात्रीं त्यानीं गरम पाण्यानें स्नान केल्यानंतरच गंगाधररावांच्या भगिनी, मातोश्री व डॉ. हुईलगोळ यांना तें गरम पाणी कोणासाठीं होतें याचा उलगडा झाला. गंगाधररावांच्या भगिनीनें डॉ. हुईलगोळ यांच्यावर व्यर्थच राजकारणाचा आरोप करून त्यांच्या गौरवार्थ म्हटलें कीं, 'आण्णाच्या (गंगाधररावांच्या) सहवासानें त्यांचें जामातहि राजकारणपटु झाले आहेत.' परंतु डॉ. हुईलगोळ यानीं लागलीच त्याचा अस्वीकार करून म्हटलें, मला खरोखरीच कांहीं माहीत नव्हतें. गोविंदरावांनीं जसें मला म्हणावयास सांगितलें तसें मीं म्हटलें, इतकेंच. यांत राजकारणपटुत्व येतेंच कोठें?' ही सर्व घटना आपल्या डोळ्यांसमोर घडलेली पाहिल्यानंतरच, डॉ. त्र्यंबकराव हुईलगोळ यांना कळून आलें कीं, आपल्याला गोविंदरावांनीं गदगहून बेळगांवला खास कां बोलावून घेतलें होतें.

गंगाधररावांना वाटत होतें कीं, इंग्रज सरकारचा आपल्यावर कितीहि डोळा असला तरी आपण आतापर्यंत त्यांच्या तावडींत सापडलों नव्हतों आणि म्हणूनच या खटल्यामध्यें आपल्याला १२४ अ प्रमाणें जास्तींत जास्त शिक्षा होणार आहे. याचें दुःख आपल्या मातोश्रींना फारच होणार आहे. शिवाय तशी विशेष कांहीं शिक्षा मला झाल्यास आपण तुरुंगांतून जिवंत बाहेर येऊच असें नाहीं; व तेवढ्याचसाठीं त्यांना आपल्या मातोश्रींच्या मनाची तयारी करावयाची होती. मोटारींतून उतरून घरात प्रवेश केल्याबरोबर गंगाधरराव घरांतील मागल्या खोलीमध्यें मातोश्रींबरोबर बोलत बसले. मला घरीं चोहोंकडे प्रवेश होताच. गंगाधररावांनीं सर्व परिस्थिति मातोश्रींना समजावून दिली. पुण्यापासून आपण येथपर्यंत कसे येऊन पोहोंचलों व कशासाठीं हें असें करावें लागलें, असें न करतों तर आपणाला कोठें पकडलें असतें आणि घराकडे पोलिसांनीं आपल्याला कां व कसें येऊं दिलें नसतें याची साद्यंत माहिती गंगाधररावांनीं आपल्या मातोश्रींना दिली. त्या वेळीं त्यांच्यामध्यें जें संभाषण झालें तें त्यांच्याच शब्दांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल.

**गंगाधरराव** : पण हें सर्व कांहींहि असलें तरी तुझ्या मनाच्या समाधानापुढें मला दुसऱ्या कशाचेंहि महत्त्व नाहीं. मीं काय करावें असें तुला वाटतें, तें मला सांग. मीं तुझ्या शब्दाच्या बाहेर नाहीं.

**मातोश्री** : मी काय सांगणार! मला त्यांत काय कळतें!

**गंगाधरराव** : मीं सरकारची माफी मागितली तर हें सर्व संकट टळेल. तू तसें सांगशील तर मी सरकारची माफीहि मागावयास तयार आहें!

**मातोश्री :** माफीच मागायची होती तर यात पडलास तरी कशाला ?

**गंगाधरराव :** मी माफी मागेन तर अब्रू जाईल, आपल्या घराण्याचें नांव कलंकित होईल आणि मीं आजपर्यंत केलेली निःस्वार्थ आणि निरपेक्ष देशसेवा मातीमोल ठरेल! पण मी केवळ तुझ्या शब्दासाठीं कोणताहि त्याग किंवा दिव्य करावयास तयार आहें.

**मातोश्री :** मला ही माफीची कल्पनाच ऐकवत नाहीं. तुझें माफी मागणें मला मुळींच पसत नाहीं. तू आलेल्या संकटाला धैर्यानेंच तोंड दिलें पाहिजेस. तू स्वत साठीं कांहींहि केलेलें नाहींस, म्हणून ईश्वरहि तुझा पाठीराखाच होईल. तुझ्यावर केवढेंहि मोठें संकट आलें तरी मी मुळींच डगमगणार नाहीं, किंवा त्याचें दु खहि करीत बसणार नाहीं तू लौकरच घरीं सुखरूप परत येशील अशी माझी श्रद्धा आहे ! !

गंगाधररावांनीं मातोश्रीच्या पायावर डोकें ठेवलें. मातेचा आशीर्वाद घेतला आणि त्यांना पाहिजे होतें ते मिळवल्याचा त्यांना आनंदहि झाला.

स्नेही, सहकारी, परिचित सर्वच गंगाधररावांच्या घरीं रात्रभर भेटावयास येत होते. सकाळीं मेलनें गंगाधरराव पुण्याहून येणार असल्यामुळें लोक त्यांच्या घरीं जात–येत आहेत. ते मेलनें येणार ही वार्ता गावभर पसरली असल्यामुळें बेळगाव स्टेशनवर पुष्कळच गर्दी होणार तेव्हा गावातील रस्त्यांचें, रहदारीचें नियंत्रण कसें करावें आणि लोकांचा बंदोबस्त रहावा यासाठीं पोलिसांची धावपळ व धावपळ गावात व विशेषत. गंगाधररावांच्या घरासमोर पहाटेपासूनच चालू झालेली होती. पहाटे पाच साडेपाचचे सुमारास गंगाधररावांनीं बेळगाव येथील कलेक्टरास पत्र पाठवून कळविलें, "In order to avoid fus on every station, I have reached here by car last night You can arrest me any time" हें पत्र पोहोंचल्यानंतर गंगाधररावांना अटक करण्याची सर्व व्यवस्था करण्याला पोलिसांना तीन तास लागले. तोंपर्यंत श्री गोविंदराव याळगी आणि 'तरुण भारत'चे संपादक श्री. बाबूराव ठाकूर यांना गावात गंगाधरराव कसे व केव्हां आले ही गोष्ट शहराच्या कोनाकोपऱ्यापर्यंत जाहीर करून टाकली. तोंपर्यंत बेळगावची जनता याच कल्पनेमध्यें होती की, गंगाधरराव सकाळीं मेलनेंच येणार आहेत व पोलीस त्यांना त्याच गाडीनें धारवाडला नेणार आहेत. पण आश्चर्य असें कीं, दोन तासांच्या अवधीत हजारों लोक गुरुवर्य गंगाधररावांच्या घरासमोर व रामदेवगल्लीमध्यें जमा झाले. गोविंदराव याळगी यांनीं कलेक्टर व पोलीसखात्यातें यांना सल्ला दिला, 'गंगाधररावांना अटक करतांना पोलीस पार्टी आणून लोकांमध्यें दंगाना करण्यापेक्षा एकाच पोलीस ऑफिसरला पाठवून गंगाधररावांना अटक करण्याचा विधी उरकण्यात यावा.' हा सल्ला मानण्याशिवाय पोलीसखात्याला गत्यंतर नव्हतें. लोकसमुदाय

सागराच्या लाटांप्रमाणें शुडीमुडीनें वाढतच गेल्यामुळें गोविंदराव याळगीसारख्या लोकपुढाऱ्यांचें धोरण व सल्ला याप्रमाणें वागूनच प्रसंग निभावून व शोभून नेणें पोलिसांनाहि अगत्याचेंच वाटलें.

**लोकसमुदायाची रास्त मागणी :** लोकसमुदाय इतका अलोट झाल्यानंतर, गंगाधररावांनीं बाहेर यावें व लोकांना उद्देशून दोन शब्द बोलावेत अशी लोकांनीं मागणी केल्यास नवल नाहीं. ही मागणी होत आहे इतक्यांत एक पोलीस अधिकारी गंगाधररावांच्या घरीं आले. त्यांनीं अटकेचा हुकूम दाखवून रीतसर अटक केली. लोकांना उद्देशून एक छोटासा संदेश श्री. बापुराव गोखले यांनीं लिहिला. तो गंगाधररावांनीं मंजूरहि केला. गंगाधररावांची त्यावर सही झाली आणि तो लोकांपुढें मोठ्या आवाजानें वाचून दाखविण्याचें काम माझ्यावर सोंपविण्यात आलें. माझा कंठ दाटून आल्यामुळें मला तो वाचवेना! तथापि प्राप्त कर्तव्य म्हणून मीं तो संदेश कसाबसा त्या तुफान लोकसमुदायापुढें वाचून दाखविला.

गंगाधररावांनीं आतां निघावें अशी गडबड पोलीस अधिकारी करूं लागले म्हणून म्हणा किंवा आतां सर्वांचे भेटणें वगैरे होऊन गेल्यामुळें म्हणा, आपल्या मातोश्रींच्या हातचे दोन घास खाल्ल्यानंतर कपडे वगैरे घालून गंगाधरराव पोलीस मोटारमध्यें जाऊन बसण्यास सिद्ध झाले. पोलीस मोटार दरवाजासमोर उभी ठेविलेली होतीच. त्या वाहनांत गंगाधररावांबरोबर धारवाडपर्यंत जाण्यास मला एकट्यालाच पोलिसांनीं परवानगी दिली. ही एकच गोष्ट गंगाधररावांच्या मातोश्रींना त्यातल्या त्यात थोडी समाधानाची वाटली होती. सरकारी पोलीसवाहनाच्या मागोमाग गोविंदराव याळगींची मोटारहि चालू झाली. कांहीं मैल गेल्यानंतर गोविंदरावांची मोटारगाडी पंक्चर झाल्यानें मागें राहिली आणि पोलीसमोटार पुढें निघून गेली. मोटारीचें चाक पंक्चर होतांच गोविंदरावांच्या तोंडून उद्गार निघाले, "पुण्याहून निघाल्यापासून तों आतांपर्यंत सर्व गोष्टी आमच्या मनाप्रमाणें होत आलेल्या आहेत. आणि ज्या अर्थी आतां आमची मोटार पंक्चर झाली आहे त्या अर्थी माझी अशी श्रद्धा आहे व मनोदेवताहि मला सांगते त्या अर्थीं पोलीस वाहनाच्या टायरमधीलहि हवा निघून गेली असली पाहिजे."

गोविंदरावांच्या मोटारीच्या चाकाचें पंक्चर निघालें. चाकांत पुनः हवा भरून घेतली आणि गोविंदरावांची फोर्ड गाडी चालू झाली. ती पोलीस वाहनाला गांठण्याच्या हेतूनें भरवेगांत धावूं लागली. पण अहो आश्चर्यम्! मोटार कांहीं मैल पुढें जाते न जाते तों सरकारी पोलीस मोटारहि आपल्या गाडीचें पंक्चर काढीत असलेलें दृश्य त्यांना दिसून आलें. त्या गाडीला कांहीं मदत पाहिजे किंवा काय याची विचारपूस करून गोविंदरावांची गाडी पुढें सरकली, निघूनहि गेली. गंगाधररावांना कोर्टापुढें हजर करण्यापूर्वीं गोविंदराव आणि त्यांचे सहकारी कोर्टांत हजरच होते.

अशा रीतीनें पूर्वसंकेतानुसार सर्व योजना शंभर टक्के पार पडली. पोलीस खात्याचे व सी. आय्. डी चे सर्व प्रयत्न आणि वारंवार पूर्णपणें विफल ठरले. त्या काळच्या या स्मरणास शब्दांत ग्रथित करीत असताना अनेक प्रसंगाच्या आठवणी माझ्या डोक्यामध्यें गर्दी करू लागल्या. त्या सर्वांना बाजूला सारून गंगाधररावाच्या दुसरा सीमोल्लंघनाचें हें प्रकरण मला येथेंच संपविणें भाग आहे.

योगायोग आणि दैवाचे खेळ खरोखरच मनुष्यशक्तीच्या पलीकडील गोष्टी आहेत. मनुष्यानें एक चिंतावें आणि दैवानें अन्य साधावें. परमेश्वरानें एका बाजूनें अनंत हातानीं द्यावें आणि कर्मानें सर्व दुसऱ्या दारानें लाटावें किती विचित्र न्याय आहे हा नियतीचा! गोविंदरावाच्या जीवनक्रमात असे प्रसंग पुनः पुनः का यावेत हें गूढ मनोधकांनीं विचार करण्यासारखें आहे. आपल्या कार्यांत यश आलें म्हणून परमेश्वराचे आभार मानावे कीं वधीं त्या प्रसंगातच पुत्र हरपला, कधीं पत्नी अंतरली म्हणून उदास व्हावें आणि आनंदावर विरजण पडावें! ही विधिघटना अतर्क्य आहे. आताहि तसेंच घडलें. रंगत च्या यशस्वी योजनेच्या धुंदींत आणि गंगाधररावाच्या सीमोल्लंघनाच्या या धादलींत असतानाच गोविंदरावाच्या कुटुंबांत श्री जीवनरावाचा तीन वर्षांचा मुलगा चि. जगन्नाथ व्हिहरच्या आजारानें बेशुद्ध होऊन (Coma) अश्विन शुद्ध नवमीचे रात्रीं निवर्तला. याच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे दसऱ्याच्या दिवशीं गोविंदरावाचे जीवलग स्नेही श्री. बळवंतराव नातू यांची पत्नी देवाघरीं गेली. हें सर्व सहन करून गोविंदरावानीं गंगाधररावाला धारवाडपर्यंत पोहोंचवलें आणि नंतर त्याच्या खटल्याच्या कामाकडे ते लागले. आपलें सर्व दुःख आवरून केवळ कर्तव्यबुद्धीनें फलाशा सोडून काम करणारा हा कर्मयोगी म्हणजे नातूंच्या स्वप्नांत दिसलेला गोरापान संन्याशी आहे याची कल्पना वाचकांना आता पटलीच असेल. धन्य आहे या महापुरुषाच्या संयमशक्तीची!!

गंगाधररावाचा खटला रीतसर मॅजिस्ट्रेट कोर्टांत सुरू होऊन सेशन कमिट करण्यात आला. धारवाडचे सेशनजज्ज मि. वॉटरफील्ड यांच्यापुढें हा खटला चालला. त्याची मनोहर कहाणी पुढील प्रकरणात दिली आहे. तीहि तितकीच स्फूर्तिदायक आहे.



प्रकरण चाळिसावें

# खटल्याच्या दिवसांतील कांहीं घटना

गंगाधररावांना अटक झाल्यापासून तों त्यांना शिक्षा होऊन त्यांची पाठवणी धारवाड तुरुंगातून विजापूर तुरुंगात होईपर्यंत मी गंगाधररावांच्या दिमतीला धारवाड येथेंच होतों. त्यांची आई व भगिनीहि धारवाडातच येऊन राहिल्या होत्या. सकाळीं चहा देण्यासाठीं, दुपारीं भोजन पोहोंचविण्यासाठीं, मधल्या वेळीं पुन: चहा द्यायला म्हणून आणि सायंकाळचें जेवण नेण्याकरता अशा प्रकारें रोज चार वेळा तरी मला तुरुंगात जाऊन यावें लागत असे. त्यासाठीं महिना साठ रुपये देऊन मी एक कायम भाड्याचा टांगा ठरविला होता. रोज त्यांचे सर्व कपडे धुण्याच्या हेतूनें मी आणीत असें व धुतलेले कपडे त्यांच्याकडे दुसरे दिवशीं घेऊन जात असे. त्यातून त्यांच्या पत्रांची ने-आण करता यावी ही माझी योजना होती. त्यांनीं तुरुंगातून बेकायदेशीरपणें मला लिहिलेलीं पत्रें 'अनुग्रह' या त्यांच्या पत्रसंग्रहाच्या पुस्तकात पत्र नं. १ ते १८ वर दिलीं आहेत. मला निदान चार वेळा तरी त्यांच्या तुरुंगातील खोलीमध्यें जाता येत असे. प्रत्येक वेळीं बरोबर एक पोलीस असावयाचा. पण तोहि पुढें पुढें माणसाळला म्हणजे आमच्या जाण्यायेण्यावर, बोलण्यावर सक्त नजर न ठेवता पूर्ण विश्वास ठेवून निर्धास्त राहूं लागला. गंगाधरराव दोन महिनेपर्यंत अंडरट्रायल म्हणजे गुमानींतील कैदी होते.

१. एके दिवशीं गंगाधररावांना उचकी लागली. ती दीड दिवसपर्यंत थांबलीच नाहीं. त्या वेळीं मी कोणाचीहि परवानगी न घेता तुरुंगाच्या डॉक्टरकडे आणि त्यांच्याच-बरोबर गंगाधररावांच्या खोलीमध्यें गेलें. तेवढ्यासाठीं एका पोलिसाला दोष दिला गेला.

२. नवलगुंदच्या अध्यक्षीय भाषणामध्यें गंगाधररावांनीं जे विचार मांडले होते त्यांपैकीं कांहीं मुद्द्यांवर सरकारनें आक्षेप घेतले होते. आणि तशाच प्रकारच्या आरोपावर शौकतअली महमदअलींना पंजाब हायकोर्टानें दोषमुक्त केले होतें. म्हणून अलीबंधूवरील खटल्याचें जजमेंट (निकालपत्र) मिळवून तें आपल्या खटल्यामध्यें येथील

कोर्टाच्या निदर्शनास आणावें, अशा विचारानें एके दिवशीं गंगाधररावांनीं मुंबई इलाखा सरकार व पंजाब हायकोर्ट याना तारा पाठविल्या. मीं त्या तारा नेहमीच्या मार्गानें तुरुंगातून आणल्या व तार ऑफिसातून पाठविल्या. धारवाडहून जाणाऱ्या तारा बेळगावमार्फतच पुढें पाठविल्या जातात. बेळगाव तार ऑफिसमध्यें गर्दे या नावाचे एक गृहस्थ तारा पाठविण्याच्या कामावर होते. त्यानीं त्या तारा पुढें न पाठविता, प्रथम त्याच्या प्रती गोविंदरावाच्याकडे पाठविल्या. गोविंदराव लागलीच एक मोटारकार घेऊन निघाले ते अकरा वाजण्यापूर्वी धारवाड तुरुंगाच्या दरवाजासमोर माझ्यापूर्वीच हजर झाले होते. मी सकाळीं अकरा वाजता गंगाधररावाचें जेवण घेऊन तुरुंगाच्या दारात जातों न जातों तोंच तेथें गोविंदराव मला दिसले. माझ्या हातातील ग्रेन भाडीं मीं त्याच्या हातीं दिलीं. व त्याना बरोबर घेऊन गंगाधररावाच्या बराकीमध्यें गेलों तेथें जाताच गंगाधरराव–गोविंदराव याच्यामध्यें पुढील संभाषण झालें.

**गोविंदराव :** आपण डिफेन्स देण्याची तयारी करीत आहात काय ?

**गंगाधरराव :** नाहीं. मुळींच नाहीं.

**गोविंदराव :** मग मुंबई सरकारला व पंजाब हायकोर्टाला तारा करण्याचें कारण काय ? त्या तारा बेळगावहून अद्यापि पुढें गेलेल्या नाहींत. त्या तारा परत घेतल्याच्या तारा आपण पुन: करान्यात असं मला वाटतें. आपण कॉंग्रेसचा ठराव विचारात घ्यावा

**गंगाधरराव :** मी डिफेन्स दिला तरी मला त्याचा फायदा मिळणार नाहीं तथापि सरकारी धोरण कसें अन्यायी आहे, हें दाखविण्यास त्या नकलाचा उपयोग होण्यासारखा आहे.

**गोविंदराव :** पण एवढेंहि आपण करू नये असें मला वाटतें.

**गंगाधरराव :** ठीक आहे ! मी आताच दुसऱ्या तारा लिहून देतों. त्या तारा तुम्हीं पाठवाव्यात.

गंगाधररावाच्या मनावर गोविंदरावाच्या निग्रही सूचनेचा सुपरिणाम झाला त्यानीं एक विस्तृत जबाब लिहून तोच फक्त कोर्टात वाचून दाखविण्याचें ठरविलें. व शेवटीं तसेंच केलें. गंगाधररावानीं दिलेल्या पहिल्या तारा मीं गोविंदरावाना विचारल्या वाचून करावयासच नको होत्या, असें त्या वेळीं गोविंदरावानीं मला स्पष्टपणें बोलून दाखविलें. त्यामुळें यापुढील खटल्याचें प्रत्येक पाऊल त्याना कळवूनच टाकावयाचें असें मींहि आपल्या मनाशीं ठरविलें.

३. कोर्टात वाचून दाखविण्यासाठीं तुरुंगामध्यें गंगाधररावानीं लिहिलेली जबानी केळकर व गांधीजी याना दाखवून आणण्यासाठीं श्री. बाबासाहेब सोमण याच्याबरोबर पुणें व वर्धा येथें पाठविण्यात आली होती. श्री. तात्यासाहेब केळकर यानीं त्यात काहीं सुधारणा सुचविल्या. आणि गांधीजींना ती जबानी बाबासाहेब सोमण यानीं वाचून

दाखविली. गांधींनीं सुचविलेल्या सूचना सोमणांनींच लिहून घेतल्या. मूळ जबानी आणि बेळकर व गांधींच्या सूचनांचे कागद बाबासाहेबांच्याकडून माझ्या हातां आले.

४. दुसऱ्या दिवशीं माझा रोजचा सर्वच कारभार बाहेर पडण्याचा प्रसंग आला होता. पण थोडक्यात बचावलें. नवलगुंदच्या ज्या भाषणाकरता गंगाधररावांच्यावर हा १२४ अ, प्रमाणें खटला भरण्यात आला होता तें भाषण त्या वेळच्या 'लोकमान्य' पत्रांत छापून आलें होतें. त्याचें कात्रणहि त्याच दिवशीं माझ्या हातीं आलें होतें. धुतलेल्या कपड्यांपैकीं सदऱ्याच्या खिशात तें कात्रण मीं ठेवलें होतें. त्याची जबानी व बेळकर व गांधीजींच्या सूचनाचे कागदमात्र माझ्या स्वत च्या अंगावरील कोटाच्या खिशात ठेवले होते. हातात धुतलेल्या कपड्याचें गाठोडें व थर्मासमध्यें चहा घेऊन नेहमींप्रमाणें मी तुरुंगात गेलों. धुऊन नेलेल्या कपड्यामधून मी काहीं जिन्नस व व कागद यांची ने आण करीत असतों, असा संशय तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना आला होता. म्हणून माझी झडती घेण्याच्या तयारीनें पोलीस हवालदार, दोनतीन पोलीस, जेलर व जेल सुपरिंटेंडेंट माझ्या येण्याची वाटच पहात होते. ते सर्व तुरुंगातील ऑफिसपुढील रस्त्यावर बाहेरच उभे होते.

मी तुरुंगाच्या दरवाजात पाऊल टाकताच, तें दृश्य पाहून, माझी आज झडती होणार व सर्वच महत्त्वाचे कागद सापडणार याची कल्पना मला आली. तथापि मीं मागें फिरणें मला योग्य वाटलें नाहीं. कारण त्यायोगें त्यांचा संशय पक्का झाला असता. मी तसाच रेटून पुढें गेलों. मला उद्देशून जेल सुपरिंटेंडेंट म्हणाले, "रोज कपड्यांतून तुम्हीं काहीं तरी अनधिकृतपणें आत आणून कैद्याला देत असता, असा संशय आलेला आहे. तेव्हां आज आपली झडती येथें घेतली जाणार आहे." यानंतर माझी झडती सुरू झाली. धुतलेल्या कपड्यांची झडती चालू असताना, ज्या सदऱ्याच्या खिशात वर्तमानपत्राचें कात्रण होतें तो सदरा झडतींतून चुकवावा किंवा वगळला जाईल अशी मीं पुष्कळ खटपट केली. पण तें साध्य झालें नाहीं. इतका प्रकार झाल्यानंतर मी तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना म्हटलं 'आता आपल्याला एक कात्रण सापडलेंच आहे. इतर कपड्यांची झडती पुरी होण्यापूर्वीं मी हा चहाचा थर्मास आत देऊन येतों. मगच पुढील कपड्यांची झडती व्हावी. त्यांना तें मान्य केलें. आणि एका पोलिसाला माझ्याबरोबर देऊन मला आत जाऊ दिलं. चहाचा थर्मास देताना मी माझ्या खिशांतील कागद गंगाधररावांना देण्यासाठीं पुढें केले. परंतु ते कागद आंतील पोलिसांनींच माझ्या हातून काढून घेतले. आत दरवाजाजवळ उभा असलेला पोलीस मला दिसला नव्हता. पण गंगाधरराव त्या पोलिसावर इतक्या मोठ्यानें ओरडले कीं, त्याच्या हातून ते कागद त्याला नकळत खालीं गळून पडले. ते सर्व उचलून घेऊन गंगाधरराव आपल्या बराकींत निघून गेले.

ही घटनाहि पोलिसानें तुरुंगाधिकाऱ्यांना कळविली. मी परत ऑफिसजवळ

गंगाधरराव : (कोर्टाला उद्देशून) तीन तास तर राहूं द्या. पण एकदां तरी त्यांना वाकतां येण्यासारखें आहे किंवा नाहीं याचें प्रात्यक्षिक करून पहावें.
हे साक्षीदार अगदींच चौरेनी व स्थूल होते. त्यांना सहजासहजीं वाकतां येण्यासारखें नव्हतें. कोर्टांत जज व इतर सर्व लोक हा संवाद ऐकून हंसले. असेंसरहि हंसले. आणि त्यांनीं आरोपी निर्दोषी आहेत असाच आपला अभिप्राय दिला.

६. कोर्टामध्यें जी लेखी जबानी दिली होती त्यांत गंगाधररावांनीं असें म्हटलें होतें कीं, 'हा खटला चालविण्यांत मीं मुळींच भाग घेतलेला नाहीं.' आणि ही उलटतपासणी तर गंगाधररावांनीं केली होती. म्हणजे ती जबानी खोटी ठरण्याचा प्रसंग होता. म्हणून पुढचें सर्व धोरण बांधून गंगाधररावांनीं कोर्टाच्या टेबलावरीलच दोन कोरे कागद मिळवले. आणि त्यावर तुरुंगांत जातांच एक अर्ज लिहिला. जबानीमध्यें जेथें 'मीं खटला चालविण्यांत मुळींच भाग घेतला नाहीं' असें म्हटलें आहे त्याच्या पुढें 'एका साक्षीदारास मीं विचारलेल्या चारपांच प्रश्नांना वगळतां' एवढा मजकूर जोडावा अशा तऱ्हेचा तो अर्ज होता.

रात्रीं बारा वाजतां तुरुंगांतील एक पोलीस आमच्या घरीं आला. त्यानें मला एक चिठी आणून दिली, व म्हणाला कीं, 'ही चिठी रावसाहेबांनीं आपल्यासाठीं दिली आहे. ती वाचून त्याप्रमाणें करा.' त्या चिठीवर कांहींच लिहिलेलें नव्हतें. त्या चिठीवरील चार कोपऱ्यात चार आकडे व मध्यावर वर्तुळात ३ असा तीनचा आकडा होता. धारवाड तुरुंगाचा बाहेरचा तट गोल आहे. म्हणून मीं त्याचा अर्थ लावला तो असा, 'मला तीन वाजतां तुरुंगांत बोलावलें आहे.' त्या शिपायाला मीं पांच रुपये दिले. त्या वेळीं तो म्हणाला, 'रावसाहेब म्हणाले होते कीं, घरीं तुला पांच रुपये देतील. इतर म्हणजे १,२ व ४ या तीन आकड्यांचा अर्थ मीं कसा लावला आणि तुरुंगांत बरोबर तीन वाजतां कसा गेलों याची विस्तृत माहिती मीं 'केसरी'मध्यें गंगाधररावांच्या मासिकश्राद्धादिवशींच्या आठवणीमध्यें दिलेली आहे. ती पुनः देण्यापेक्षा मी एवढेंच येथें सांगतों कीं, मी रात्रीं तीन वाजतां तुरुंगांत गंगाधरराव यांना भेटून त्यांच्याकडून तो अर्ज आणून, कोर्टाचे हेडक्लार्क श्री. कटी यांच्या घरीं पहाटे जाऊन त्यांना तो अर्ज कालच्या तारखेसच पोहोंचला आहे अशी वारीस त्यावर घालून मीं घरीं परत गेलों.

७. *निकालाच्या दिवशीं पुणें-बेळगांवचे लोक पुष्कळच धारवाडला आले होते.* गंगाधररावांचें वय ध्यानांत घेतां मि. वॉटरफील्ड यांनीं त्यांना केवळ सहा महिन्यांची साधी कैद फर्माविली. याचें सर्वांना आश्चर्य वाटलें व आनंदहि झाला. सर्व मंडळी रात्रीं एक वाजेपर्यंत गप्पागोष्टी करीत होती. त्यांत विष्णु दोपगिरी कोण्णूरहि होते. ही सर्व मंडळी शोरीं गल्लावर श्री. कोण्णूर यांचें धोरणें सुरू झालें. त्यांना भयंकर धोरण्याची व घोरतांना तोंड वेडेंवाकडें करण्याची सवय होती. त्याचें घोरणें ऐकण्यासाठीं बहुतेक

आल्यानंतर उरलेल्या कपड्यांची झडती सरविण्यात आली. अर्थात् त्यात अन्य काहीं नव्हतेंच. मग सांपडणार तरी काय? त्यानंतर अधिकाऱ्यांनी गंगाधररावांच्या बराकीची झडती घेण्याचें ठरविलें त्या वेळीं मलाहि तेथें हजर ठेवलें. पण तेथें त्या वरून घेतलेल्या झडतींत त्यांना काहींच मिळालें नाहीं. इतके कागद दहा मिनिटांच्या आंत गंगाधररावांनी कसे काय नाहींसे केले असावेत याचें मलाहि गूढच पडलें होतें. अधिकाऱ्यांनी गंगाधररावांना एका शब्दानेंहि काहीं विचारलें नाहीं. मला मात्र पुन्हा तुरुंगात न येण्याबद्दल अधिकाऱ्यांनी सांगितलें. त्याच दिवशीं श्री. मजली वकील व गोविंदराव मिळून धारवाडला आले होते. त्यांना ही गोष्ट कळताच ते तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना भेटले. त्यांचे तेथें काय बोलणें झालें तें मला माहीत नाहीं. पण परिणाम मात्र असा झाला कीं, मला पूर्ववत् रोज चार वेळा तुरुंगात जाण्यास परवानगी मिळाली. त्यानंतर मीहि अधिक हुषारीनें वागू लागलों. या घटनेनंतर मीं यासंबंधीं गंगाधररावांना कितीतरी वेळा विचारलें असेल कीं, तुम्हीं ते इतके कागद कोठें ठेविले होते? मला प्रत्येक वेळीं त्यांनीं काहींहि उत्तर न देता केवळ झिडकारलेलें आहे. पण एकदा त्यांनीं ते आपलें गुपित मला सांगितलें. ते कागद आतील पोलिसाच्या युनिफॉर्ममध्येंच त्यांनीं ठेवले होते.

५. कोर्टात खटला चालू झाल्यानंतर ज्ज मि. बॉटरफील्ड यांच्यापुढें असाच एक गमतीदार प्रसंग घडला होता. सर्वच साक्षीदार सरकारनें बनावट व पढवून आणलेले होते. हें त्यांची झालेली सरतपासणी ऐकून कोणाच्याहि ध्यानात येण्यासारखें होतें. एक साक्षीदार शिकलेला, अत्यंत स्थूल व गिड्डा होता. त्याची उलटतपासणी करण्याचा मोह गंगाधरराव यांना आवरला नाहीं. त्याची उलटतपासणी खालीलप्रमाणें झाली.

**गंगाधरराव** : आपण नवलगुंदच्या सभेला हजर होता काय? माझ्या भाषण किती वेळ झालें? सभेमध्यें आपण कोणाशेजारीं बसला होता?

**साक्षीदार** : मी सभेला हजर होतों. आपलें भाषण तीन तास झालें. मी कोणाजवळ बसलों नव्हतों. मी बाहेर दरवाजातून लक्षपूर्वक ऐकत होतों. आंत सभेमध्यें मी आलों नव्हतों.

**गंगाधरराव** : आपण जेथें उभे होता तेथून व्याख्यात्याचा चेहरा दिसत होता काय? व्याख्यात्याचा चेहरा दिसल्याशिवाय व्याख्यान लक्षपूर्वक ऐकणें शक्य आहे काय?

**साक्षीदार** : व्याख्यात्याचा चेहरा दिसल्याशिवाय व्याख्यान लक्षपूर्वक ऐकणें शक्य नाहीं हें मला मान्य आहे. मी जेथें उभा होतों तेथून वाकून पाहिल्यास मला व्याख्यात्याचा चेहरा दिसत होता.

**गंगाधरराव** : मग व्याख्यानाकडे आपलें लक्ष मधून मधूनच जात असेल!

**साक्षीदार** : नाहीं. तीन तासपर्यंत मी सारखा वाकून उभा होतों.

**गंगाधरराव :** (कोर्टाला उद्देशून) तीन तास तर राहू द्या. पण एकदा तरी त्याना वाकता येण्यासारखें आहे किंवा नाहीं याचें प्रात्यक्षिक करून पहावें.

हे साक्षीदार अगदींच चौकोनी व स्थूल होते. त्याना सहजासहजीं वाकता येण्यासारखें नव्हतें. कोर्टांत जज्ज व इतर सर्व लोक हा संवाद ऐकून हसले. असेसरहि हसले. *आणि त्यानीं आरोपी निर्दोषी आहेत असाच आपला अभिप्राय दिला.*

६. कोर्टामध्यें जी लेखी जबानी दिली होती त्यात गंगाधररावांनीं असें म्हटलें होतें कीं, 'हा खटला चालविण्यात मीं मुळींच भाग घेतलेला नाहीं' आणि ही उलटतपासणी तर गंगाधररावानीं केली होती. म्हणजे ती जबानी खोटी ठरण्याचा प्रसंग होता. म्हणून पुढचें सर्व धोरण बांधून गंगाधररावाना कोर्टाच्या टेबलावरूनच दोन कोरे कागद मिळवले. आणि त्यावर तुरुंगात आताच एक अर्ज लिहिला. जबानीमध्यें जेथें 'मीं खटला चालविण्यात मुळींच भाग घेतला नाहीं' असें म्हटलें आहे त्याच्या पुढें 'एका साक्षीदाराला मीं विचारलेल्या चारपाच प्रश्नाना वगळता' एवढा मजकूर जोडावा अशा तऱ्हेचा तो अर्ज होता.

रात्रीं बारा वाजता तुरुंगातील एक पोलीस आमच्या घरीं आला. त्यानें मला एक चिठी आणून दिली, व म्हणाला कीं, 'ही चिठी रावसाहेबानीं आपल्यासाठीं दिली आहे. ती वाचून त्याप्रमाणें करा.' त्या चिठीवर काहींच लिहिलेलें नव्हतें त्या चिठीवरील चार कोपऱ्यात चार आकडे व मध्यावर वर्तुळात ३ असा तीनचा आकडा होता. धारवाड तुरुंगाचा बाहेरचा तट गोल आहे. म्हणून मीं त्याचा अर्थ लावला तो असा, 'मला तीन वाजता तुरुंगात बोलावलें आहे.' त्या शिपायाला मीं पाच रुपये दिले. त्या वेळीं तो म्हणाला, 'रावसाहेब म्हणाले होते कीं, घरीं तुला पाच रुपये देतील. इतर म्हणजे १, २ व ४ या तीन आकड्याचा अर्थ मीं कसा लावला आणि तुरुंगात बरोबर तीन वाजता कसा गलों याची विस्तृत माहिती मीं 'केसरी'मध्यें गंगाधररावाच्या मासिकश्राद्धादिवशींच्या आठवणीमध्यें दिलेली आहे. ती पुनः देण्यापेक्षा मी एवढेच येथें सांगतो कीं, मी रात्रीं तीन वाजता तुरुंगात गंगाधरराव याना भेटून त्याच्याकडून तो अर्ज आणून, कोर्टाचे हेडक्लार्क श्री. कट्टी याच्या घरीं पहाटे जाऊन त्याना तो अर्ज काल्च्या तारखेसच पोहोंचला आहे अशी तारीख त्यावर घालून मी घरीं परत गलों

७. निकालाच्या दिवशीं पुणें-बेळगावचे लोक पुष्कळच धारवाडला आले होते. गंगाधररावाचें वय ध्यानात घेता मि. वॉटरफील्ड यानी त्याना केवळ सहा महिन्याची साधी कैद फर्मावली. याचें सर्वांना आश्चर्य वाटलें व आनंदहि झाला. सर्व मंडळी रात्रीं एक वाजेपर्यंत गप्पागोष्टी करीत होती. त्यात विष्णु देवगिरी कोण्णूरहि होते. ही सर्व मंडळी झोपीं गल्यावर श्री. कोण्णूर याचें घोरणें सुरू झालें. त्याना भयंकर घोरण्याची व घोरताना तोंड वेडेंवाकडें करण्याची सवय होती. त्याचें घोरणें ऐकण्यासाठीं बहुतेक

मंडळी आपापल्या ठिकाणीं उठून बसली. घोरणें ऐकून ल्हान मुलें तर भिऊनच पळालीं असतीं. पुष्कळाच्या हशाचा इतका आवाज झाला तरी श्री. कोण्णूर याना जाग आली नाहीं, पण त्या हास्यकल्लोळाच्याहिपेक्षा चढया सुरात कोण्णूरांचें घोरणें अखंड चालू होतें.

शेवटीं बाबूराव गोखले मला म्हणाले, "दुसरी जाजमें किंवा गुडारें पुरेशीं आहेत काय? म्हणजे आम्ही सर्वच मंडळी खालीं जाऊन निर्वोर झोपू." घरीं जाजमें होतीं. मीं तशी व्यवस्था करून दिली. सर्वच मंडळी माडीवरून खालीं तळमजल्यावर गेली व आराम झोपली. कांहीं वेळानें कोण्णूर याना जाग आली. त्याना दिसून आलें कीं, तेथें कोणीच झोपलेलें नाहीं. सर्वजण तळमजल्यावर झोपले आहेत. तेव्हा त्याना वाटलें कीं, आपणहि खालीं जाऊन झोपावें. ते खालीं आले व मोकळी जागा पाहून तेथें झोपले. कांहीं वेळ गेल्यानतर त्यानाहि झोप लागली. साहजिकपणें त्यानीं पूर्ववत् घोरासुराचें आख्यान लावलें. तेव्हा सर्व लोक पुनः जागे झाले. पुनः हशा पिकला आणि एकेक जण पुनः माडीवर जाऊन निद्रावश झाला. प्रात काळीं झोपून उठताच कोण्णूर याना पुनः आढळून आलें कीं, ते एकटेच तळमजल्यावर झोपले आहेत. तें पाहून आपण स्वप्नात तर नाहींना! त्याची खात्री करून घेण्यासाठीं स्वत.लाच त्यानीं एक चिमटा घेतला. आपण स्वप्नात नाहीं याची पूर्ण खात्री करून घेतली आणि ते पुन' माडीवर गेले! तेथें त्याना सर्व लोक झोपेंत गाढ झालेले दिसले. आता कोण्णूरांची झोप उडाली व ते स्वतःशींच विचार करू लागले. तेव्हा तरी त्याच्या ध्यानात खरें कारण आलें असेल काय! त्यानीं हलकेच आपल्या मित्राला विचारलें कीं, 'मी झोपेंत घोरतों काय?'

८. धारवाड तुरुंगातून विजापूरच्या तुरुंगात सरकार गंगाधररावाना घेऊन जाणार होतें. मला त्याच्याबरोबरच विजापुरापर्यंत जावयाचें होतें. परंतु बातमी नक्की करण्यासाठीं रोज धारवाड तुरुंगाकडे जाऊन, कोणत्या दिवशीं व कोणत्या गाडीनें गंगाधरराव याना विजापूरला नेणार आहेत याचा पूसतपास मी करीत असे. पण मला त्यात यावें तसें यश आलें नाहीं. पण एक युक्ति मात्र मीं केली. प्रत्येक गाडीला माझें सामान घेऊन जावें व तिकीट काढावें व गाडी निघून गेल्यावर तें तिकीट परत करावें, असा क्रम चालू ठेवला. परंतु ज्या दिवशीं गंगाधररावाना विजापूरला नेण्यात आलें त्याच गाडीमध्यें हुबळीपर्यंत गोविंदरावहि होते. ही आश्चर्याची गोष्ट होती. म्हणजे बेळगावात बसून माझ्यापेक्षा गोविंदरावानीं पक्की बातमी मिळवलेली होती. गोविंदरावाची असली करामत कांहीं औरच होती. माझ्या त्या युक्तीमुळें मी गंगाधररावाच्याबरोबर विजापुरापर्यंत गेलों होतों, हें काय वर्णन करून सांगायला हवें!



प्रकरण एकेचाळिसावें

# आतां अधिक जोमानें काम चालू झालें !

गंगाधररावांना फक्त सहा महिनेच साध्या कैदेची शिक्षा झाली. पण तेवढ्याहि अवधीमध्यें त्यांना धारवाडहून विजापूर तुरुंगांत व विजापूरहून पुण्यास येरवडा तुरुंगांत नेण्यांत आलें. पुढें डिसेंबरमध्यें अहमदाबाद कॉंग्रेसचें अधिवेशन व्हावयाचें होतें. त्या कॉंग्रेसच्या अधिवेशनासाठीं गोविंदराव आपल्या मित्रमंडळीसह मुद्दाम गेले होते. गंगाधरराव तुरुंगांत असल्यामुळें जमनालालजी बजाज वगैरेंशीं जबाबदारीनें गोविंदरावांनाच बोलावें लागलें. अर्थात् त्यांच्याशीं गोविंदरावांचा परिचय वाढला, ते अधिक जवळ आले.

सन १९०९ पासून अदृश्य अथवा भूमिगत असलेले श्री. गोपाळराव पाचलग या अधिवेशनाच्या वेळींच गोविंदरावांना भेटले. गंगाधररावजींवरील खटल्याच्या वेळीं त्यांच्या हालचालींसंबंधीं पोलिसांनीं माहिती काढली होती आणि त्या अनुरोधानें ज्यांची साक्ष गंगाधररावांच्या विरुद्ध पोलीस करविणार होते तेच हे गोपाळराव पाचलग होत. त्या कॉंग्रेस अधिवेशनाच्या वेळीं साबरमतीचा गांधी आश्रम व कॉंग्रेसचा सोहाळा पहाण्यासाठीं श्री. जीवनराव यांनाहि गोविंदरावांनीं बेळगांवाहून अहमदाबादला बोलावून घेतलें. 'एक वर्षात स्वराज्य' ही घोषणा म. गांधी यांनीं याच वेळीं केली होती.

अहमदाबादच्या अधिवेशनानंतर असहकारितेच्या आंदोलनाला अधिक जोर चढला होता. वकिलांनीं वकिली सोडावी, सरकारला कसलीहि मदत करूं नये, अशा प्रकारचा असहकार पूर्णपणें पुकारला. कित्येक नामांकित वकिलांनीं आपला व्यवसाय बंद ठेवला—सोडून दिला. अनेक विद्यार्थी राष्ट्रीय शाळेंत जाऊं लागले. घरोघरीं चरखा फिरूं लागला. खादीचा वापर आणि स्वदेशीचा प्रचार सुरू झाला. अशा वेळीं सरकार गांधीजींना फार वेळ बाहेर ठेवील हें शक्यच नव्हतें.

**बेळगांवची राष्ट्रीय शाळा व स्वराज्याश्रम :** असहकारितेचा ठराव मंजूर होऊन असहकाराचें युग सुरू होतांच गोविंदरावांनीं बेळगांवांत टिळकवाडी येथें

'स्वराज्याश्रम' व 'राष्ट्रीय शाळा' अशा दोन संस्था स्थापन केल्या. या संस्थासाठी गोविंदरावांनीं आपला टिळकवाडी येथील बंगला खाली करून वापरावयास दिला व आपल्या घरचीं मुलें राष्ट्रीय शाळेंत दाखल केलीं.

**स्वराज्याश्रम :** या स्वराज्याश्रमामध्यें एकंदर पस्तीस कार्यकर्ते होते. या आश्रमाचे व्यवस्थापक म्हणून श्रीपुंडलीकजी हे काम पहात होते. गांधीजींच्या आश्रमाप्रमाणें प्रात काळीं व सायंकाळीं प्रार्थना चालत असे. आश्रमवासी कार्यकर्ते आळीपाळीनें आश्रमातील स्वयंपाकगृह चालवीत असत. बेळगावमध्यें कोणीहि पुढारी आल्यास त्यांची भेट आश्रमास व राष्ट्रीय शाळेस गोविंदराव करवून देत असत असहकारितेच्या आंदोलनास या संस्थांचा उपयोग करून घेतला जात असे. एकटेच म्हणजे अविवाहित असलेले शिक्षक आश्रमातच भोजन करीत असत. कांहीं परगावचे विद्यार्थीहि या आश्रमात राहूनच आपला या शाळेतील विद्याभ्यास करात असत.

बेळगावात रा. ब. रंगोपंत नाईक या नावाचे एक वकील होते. त्याना गावात *'टायगर वकील' असेंहि म्हणत असत. एकदा त्यांच्या घरीं चोरी झाली.* दुसऱ्याच दिवशीं मी कांहीं कामानिमित्त त्यांच्या घरीं गेलों असता, त्यांच्या घरीं भोजनें चालू होतीं. त्यामुळें त्यांनीं मला भोजनाच्या ठिकाणींच बोलावून घेतलें व तिथेंच बसण्यासाठीं पाटहि मांडला. *जेवताना बोलणीं चाललीं असता आदले दिवशीं झालेल्या* चोरीचें बोलणें सहज निघालें. त्यांच्या पत्नीला मी कोण व का आलों होतो याची कल्पना नव्हती. बोलण्याच्या ओघात चोरी कोणीं केली असावी याविषयीं तर्कवितर्क चालू होते. तेव्हा वकिलांच्या पत्नी सहज म्हणाल्या कीं, 'टिळकवाडी' येथें एक 'स्वराज्याश्रम' आहे. तेथील लोक लठ्ठ पीळदार दंडवाले आहेत. ते स्वत आश्रमातील लाकडे फोडतात, आणि आपलीं कामें स्वत.च करतात. त्यांच्या पैकींच कोणींतरी ही चोरी केली असावी. टायगर वकील आणि मी तो अंदाज ऐकून पोट धरधरून हसू लागलों. मग टायगर वकिलांनी आपल्या पत्नीला सांगितलें, *'त्या स्वराज्याश्रमाचे व्यवस्थापक म्हणून हेच काम करात असतात. याचें नाव* पुंडलीकजी ! !' एवढें ऐकताच त्या ज्या आत गेल्या त्या मी तेथें असेपर्यंत कांहीं त्या स्वयंपाकगृहात परतल्या नाहींत. पुढे माझें काम झाल्यामुळें मी तेथून निघून गेलों स्वराज्याश्रमातील लोकांकडे पाहण्याची लोकदृष्टि त्या काळीं कशा प्रकारची होती हें दाखविण्यासाठींच हें उदाहरण म्हणून दिलें आहे. अशा प्रतिकूल परिस्थितींत स्वराज्याश्रमाचें काम चालवणें व देशसेवा करणें किती *कठीण* काम होत याची ओझरती कल्पना आली तरी पुरे. यावरूनच गोविंदरावाना आपल्या देशभक्तीचे मळे पिकवावयाचे होते. अस्पृश्यतेचें उच्चाटन व हरिजनांची साक्षरता, प्रौढशिक्षणप्रसार खादीविणाई, सूतकताई, स्वावलंबन, स्वदेशी, साधी राहणी व उच्च विचारसरणी

या तत्त्वाचें परिपालन वगैरे किती तरी साध्या पण महत्त्वाच्या गोष्टी या आश्रमाद्वारें शिकविल्या व केल्या जात. राष्ट्रीय शिक्षण हा सुद्धा त्यातीलच एक भाग होता.

**राष्ट्रीय शाळा :** 'श्रीटिळक विद्यालय' हें राष्ट्रीय शाळेचें नाव होतें. या राष्ट्रीय शाळेत प्रारभीं प्रारभीं २०० पर्यंत विद्यार्थी असून सरासरी पधरावीस शिक्षक शिक्षणदानाचें काम करीत. या शाळेंत प्रवेशपरीक्षेपर्यंतचें पुस्तकी शिक्षण आणि विणकाम, रगकाम, थोडेंसे वैद्यक, सुतारी वगैरे व्यावसायिक ज्ञानहि दिलें जाई. सर्व शिक्षण मातृभाषेंतूनच दिलें जाई. आणि शास्त्रीय शिक्षण देण्यासाठीं लागणारीं पाठ्यपुस्तकें मराठींत नाहींत म्हणून जी आज सारखी हाकाटी केली जाते ती त्या वेळीं मुळींच नव्हती. उलट अनुभव असा आहे कीं, इग्रजी पुस्तक आधाराला असलें तरी मुलानीं त्या वेळीं मातृभाषेंतून घेतलेलें ज्ञान त्याच्या मनावर पक्कें ठसत असे. शब्दाची अडचण कधींच भासली नाहीं असें म्हणण्यापेक्षा सुसुटीत प्रतिशब्द मिळेपर्यंत इग्रजी शब्द वापरूनच सर्व काम भागविलें जाई. यामुळें विषयाचें ज्ञान मुलाना अधिक चागल्या प्रकारें होई. विद्यार्थ्यांच्या शीलसवर्धनाकडेच विशेष लक्ष पुरवलें जाई, त्यामुळें या शाळेंतून बाहेर पडणारा विद्यार्थी गुरुजनाविषयींचा आदर घेऊनच बाहेर पडत असे आणि जगाच्या व्यवहारात आत्मविश्वासाच्या जोरावर तो कधीं मागें पडला आहे असें झालेलें नाहीं. किंवा ज्या कोणत्या धद्यात तो राहिला तेथेंहि त्यानें आपलें स्वत:चें असें स्थान निर्माण केलेलेंच दिसून येतें.

या राष्ट्रीय शाळेमध्यें खालील कार्यकर्ते शिक्षक म्हणून काम करीत होते.

१. श्री. सदाशिव लक्ष्मण सोमण : हे शाळेचे मुख्याध्यापक होते. सागली संस्थानचे माजी न्यायालयीन अधिकारी, गगाधररावाचे सहकारी. गाधीजींचे चपारण्यातील एक कार्यकर्ते. साध्या राहणीचे सत्प्रवृत्त काँग्रेस कार्यकर्ते.

२. श्री. केशव गोविंद गोखले : असहकारितेंत कॉलेज सोडलें. पहिल्या खेर मत्रिमडळाचे एक उपमत्री. इतिहास व राजकारणाचे अभ्यासू. रशियासबधीं सात विभागात माहिती देणाऱ्या ग्रथाचे लेखक, वकील.

३. श्री. हरि वामन लिंडे : असहकारितेमुळें कॉलेज सुटलें. सुप्रवस्तु वकील.

४. श्री. गजानन अनत घैसास : वाईच्या 'केवलानद' याच्यापाशीं शास्त्राध्ययन, वेदान्ताचे अभ्यासी. वैद्य. स्वत:ला 'भारद्वाज' म्हणवतात.

५ श्री. त्रिबकराव देशपाडे : असहकारानें कॉलेजवर बहिष्कार. वकील.

६. श्री. पुडलीकजी कातगडे : गगाधरराव देशपाडे याचें शिष्यत्व. अनेक लहानमोठ्या पुढाऱ्याचे परिचित. म. गाधींच्या साबरमती आश्रमात शिक्षण घेतलेले व त्यापूर्वी चपारण्यामध्ये सत्याग्रही म्हणून काम केलेले. राजेंद्रबाबूच्या हाताखालीं काम केलेले. 'हिंदी शिक्षक' व्याकरणाचे लेखक, हिन्दी मराठी कोशाचे कर्ते. कन्नड मराठी कोशलेखक. अनेक

धाकटमोठ्या राजकीय पुस्तकाचे लेखक. 'पुंडलीक' या आत्मचरित्राचे नायक.

७. श्री. कृष्णशर्मा बेटिगिरी : सुप्रसिद्ध कानडी कवि, अनेक काव्यपुस्तकांचे व कथाकादंबऱ्यांचे लेखक. 'जयकर्नाटक' मासिकाचे संपादक.

८. श्री. शंकर श्रीकृष्ण लेले : असहकारात कॉलेज सुटलें. नागपूर झेंडा सत्याग्रही. वकील.

९. श्री. कोण्णूर बंधु : खादीभांडार व सुदर्शन चरखाल्याचे पहिले चालक. कॉलेज बहिष्कारी वकील.

१०. आप्पाण्णा मजली : कॉलेज सुटल्यावर काँग्रेसकार्य.

११. श्री. सहस्रबुद्धे : सुतारशिक्षक.

१२. श्री. दादा काळे : कॉलेज सोडून विविध काँग्रेसकार्य, विणकामशिक्षक. पुढें काँग्रेस सरकारचे दारुबंदी अधिकारी व समाजसेवक.

१३. श्री. कुलकर्णी : सूतकताई व विणकामशिक्षक.

१४. श्री. यकुंडी मास्तर : असहकारामुळें कॉलेज सोडलें. एक थोर शिक्षक.

१५ श्री. वा. म्य. भाटे : शैक्षणिक कार्यकर्ते. सांगलीच्या बी. टी. कॉलेजचे कांहीं काळ प्रिन्सिपॉल.

१६. प्रो. बाळासाहेब मोर्डेकर : साहित्याचे अभ्यासी. तत्त्वज्ञानाचे खोल अभ्यासी, शिक्षणतज्ज्ञ व समाजसेवक.

१७. श्री. कट्टी : कानडशिक्षक.

१८. श्री. नारायणस्वामी : रंगकामशिक्षक. वनस्पतीपासून रंग बनवीत.

ही राष्ट्रीय शाळा सन १९२० ते १९२५ पर्यंत चालली. अनेक प्रसंगीं शाळेच्या खोल्यांतून शिक्षण देण्यापेक्षा, एखाद्या झाडाच्या सावलीखालीं सर्व वर्ग घेऊन विद्यार्थी व शिक्षक बसत, आणि शिक्षणदानाचें काम चालत असे अशा मोकळ्या हवेंतील शिक्षणाचा परिणाम अधिक होई. वाऱ्याच्या झोतात विद्यार्थी ताजेतवाने रहात व पाठाचें ग्रहण मनःपूर्वक होई. पौराणिक ऋषिकालीन गुरुकुल पद्धतीचें अनुकरण करण्याकडेच त्या काळीं विशेष प्रवृत्ति होती. थोर पुरुष, साधुसंत आणि मोठे राष्ट्रभक्त यांच्या जयन्त्या अगर स्मृतिदिन अनेकदा या विद्यालयात होत असल्यामुळें त्यांच्या चरित्राचा वा चारित्र्याचा विद्यार्थ्यांच्या मनावर सुसंस्कार झाल्याखेरीज राहात नसे. त्यामुळें विद्यार्थी साहजिकच बहुश्रुत होत असत. बेळगावसारख्या ठिकाणीं देखील सबंध पावसाळ्यामध्यें या विद्यालयातील विद्यार्थी व शिक्षक छत्र्याऐवजीं कांबळींच वापरीत असत.

त्या वेळीं याळगींच्या घरीं मोटार होती. गावांतून टिळकवाडीकडे जाताना ती आढळली तर 'आमची मोटार आली' 'आमची मोटार आली' अशा आनंदात

शाळेस निघालेले विद्यार्थी त्या मोटारींत शिरत, व शाळेपर्यंत येत असत. याळगी मंडळीहि मोठया प्रेमानें मुलांना मोटारींत घेत असत. या प्रकारें त्या मोटारींत किती मुलें येत आहेत याकडे कधींहि त्यांनीं मोजण्या दृष्टीनें पाहिलें नाहीं.

राष्ट्रीय शाळेंत विद्यार्थी गेल्यास त्याच्या शिक्षणाचें व जीवनाचें मातेरें होतें या झालें असा प्रवाद त्या काळीं तरी विशेषसा नव्हता. तसें असतें तर श्री टिळक विद्यालयात जीं इतकीं मुलें आलीं तीं त्यांच्या पालकांनीं पाठविलींच नसतीं. परंतु हा प्रचार त्यानंतरच्या काळातील आहे. इंग्रज सरकारनें या राष्ट्रीय विचाराच्या मुलांना आपल्या कोणत्याहि खात्यात नोकरी देण्याचें नाकारलें; तेव्हा मध्यमवर्गीय समाजानेंच हा गिल्ला केला आहे. नोकरी हेंच जीवनसर्वस्व मानणाऱ्या या दुबळ्या जीवाची कींव करावी कीं इंग्रजी शासनानें आपलें जिणें किती परावलंबी करून टाकलें होतें याचा तो पुरावा मानावा हें ज्याचें त्यानेंच ठरवावयाचें आहे. पण राष्ट्रीय शाळेतील विद्यार्थ्यांच्या जीवनाचा आज आढावा घेतला तर, ती विद्यार्थ्यांच्या जीवनाच्या नुकसानीची ओरड फुकट व निराधार आहे असेंच दिसून येईल. सरकारी शाळांतून ज्यांना आपल्या जीवनाचें सोनें झालें किंवा जीवित कृतार्थ झालें असें वाटलें, त्याच्या प्रमाणाशीं राष्ट्रीय शाळेच्या शिक्षणातून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांचें प्रमाण मुळींच कमी भरणारें नाहीं. हें पुढील काहीं उदाहरणावरून कोणाच्याहि निःपक्ष मनाला पटण्यासारखें आहे. राष्ट्रीय शाळेंत त्यांच्यावर झालेले शुभसंस्कार बाजूला सारले तरी ते विद्यार्थी स्वतःच्या पायावर उभे राहिले हें नाकारता येणार नाहीं. काहीं विद्यार्थी परदेशात जाऊन वैद्यकविद्या शिकून आले, व काहीं येथेंच वैद्य-डॉक्टर झाले. अशा विद्यार्थ्यांपैकीं डॉक्टर बेंद्रे हे जर्मनीमध्यें चार वर्षें राहून विद्याभ्यास करून आले व त्याचें बेळगाव येथें आज रुग्णालय चांगल्या स्थितींत चाललें आहे. श्री. देशपांडे हे इंग्लंडमध्यें डॉक्टरीचा अभ्यास करून तेथेंच स्थायिक झालेले आहेत. डॉ. श्रीधरपंत गर्दे हेहि असेंच आरोग्य व स्वास्थ्यशास्त्राची लंडन विद्यापीठाची पदवी घेऊन आसाममध्यें गंगटोकला त्या राज्याचे चीफ मेडिकल ऑफिसर म्हणून काम करीत आहेत. श्री. गो. दि. आपटे आणि वैद्य दा. द. जोशी हे आपले वैद्यकीय दवाखाने सांगलीस चालवीत आहेत. श्री. वा. ना. ग्रामोपाध्ये हेहि टिळक महाविद्यालयातून आयुर्वेदविशारद झाल्यानंतर बेळगावच्या आयुर्वेद विद्यालयात शिक्षण देत राहून बेळगाव येथेंच आपला दवाखाना चांगल्या प्रकारें चालवीत आहेत. आणखीहि काहीं विद्यार्थी खेड्यात राहून औषधोपचार करीत असतात. अशामध्यें श्री. मुचंडींचें नाव सांगता येण्यासारखें आहे. डॉ. अ. गो. याळगी हे आपला धंदा सांभाळून सर्व प्रकारच्या राजकीय व सामाजिक चळवळींत उत्साहानें नेतेपद भूषवीत असतात. बेळगाव नगरपालिकेचे ते काहीं काळ अध्यक्षहि होते. त्यांनीं आपले वडील गोविंदराव याळगी यांनीं घराण्याला घालून दिलेली परंपरा अबाधित राखिली आहे. काहीं विद्यार्थ्यांनीं व्यापारी पेशा

पत्करून बेळगावात चागला नावलौकिक संपादन केला आहे. अशा विद्यार्थ्यांपैकीं श्री. आण्णा ऊर्फ पुरुषोत्तम आत्माराम तेंडुलकर हे प्रमुख आहेत. त्याची सामाजिक चळवळीची आवड बेळगावकराना पूर्ण परिचयाची आहे. राजकीय चळवळींनाहि त्याचा पुष्कळच हातभार असतो. श्री व्यंकण्णा पोतदार, श्री हणमंतराव नाईक, याळगी कुटुंबातील व्यंकटेश तथा चिंता आणि दत्तोपंत यानीं सराफी व्यवसायात लक्ष घालून आपला व्यवसाय उत्तम तऱ्हेनें सांभाळला होता. काही विद्यार्थी, उदाहरणार्थ, कृष्णराव देशपाडे, चंदूरकर देशपाडे, पु. आ. तेंडोलकराचे बंधु निळकंठराव तेंडोलकर यानीं शेती हाच आपला चरितार्थाचा धंदा म्हणून स्वीकारला आहे. पैकीं नीळकंठराव तेंडोलकर याची अननसाची मोठ्या प्रमाणावरील शहापूर येथील लागवड व पैदास उभ्या महाराष्ट्रात मशहूर आहे. हा धंदा इतक्या मोठ्या प्रमाणावर अन्यत्र क्वचितच असेल. श्री. कृष्णराव देशपाडे सुद्धा थोड्या जागेंत किफायतशीर पीक कसे काढावें या बाबतींत तरबेज आहेत. एकरी बारापधरा हजार रुपये किंमतीचा बटाटा त्यानीं काढून दाखवलेला आहे.

वृत्तपत्रीय व वाङ्मयीन लेखनातहि काहीं विद्यार्थ्यांनीं आपलें नाव कमावलें आहे. श्री. अनंतराव चिक्कोडी हे संयुक्त कर्नाटकाचे बरेच दिवस संपादन करीत होते. बेळगावातील मराठी साप्ताहिकामधूनहि त्यानीं आपलें लेखन केलें आहे. परंतु त्याची पुरोगामी कानडी लेखणी, कानडीताच प्रसिद्ध आहे. श्री. कृष्णराव मराठे एक सदे लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत... त्याच्या 'बालकवि' या एका संशोधनात्मक पुस्तकानें व मासिकातील वाङ्मयीन लेखानें ते मराठी वाचकाना परिचित आहेत. त्याना त्याबद्दल सरकारी पारितोषकहि मिळालेलें आहे. पुण्याच्या वैदिक संशोधन मंडळाचे कार्यकर्ते श्री. श्री. ना. सोनटक्के हे टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे पदवीधर असून अलीकडील त्याच्या झेंद अवेस्ताच्या संशोधनामुळें सरकारनें त्याना अकादमीचे सदस्यहि नेमलेले आहे. याखेरीज काहीं विद्यार्थ्यानीं वकिली पेशा पत्करला आहे. श्री. हणमंतराव याची वकिली बैल्हॊंगल येथे चालू आहे तर श्री. रंगराव देशपाडे हे बेळगाव येथें वकिलींत नाव काढीत आहेत. श्री. विनायकराव करगुप्पीकर ही एक हरकामी वल्ली आहे. त्यानीं कॉंग्रेसच्या सर्व प्रकारच्या चळवळींत निष्ठापूर्वक भाग घेऊन काहीं काळ नेतृत्वहि केलेलें आहे. त्यानीं बेचाळीसच्या चळवळींत क्रांतिकारकाना साह्य केलें. तसें पूर्ण अहिंसेनें माधनपूर (वडगाव) चा लढाहि त्यानीं उचलून धरला होता. सध्या ते हरिचिंतनात निमग्न असतात. पण पूर्वी त्याचें कार्यक्षेत्र बेळगाव व गोवा या ठिकाणीं असे. कॉंग्रेस खिलाफत युतीमुळें काहीं मुसलमान विद्यार्थीहि या राष्ट्रीय शाळेंत आलेले होते. त्यापैकीं कुरुंदवाड संस्थानातील आलास गावचे जहीरुद्दीन व गौसुद्दीन हीं मुलें आणि गोव्यातून आलेला एक ख्रिश्चन विद्यार्थी युस्टेस हे ध्यानात येतात. युस्टेस याला तर आम्ही 'पुदुम' असे म्हणत असू. सध्या तो आफ्रिकेंत स्थायिक

झालेला आहे. बँकेच्या व्यवसायात शिरलेले व्यापारविशारद श्री. वि. रा. सामत यांची येथें दखल घेण्यासारखी आहे. मुंबईस बील्डिंग मास्टर म्हणून काम करणारे श्री. सदाशिवराव गर्दे याचीहि नोंद घेता येईल. विद्यार्थ्यांचा हा धावता आढावा पूर्ण करण्यापूर्वी आणखीहि एका मोठ्या नावाचा मला स्वतन्त्रपणें उल्लेख करताना अभिमान वाटतो. आपल्या भारताचे सर्वोच्च आरमारी अधिकारी रीअर ॲडमिरलच्या जागीं आपल्या कर्तबगारीनें ललामभूत असलेले श्री. भास्कर सदाशिव सोमण हे श्री टिळक विद्यालय, बेळगाव' या राष्ट्रीय शाळेचेच एक विद्यार्थी आहेत. त्याचे चुलत बंधु श्री. प्रभाकर रघुनाथ सोमण हे बेळगावातील नाणावलेले व्यायाम शिक्षक आहेत. त्यांच्या मित्रमंडळानें कित्येक वर्षे लाठी बोथाटी, पट्टा, भाला, यांचे शिक्षण तरुण बेळगावकराना दिलेलें आहे. वयाचीं ५० वर्षे उलटून गेलीं असली तरी हे मर्दानी खेळ ते आजहि एखाद्या तरुणाप्रमाणें चपलतेनें खेळतात.

श्री. दोड्डण्णवरबंधु यांनीं मोठ्या प्रमाणावर लाकडाचा धंदा चालविलेला असून त्यानीं आपली उन्नति करून घेऊन सामाजिक दर्जा प्राप्त करून घेतलेला आहे. श्री. रामकृष्ण प्रभु यांनीं आपलें सैद्धांतिक जीवन जगून दाखविण्याचा यशस्वी प्रयत्न केलेला आहे. श्री. राघुआण्णा मडगी बेळगाव येथील राजकीय सार्वजनिक जीवनात भाग घेत असतात, व आज ते बेळगाव काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष आहेत. श्री. केकरे हे सोलापूर सत्याग्रही व झंडा सत्याग्रही म्हणून प्रसिद्धीला आलेले आहेत. दड्डीचे सोमण यांनीं व्यक्तिगत आश्रमी जीवन जगून दाखविलें आहे. एक 'विचारक' म्हणून बेळगाव जिल्हा त्याना ओळखतो. त्याशिवाय दिनकर सोमण, मणेरीकर दीक्षित, अध्यापक बा. आ. दामले, बाळ काकतकर, आबेवाडी इनामदार, परांजपे बंधु, वैद्य भाऊसाहेब काळे, अशा अनेक नावारूपास चढलेल्या विद्यार्थ्यांचें स्मरण झाल्याशिवाय रहात नाहीं. श्री. शिंडे यांनीं टिळकवाडी येथें एक चक्की चालविलेली आहे. बिच्चूबंधू सराफ यांनींहि आपल्या धंद्यामध्यें बरेंच नाव मिळविलेलें आहे. चारुदत्त देसाई व तेंडोलकर यांनीं बेळगावच्या तरुण भारत नियतकालिकामध्यें कित्येक वर्षे काम केलें आहे. श्री. चाटवे यांनीं सावतवाडी येथें माग घातलेले आहेत. श्री. प्रभाकर शंकर पळसेकर 'बेळगाव समाचार' साप्ताहिकाचे संपादक असून, ते एक प्रेसहि चालवीत आहेत.

'श्री टिळक राष्ट्रीय विद्यालय' मधील कित्येक विद्यार्थ्यांची यादी, तसे स्मरण करीतच बसल्यास, आणखीहि विस्तृत देतां येईल. केवळ दिग्दर्शनार्थ ही माहिती येथें दिलेली आहे. उल्लेखनीय अशीं कांहीं ठळक नावेंहि राहून गेलीं असण्याचा दाट संभव आहे. त्याबद्दल त्यानीं मला क्षमा करावी.

असा हा राष्ट्रीय शाळेच्या विद्यार्थ्यांच्या जीवनाचा इतिहास आहे. तो पाहिला म्हणजे राष्ट्रीय शाळेनें कोणाच्याहि शिक्षणाचें किंवा जीवनाचें नुकसान केलेलें नाहीं असेंच म्हणावें लागतें. 'स्वराज्याश्रम' आणि 'श्री टिळक विद्यालय' या

दोन्ही संस्था चालविण्याचें श्रेय श्री. गोविंदराव याळगी यांच्याकडेच जातें. या दोन्ही संस्था शेजारींशेजारींच असल्यामुळें त्यांचें परस्परांना साह्य होत असे. या संस्थांना विशेषतः राष्ट्रीय शाळेला अखिल भारतीय कीर्तीचे अनेक थोर पुढारी भेट देऊन गेले आहेत. त्यांत पंजाबकेसरी लाला लजपतराय, अलीबंधु यांचा प्रामुख्यानें निर्देश करता येईल. महाराष्ट्र व कर्नाटक प्रांतांतील बहुतेक पुढारी ही शाळा पाहून गेलेले आहेत. त्यांची नावनिशी देण्याचें कारणच नाहीं. तथापि तपस्वी बाबासाहेब परांजपे, श्री. वीर वामनराव जोशी, पंडित दिनकरशास्त्री कानडे, नाशिकचे एन्जीनियर श्री. वझे, यांनींहि या राष्ट्रीय शाळेस भेट देऊन विद्यार्थ्यांना आपापले विचार ऐकविलेले आहेत; यांचा येथें उल्लेख अस्थानीं होणार नाहीं. जागतिक कीर्तीच्या पुढाऱ्यांपैकीं गुरुदेव कवींद्र रवींद्रनाथ ठाकूर हे कारवारास जात असतांना, राष्ट्रीय शाळेच्या विद्यार्थ्यांकरतां बेळगांव स्टेशनवर गाडींतून उतरून दहा मिनिटें उपदेशाचे चार शब्द बोलले; याबद्दल त्या विद्यार्थ्यांनीं त्यांना धन्यवाद दिले व कविश्रेष्ठांचें दर्शन लाभलें व त्यांचे विचार ऐकावयास मिळाल्याबद्दल स्वतःला धन्य मानून घेतलें. महात्मा गांधींनींहि या राष्ट्रीय शाळेस भेट देऊन विद्यार्थ्यांना प्रोत्साहन दिलें होतें.

सन १९२२ चे सुरवातीलाच गांधीजींवर १२४ अ कलमाखालीं सरकारनें खटला भरला. खटला अहमदाबादेस चालून त्यांना सहा वर्षांची शिक्षा ठोठावली गेली. गांधीजींनीं कोर्टाच्या कामांत भाग घेतला नाहीं. त्यांनीं फक्त एक छोटेंसें निवेदन केलें. 'मीं ही गोष्ट केली आहे. तिला जर आपण राजद्रोह म्हणत असाल तर मी दोषी आहें. व त्यासाठीं मला जी शिक्षा द्याल ती मी आनंदानें स्वीकारीन.' असा त्या जबानीचा आशय होता. सहा वर्षांची शिक्षा ऐकल्यानंतर त्यांनीं एवढेच उद्गार काढले कीं, सहा वर्षे शिक्षा देऊन आपण मला लोकमान्य टिळकांच्या पंक्तीला बसविलेंत याबद्दल मी आपला आभारी आहें." अशा घटनांचे संस्कार या टिळक विद्यालयांतील विद्यार्थ्यांवर होत आलेले आहेत.[1]

असहकाराच्या आंदोलनाच्या निमित्तानें अखिल भारतीय कीर्तीच्या पुढाऱ्यांना आमंत्रण देणें, त्यांचीं भाषणें व दौरे करविणें, या गोष्टी गोविंदरावांनीं सुरूच ठेवल्या होत्या. अलीबंधु व वल्लभभाई पटेल, राजगोपालाचार्य आदि यांचे निकट संबंध त्यामुळें गोविंदरावांना जडले व जोडले गेले. खिलाफतचें आंदोलनहि काँग्रेसच्या चळवळीबरोबरच चालू होतें. त्यामुळें हिंदुमुसलमान या दोन्ही जमाती एकदिलानें स्वराज्यासाठीं सरकारशीं झगडू लागल्या होत्या. दोन्ही जमातींच्या अनेक कार्यकर्त्यांनीं व पुढाऱ्यांनीं

१ "राष्ट्रीय एक गोष्टीपुरतेंच मिरवायाचें नाहींत त्याकरितां पुढाऱ्यास तुरुंगांत गेलें पाहिजे, हद्दपार झालें पाहिजे, किंवा दुसरा छळ सोसला पाहिजे"

लो० टिळक केसरी, ता० २० ऑगस्ट १९०७

स्वराज्याच्या लढ्यात तुरुंगवास भोगला. सन १९२२ च्या मे महिन्यात गंगाधररावांची तुरुंगातून सुटका झाली. त्यांच्या गैरहजेरीमध्यें गोविंदरावांनीं केलेली धडपड जाणून घेतल्यानंतर गंगाधररावांना आनंद झाला.

गांधीजींच्या गैरहजेरींत चित्तरंजन दास, विठ्ठलभाई पटेल, नरसोपंत केळकर वगैरे मंडळींना कायदेमंडळात जाऊन इंग्रजांशीं दोन हात करण्याची इच्छा निर्माण झाली. त्या दिशेनें त्यांनीं प्रयत्नहि केला कायदे मंडळावराल बहिष्कार उठवण्याचा ठराव गया काँग्रेस अधिवेशनात आणून तो मंजूर करवून घेण्याची खटपट सुरू झाली. तर इकडे राजगोपालाचार्य, गंगाधरराव व इतर अनेक पुढारी व कार्यकर्ते 'गांधीजी तुरुंगात असताना त्यांच्या गैरहजेरींत अशा प्रकारचा ठराव मंजूर करणें योग्य होणार नाहीं, कायदेमंडळावरील बहिष्कार कायम ठेवलाच पाहिजे,' अशा मताचे होते. त्यांनीं आपल्या दृष्टीनें प्रयत्न आरंभला. अशा रीतीनें गया काँग्रेसमध्यें फेरनाफेर पक्ष निर्माण झाले. या गया काँग्रेसचे अध्यक्ष स्वत चित्तरंजनदास बाबू होते. नामवंत पुढारी फेरवादी असल्यामुळें, गांधीजींच्या अनुयायांना फारच मोठी जबाबदारी अंगावर घेणें भाग पडलें. राजाजींनीं गया काँग्रेसचें अधिवेशन जिंकलें; परंतु त्याचा परिणाम काँग्रेसची शक्ति कमी होण्यामध्यें झाला. दासबाबू, मोतीलालजी, केळकर, विठ्ठलभाई पटेल यांचा असा दावा होता कीं, 'कायदेमंडळा'त राष्ट्रीय वृत्तीची मंडळी न गेल्यास जनतेचे प्रतिनिधि म्हणून भलतींच माणसे तेथ जातात व त्यामुळें देशातील प्रतिनिधींच्या मनाप्रमाणेंच आम्ही राज्यकारभार करतों असें सरकारास म्हणता येतें.' लोकानाहि हें म्हणणें सकृद्दर्शनीं खरें वाटण्यासारखें आहे व वास्तविक असे.

सन १९२४ मध्यें गांधीजींची अचानक सुटका झाली. त्यानंतर त्यांनीं सर्व परिस्थितीचें पुन बारकाईनें सिंहावलोकन केलें. ज्यांना कायदेमंडळात जाऊन आपला प्रभाव पाडावयाचा आहे, अशा लोकांना बेळगावच्या काँग्रेस अधिवेशनानें रस्ता मोकळा करून दिला, आणि पुन काँग्रेसमध्यें ऐक्य प्रस्थापित झालें.

गंगाधररावांच्या गैरहजेरीमध्यें, म्हणजे ते तुरुंगात असताना, बाहेर गोविंदराव किती हिरीरीनें काम करीत होते याची कल्पना देण्याच्या हेतूनें हा सर्व इतिहास येथें नमूद केलेला आहे.



प्रकरण बेचाळिसावें

# गोविंदराव याळगींचें अकालीं निधन

इ. स. १९२२ च्या गया कॉंग्रेसहून गोविंदराव जे परत आले ते ताप घेऊनच आले. सन १९२३ जानेवारीपासून ते अंथरुणास खिळले ते अखेरपर्यंत उठलेच नाहींत. बेळगांव येथील डॉ. विठ्ठलराव केळकर, डॉ. सावनूर वगैरेंचे उपचार चालूच होते. मुंबईहून मुद्दाम डॉ. वेलणकर याना त्यांच्या सर्व प्रकारच्या साहित्यासह दोन वेळा बेळगांवास आणविलें. पावसाळ्यांत बेळगांवची हवा त्याना मानवणार नाहीं म्हणून गोविंदरावांना गदगला नेण्यात आलें. तेथें स्टेशन व गाव याच्या मध्यावरच एक स्वतंत्र मोठा बंगला भाड्यानें घेतला. गंगाधररावाचे भाचे जांवई डॉ. व्यंकटराव हुईलगोळ आणि प्रथम कांहीं दिवस बेळगांवांत प्रॅक्टिस केलेले डॉ. उमचगी याच्या उपचाराखालीं गदग येथें त्यांना थोडासा गुण आल्यासारखा वाटला. पण हवा-पालटामुळें झालेला तो फरक तात्पुरताच ठरला. व तो कांहीं दिवसच टिकला. पुढें जुलई महिन्यात त्यांना अर्धांगाचा झटका आला. त्यासाठीं त्यावर उपचार करणाऱ्या गृहस्थास अंकोल्याहून गदगला बोलावून घेण्यात आले. त्याच्या योजनेप्रमाणें रोज लेप व मालीश सुरू झाले. पोटात रोज ताजी नीरा देण्याचा उपक्रमहि कित्येक दिवस चालू होता. परंतु दिवसेंदिवस त्याची प्रकृति ढासळत चालली. त्यातच त्याना सप्टेंबरच्या सुरवातीस ज्वर सुरू झाले. नऊ महिने एकसारखे अंथरुणावर पडून राहिल्यानें त्यांना फारच कष्ट सहन करावे लागले. गदगच्या मुक्कामांत दोनतीन वेळां डॉ. भडकमकर याना मुंबईहून आणविले होते. त्यानींहि शक्य ते प्रयत्न केले. पण ईश्वरेच्छा बलीयसी, तिच्यापुढें कोणाचें काय चालणार ? सन १९२३ च्या सप्टेंबरच्या २७ तारखेस सकाळीं नऊ वाजण्याचे सुमारास आपल्या वयाच्या अवघ्या चाळिसाव्या वर्षी गोविंद-रावांनीं या भूमींतील अखेरचा श्वास घेतला. एक निष्ठावंत महामना कार्यकर्ता आणि स्वातंत्र्य-लढ्यामध्यें सतत विनीवर राहणारा उग्र लढवय्या आणि अव्वल दर्जाचा घटक आमच्यामधून निघून गेला. परवशतेच्या रात्रीची जाग देणारा दिवा मालवला.

गोविंदरावाच्या अकालीं निधनाविषयीं कै गु गंगाधररावांनीं आपल्या 'माझी जीवनकथा' या ग्रंथात खालील उद्गार काढले आहेत.

"याच सुमारास माझ्यावर एक आपत्ति आली, ती म्हणजे ज्याच्या आधारावर मी अनेक संकटांतून निभावलों होतों ते माझे स्नेही गोविंदराव याळगी यांचा आजार होय. कलकत्त्याच्या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीला ते हजर होते. तिकडून परत येताना ते व मी मिळून काका कालेलकरांच्या भेटीला अहमदाबादला गेलों होतों. तेथें त्याना एक मरट झालें. तें तेथेच कापविण्यात आलें. पण रक्त फार गेलें व थोडा तापहि आला. दोनतीन दिवसानंतर त्याना बरें वाटू लागलें. व आम्ही बेळगावला आलों त्यानंतर त्याना पुन ताप येऊ लागला. त्यातच त्याना क्षयाचा विकार जडला. चारपाच महिने त्यांनीं बेळगावला काढले. व त्यानंतर गदगची हवा चांगली व कोरडी म्हणून त्याना तेथें नेलें. त्यांच्या मृत्यूमुळें मला किती धक्का बसला हें शब्दांनीं सांगता येणें शक्य नाहीं. या गोष्टीला आज इतकीं वर्षे होत आलीं तरी त्यांचें स्मरण झाल्याखेरीज माझा एकहि दिवस जात असेल असें मला वाटत नाहीं. त्यांच्या इतक्या कळकळ असणाऱ्या नि स्वार्थी व कर्तबगार मनुष्याची मदत मला अद्यापि मिळाली नाहीं. त्यांच्या पश्चात् त्यांच्या दोन धाकट्या बंधूंनीं व कुटुंबातील इतर लहानमोठ्यांनीं माझ्यासाठीं तोच घरोब्याचा संबंध कायम ठेवला आहे व सार्वजनिक कामाला कायावाचामनेंकरून शक्य ती मदत ते करीत असतात"

पृ १८०—माझी जीवनकथा

गोविंदरावांच्या शवाची दहनक्रिया गदग येथेंच झाली. त्यांच्या अस्थि बेळगावला आणण्यात आल्या. बेळगावमध्यें त्या अस्थींची जंगी मिरवणूक काढण्यात आली. शहरातील सर्व आबालवृद्ध त्यात सामील झाले होते. बेळगावच्या 'तरुण भारत' साप्ताहिकाचे संपादक श्री बाबूराव ठाकूर यांनीं गोविंदरावाचा एक सुंदर आर्टपेपरवर फोटो छापून त्याच्या हजारों प्रती त्यांच्या त्या अस्थींच्या मिरवणुकीमध्यें वाटल्या होत्या; त्या दिवशींच्या जाहीर सभेत त्यांच्या अस्थींना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. त्या वेळीं गंगाधरराव आपल्या भाषणात म्हणाले कीं, "गोविंदराव असते तर आज माझें नारायें श्राद्ध झाल असतें!"

गोविंदरावाना शांतपणें मृत्यु आला. हे प्रस्तुत लेखकानें पाहिलेलें आहे गोविंदरावाचें अध्यात्मिक वाचन जवळजवळ शून्यच होतें. त्या प्रकारच्या वाचनानें किंवा मननानें बुद्धीवर व अंत करणावर जे संस्कार होत असतात ते सर्व शुभ संस्कार जन्मत च आपल्याबरोबर घेऊनच गोविंदराव जन्मले होते असें म्हणावें लागतें. मनुष्याला मरण नकोसें का वाटतें याचा सूक्ष्म विचार केल्यास असें दिसून येईल कीं, दीर्घकाल तुरुंगात राहणाऱ्या माणसाला तुरुंगच चांगला वाटू लागतो! तसेच दीर्घकालीन

देहसाहचर्यामुळें मनुष्याला देह सोडणें चांगलें वाटत नाहीं. वास्तविक मृत्यूचें भय कशासाठीं व त्याचा शोक तरी कशासाठीं? असेच संस्कार गोविंदरावांच्या मनबुद्धीवर कोरले गेले होते. जन्मापेक्षा मृत्यु ही अधिक चांगली गोष्ट आहे. आपलें जीवन जर स्वच्छ असेल तर मृत्यूमध्यें पराधीनता किंवा दुःख वाटण्याचें कारणच नाहीं. जन्म म्हणजेच दुःखामध्यें प्रवेश आणि मृत्यु म्हणजे संपूर्ण दुःखमुक्ति!! असा मृत्यु गोविंदरावाच्या वाट्याला आला. याचें खरें कारण त्यांनीं आपलें जीवनच तशा ध्येयनिष्ठेमध्यें घालविलेलें होतें. आपण दुसऱ्याचे दोष पाहू नयेत, आपलेच पहावेत. त्यानें जीवन सुखी होते व आपण शुद्ध स्वच्छ राहातों. आपण आपल्यासाठीं असें ध्येय व काम निवडून घ्यावें कीं, स्वार्थाविषयीं चिंतन-मनन करण्यास आपणाला अवकाशच मिळू नये. आपल्याला कोणाकडून कोणतीहि आशा बाळगण्याचा अधिकार नाहीं. आपण देणेदार आहोंत म्हणूनच आपल्याला जन्म घ्यावा लागला. आपण कोणाचेहि सावकार नाहीं. म्हणजे कोणाचे धनको अगर घेणेकरी नाहीं. या गोष्टी गोविंदरावाना नीट उमजलेल्या होत्या. आपला जीवनप्रवाह सरळपणें ध्येयाकडे नेण्याचा राजमार्ग त्याना लाभलेला होता. कित्येक तरुणाना गोविंदरावांनीं उन्नत केलें आहे. कोणा व्यक्तीला राजकारणात ओढावें एवढी संकुचित व नश्वर दृष्टि गोविंदरावाची कधींच नव्हती. त्याच्या सांनिध्यात व सहवासात आलेल्या व्यक्तीचें संपूर्ण जीवन बदलून जात असे, विकसित होत असे.

शरीर हे आत्म्याच्या विकासासाठीं आहे. परंतु ज्याचा आत्मा महान् बनला आहे त्याच्या विकासासाठीं मानवदेह लहान पडतो, मानवीजीवन थिटें पडतें. अशा वेळीं तो महान् आत्मा कधीं कधीं आपले दुर्बल शरीर सोडून देहरहित किंवा देहातीत अवस्थेमध्यें अधिक शाश्वत, अधिक टिकाऊ व परिणामकारक सेवा करूं लागतो. गोविंदरावाच्या अकाल निधनाविषयींचे विचार व्यक्त करताना हाच अनुभव मनामध्यें वारवार येतो. तथापि 'मरण प्रकृतिः शरीरिणाम्' हाच सनातन सिद्धांत व्यवहारी जीवाना समाधान देण्यास पुरेसा पडतो. म्हणून 'जातस्य हि ध्रुवो मृत्युः' असेंच भरतवाक्य लिहावें लागत आहे.



परिशिष्ट पहिलें

# कै. दे. भ. गोविंदराव याळगी यांचें अकालीं निधन[1]

दे भ. गोविंदराव याळगी हे सुमारें आठ महिने आजारी होते. मृत्यूशीं त्यांनीं अत्यंत निकराचा झगडा केला. मृत्यूला आपलीं सर्व शस्त्रें त्याच्या इच्छाशक्तिपुढें बोथट आहेत, असें कळून आल्यामुळेंच कीं काय क्षय, अर्धांग, टायफाॅईड यासारखे मोठमोठे रोग त्याच्यावर सोडून काळानें अखेर तो क्षीण झालेला देह सोडण्यास त्याच्या आत्म्याला भाग पाडलें. त्याच्या मृत्यूनें बेळगावचेंच काय तर कर्नाटकाचें-अखिल महाराष्ट्राचें अत्यंत नुकसान झालेलें आहे. त्यानीं आज सतत वीस वर्षे केलेली देशाची सेवा इतकी अलोट व विविध आहे की, त्याचें वर्णन करणें लहानसहान काम नव्हे. त्यानी कित्येक प्रसंगीं अशीं धाडसाचीं व अचाट (कल्पनेचीं) कार्यें केलीं आहेत कीं, तीं सर्व जाहीर करण्याची अद्यापि वेळ आलेली नाहीं. राजकारणामध्यें त्यानीं अनेक लोकांच्या अंत करणा-मध्यें देशप्रेमाची ज्योत प्रज्वलित केली आहे, हें बेळगाव व कर्नाटक जाणून आहे. समाजामध्यें त्यानीं इतक्या लोकांना उपकृत करून ठेवलें आहे कीं, त्याच्या मृत्यूनें कोणास आपला आश्रयदाता नाहींसा झाला असें वाटतें, कोणास आपला जिवलग बंधु गेला असें वाटतें, कित्येक लोकांना आपला स्नेही अंतरला असें दु:ख वाटतें, तर सार्वजनिक चळवळीचा आधारस्तंभ ढासळला असें सर्वांनाच वाटतें. खालच्या वर्गातील लोकांची त्याच्यावर जितकी भक्ति होती तितकेंच मध्यमवर्गाचें प्रेम त्याच्यावर होतें, आणि यामुळेंच नोकरशाहीची करडी नजर त्याच्यावर असे त्याचीं धोरणें फार दूरवर विचार करून धाधलेलीं असत. आज कितीतरी वर्षें बेळगावचीं व अलीकडे तीनचार वर्षें समग्र कर्नाटकाची कोणतीहि चळवळ त्याच्या नेतृत्वाखालीं व त्याच्याच प्रेरणेनें होत असे, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

असे आपले प्रिय गोविंदराव आज आपल्याला सोडून गेले! कोणत्याहि प्रकारच्या

---

१ सदर परिशिष्टात त्याच्यावरील मृत्युलेखाचीं अवतरणें दिलीं आहेत.

कामाची धाटाघाट चालली असताना अद्यापिहि चुकून 'गोविंदराव यांनीं अमुक अमुक कर असें सांगितलें' असे शब्द तोंडावाटें निघाल्याशिवाय रहात नाहीत. त्यांच्या नेहमींच्या घसण्याउठण्याच्या अनेक ठिकाणीं त्यांना शोधण्यास मन अद्यापिहि धाव घेतें त्यांच्या मृत्यूनें 'तरुण भारता'चा एक आधारस्तंभ ढासळला आहे तरुण भारत त्यांचें काम पुढें चालविण्याची शिकस्त करील असें त्यांच्या आत्म्याला आम्ही आश्वासन देतों.

गोविंदराव एक देह सोडून शेंकडों तरुण देहांत शिरले आहेत हें नोकरशाहीस जाणवल्याशिवाय राहणार नाहीं देशाकरता तळमळणारे गोविंदरावांसारखे आत्मे नाहींसे होत नसतात. गोविंदराव यांच्या मृत्यूनें दे भ गंगाधरराव यांना मान म्हातारपणीं जें दु ख झालें आहे त्याची कल्पनाहि करवत नाहीं गोविंदराव यांनीं हातीं घेतलेलीं अनेक कामें बेळगावकर पुढें चालवतील व त्यायोगें दे भ. गंगाधरराव यांचें दु ख थोडेंतरी हलकें करतील अशी आमची खात्री आहे देशभक्त गंगाधरराव यांना व गोविंदराव यांच्या सर्व आप्तेष्टांना हें दु ख गिळण्यास ईश्वरानें शक्ति द्यावी अशी आपण मनोभावानें त्या परमेश्वराची प्रार्थना करू या.

'तरुण भारत' सप्टेंबर १९२३



परिशिष्ट दुसरें

# नियतीचा तडाखा

"......मृत्यूला लोक जो दोष देतात, त्याला जे दचकतात, त्याची घृणा करतात, ते फक्त तेव्हाच कीं, तो जेव्हा त्याच्या नियत जागेवरून पुढें पुढें सरकतो, भलत्याच स्टेशनवर भलत्याच हद्दींत मनुष्याच्यावर एखाद्या गुप्त मारेकऱ्याप्रमाणें हल्ला करतो, कौमार्य, यौवन या अवस्थांच्या सुंदर बागेमध्यें मनुष्यप्राणी विश्वस्त अंतःकरणानें विहार करीत असता, सद्गुणाचीं पुष्पें खुडीत असता, जनकल्याणाचें जीवन जनतेला पाजत असता ज्या वेळीं हा मृत्यु एखाद्या सर्पाप्रमाणें अवचित येऊन दंश करतो व सर्व कौमार्याचा, यौवनाचा बाग उध्वस्त करून टाकतो, त्या वेळीं त्याच्याबद्दल मनुष्याच्या मनामध्यें घृणा उत्पन्न होते. नियतीच्या नियमांना धाब्यावर बसवून, ज्या वेळेला एखादा अभिमन्यु, एखादा विश्वासराव पेशवे, एखादा सवाई माधवराव, मुसमुसलेल्या यौवनाच्या भरामध्यें अवचितपणानें एखाद्या वाटमारुप्रमाणें हा मृत्यु आपल्या भयंकर स्वाहाकाराच्या गुहेमध्यें ओढून नेतो, त्या वेळीं त्याच्याबद्दल मनुष्याला संताप उत्पन्न होतो तो संताप निरुपयोगी असतो म्हणून तर तो अधिकच असहनीय होतो कारण, या मृत्यूचें शासन करताच येत नाहीं. या मृत्यूला मारताच येत नाहीं सर्व जगतामध्यें जर काहीं एखादी मृत्युरहित वस्तु अस्तित्वात असली तर ही फक्त मृत्युच होय! मृत्यूला मृत्युच मुळीं माहीत नाहीं त्याला जन्म असला तरी मृत्यु मुळीच नसतो 'जातस्य हि ध्रुवो मृत्यु.' या तात्त्विक उक्तीला जर कोणता अपवाद असेल तर तो फक्त मृत्यूचाच!......

आज हे विचार सुचण्याचें कारण म्हणजे मृत्यूनें नुकताच एक वर सांगितल्या प्रमाणें अत्याचार केला हे होय दे भ गोविंदराव याळगी यांचें नाव कर्नाटक, महाराष्ट्र, वऱ्हाड, नागपूर यांतील कोणत्या देशभक्त मनुष्याला माहीत नाहीं? जीभ अचल परंतु पाय चपल, वाणी मित परंतु करणी अपरिमित, नाव, कीर्ति यांविषयीं बेफिकीर परंतु कार्य करण्यामध्ये सतत आसक्त, असे जे कोणी थोडे कर्मयोगी देशभक्त आहेत त्यामध्ये गोविंदराव याळगींचा नंबर अग्रभागीं लागेल यांत संशय नाहीं. त्यांच्या कार्यांचा व्याप

इतका होता कीं, धार्मिक, राजकीय, सामाजिक, औद्योगिक यापैकीं अशी एकहि बाब नव्हती, कीं जी देशाला पोषक आहे, असें वाटल्याबरोबर ती गोविंदरावांनी हातीं घेतली नाहीं, अशी क्वचितच एखादी बाब असेल कीं, जी त्यांनीं हातीं घेतल्यावर यशस्वी झाली नाहीं तरुण, कोवळ्या वयातच त्याच्या भावनामय मनामध्यें देशाचें उत्कट प्रेम उत्पन्न झालें. व आपल्या देशाची ही परतंत्र अवस्था, ही दास्यवृत्ति, त्याच्या अभिजात आणि अभिमानी मनाला असह्य होऊं लागली. त्या वयात त्यांनीं जी एकदा देशाकरता फकीरवृत्ति स्वीकारली ती त्यांनीं आजन्म तशीच चालविली देशकार्यापुढ त्याना गणगोत, पैसा अडका, व्यापारधंदा, याची मुळींच कदर वाटत नसे व देशहिताचें असें कोणतेंहि काम असले कीं सर्व खाजगी गोष्टींकडे दुर्लक्ष करून ते तनमनधनानें त्या कामाला स्वत ला वाहून घेत ज्याला हल्लीं शिक्षण म्हणून म्हणतात तें पुस्तकी शिक्षण जरी त्याचें अल्पस्वल्पच झालें होतें तरी चाणाक्षपणा, प्रत्युत्पन्नमति, मनुष्यस्वभावाचें मार्मिक ज्ञान, या गुणाच्या जोरावर मोठमोठ्या सुशिक्षित म्हणवणाऱ्या परतु व्यवहारशून्य असलेल्या अनेक व्यक्तींचें काम ते एकटे पार पाडीत असत त्याच्या सर्व गुणावर कळस जर कोणत्या गुणानें चढविला असेल तर तो त्याचा धैर्य हा गुण होय, पुष्कळ वेळेला उत्कट देशभक्ति, चागली बुद्धिमत्ता, काम करण्याची आवड वगैरे अनेक गुण असलेले लोक आटळतात, परतु त्याच्या ठिकाणीं धैर्याचा अभाव असल्यानें वरील सर्व गुण मातीमोल होतात ज्याप्रमाणें चारी ठाव जेवण परतु मिठावाचून तें अळणी लागतें तसें धैर्यावाचून राजकारणी पुरुष आळणी बनतो धैर्याच्या पोटीं हिंमत असते व हिंमतीवरच मोठमोठीं कार्ये पार पडतात. ह्या हतभागी कालामध्यें जन्माला न येता ते जर स्वराज्याच्या काळीं जन्माला येते तर एखादा धनाजी, नेताजी, सताजी झाले असते, परतु परकीय सत्तेच्या वरवंट्याखालीं सर्व उदात्त गुण चिरडले जात असल्याकारणानं गोविंदरावाच्या अगच्या गुणांचा पुरा विकासहि झाला नाहीं तरीहि त्याच्या आजपर्यंतच्या जवळजवळ पधरा वर्षांच्या राजकीय आयुष्यात त्यांनीं आपल्या धीरवृत्तीचे, हिंमती बाण्याचे मासले काहीं थोडे नाहीं दाखविले!

स्वतःकडे कमीपणा घेऊन दुसऱ्याकडून कामें करून घेण्याची हातोटी गोविंदरावाना अपूर्व रीतीनें लाभली होती. वास्तविक बेळगाव व पर्यायानें कर्नाटक यातील सर्व चळवळींचीं सूत्रें याच्याच हातीं असत. परतु प्रत्येक 'दादासाहेब', 'बाबासाहेब', 'रावसाहेब' यांना असें वाटत असे कीं, गोविंदराव म्हणजे आपला एक हुकमी मनुष्य हुकमी खराच—कारण त्याच्या हुकुमाप्रमाणेंच हे सर्वजण चालावयाचे! गोविंदरावां जवळ पक्षाधता मुळींच नसे. त्याना मवाळ, जहाल, ब्राह्मण, ब्राह्मणेतर, सर्व काहीं हवे असत इतकेंच नव्हे तर सरकारी व पोलीसलोकांकडूनहि ते प्रसगीं केव्हांकाळीं कामें करवून घेत असत! त्याची एकच दृष्टि—देशहिताला त्याचा सर्वांचा उपयोग कसा करून घेता येईल. त्यांनीं त्या सर्वांचा शक्य तोंवर देशोद्धाराच्या कामीं सारखा उपयोग करून

घेतला. 'कार्यकर्त्यांच्या गुणें कार्यभाग होतो' ही उक्ति गोविंदराव यांच्या चरित्रांत प्रत्यहीं प्रत्ययास येत होती. देशासाठीं प्रेमनिर्भर होऊन जे जे स्वातन्त्र्यवीर आजपर्यंत परकीयांच्या भाडोत्री सेवकांबरोबर, सैनिकांबरोबर देश स्वतंत्र करण्याकरतां लढले आहेत, त्यांच्यामध्यें साशता हा मोठा सद्गुण असतो. आशावादी असल्यावाचून केव्हांहि संकटात निभाव लागत नाहीं.. .....गोविंदराव देखील याच आशावादित्वाच्या जोरावर, जेव्हां इतर लोक निराश बनून कपाळावर कपाळकरट्याप्रमाणें हात मारून बसत असत, त्या वेळीं गोविंदराव धडाडीनें कार्यभार अंगावर घेऊन चिकाटीनें संकटास पायातळीं तुडवून यशस्वीपणानें कार्य तडीला नेत असत .. . ...

डॉ. ना. दा. सावरकर
ऑक्टोबर, सन १९२३, मुंबई



परिशिष्ट तिसरें

# लोकमान्य टिळकांचा जाहीरनामा

(लोकमान्यांची मंडालेहून सुटका झाल्यानंतर, पुणें कलेक्टराशीं वाटाघाट होऊन ता. २७ ऑगस्ट १९१४ रोजी टिळकांनीं एक जाहीर पत्रक काढलें. याचा उल्लेख प्रस्तुत पुस्तकांत पान १३३ मध्यें आलेला आहे. तें पत्रक येथें वाचकांच्या माहितीसाठीं दिलेलें आहे.)

"सध्याच्या काळची परिस्थिति नेहमींच्याहून निराळी असल्यामुळें या प्रसंगीं सरकारबद्दल माझी भावना कशी आहे यासंबंधीं कसल्याहि प्रकारचा गैरसमज असल्यास तो दूर व्हावा, या हेतूनें खालीं लिहिलेला मजकूर प्रसिद्ध करण्यासाठीं मी आपणाकडे पाठवीत आहें. माझ्या वाड्यांत गणपत्युत्सवासंबंधानें माझी स्नेहीमंडळी परवा जमली असतां, त्यास उद्देशून मीं जें भाषण केलें त्यांत हेच विचार मीं प्रदर्शित केलेले आहेत. तथापि ते विचार त्यापेक्षांहि अधिक प्रसिद्ध होणें मला इष्ट वाटत असल्यामुळें मी हें पत्र आपणास लिहीत आहें. मी सुखरूप परत आलों म्हणून माझें अभिनंदन करण्यासाठीं माझे घरीं आलेल्या गृहस्थास उद्देशून दोन महिन्यांपूर्वी मी जें भाषण केलें त्यांत असें म्हटलें होतें कीं, पूर्वी रिपव्हॅनविंकल या नावाच्या अरण्यांत गेलेल्या एका मनुष्यास तेथेंच गाढ निद्रा लागून पुष्कळ दिवसानंतर तो घरीं आल्यावर त्याची जी स्थिति झाली, तद्वतच पुष्कळ अशीं माझी अवस्था झालेली आहे. माझ्या सहा वर्षांच्या गैरहजेरींत काय काय घडून आलें यासंबंधानें आपली माहिती पुरी करून घेण्यास आणि हिंदुस्थानांत दरम्यान ज्या ज्या गोष्टी घडल्या त्यांचा आढावा घेण्यास यानंतर मला बरेच प्रसंग आले. यावरून मला आपणास खात्रीनें असें सांगतां येतें कीं, वर्तमानपत्राच्या कायद्यासारखे कांहीं प्रकार जरी घडून आले असले—या प्रकारासंबंधीं या स्थळीं मला विस्तारानें चर्चा करण्याची जरूरी नाहीं—तथापि हिंदुस्थान देश आपणास अत्यंत इष्ट असलेलें ध्येय प्राप्त करून घेण्याचा मार्ग धिमेपणानें आक्रमण करील याबद्दल निदान मी निराश झालेलों नाहीं. लॉर्ड मोर्ले व लॉर्ड मिंटो यांच्या कारकीर्दीत ज्या सुधारणेचा उपक्रम झाला त्यावरून असें दिसून

येईल कीं, राज्यकारभारांत प्रगतिपर फेरबदल करण्याची आवश्यकता सरकारच्या पूर्णपणें लक्षात आलेली असून राज्यकारभाराच्या कामीं लोकांशीं दिवसानुदिवस अधिकाधिक संबंध ठेवण्याची सरकारची इच्छा आहे. या गोष्टीवरून अधिकारी व प्रजा यांजमधील परस्पर विश्वास बराच वाढत चालला असल्याचें आणि प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकून तीं दूर करण्याचा सतत प्रयत्न सुरू असल्याचें दिसून येतें असें म्हणता येईल आणि आम्हींहि तें मान्य करणें रास्त होईल सार्वजनिक दृष्ट्या विचार करतां हा इतका फायदाच झाला असें मला वाटतें आणि हा फायदा जरी सर्वांशीं निर्भेळ नसला तरी मला अशी दृढ आशा वाटत आहे कीं, अखेर या राजकीय सुधारणांत जें कांहीं चांगलं आहे तें शिल्लक व कायम राहील आणि ज्याबद्दल आमची हरकत आहे तें नाहींसें होईल. कित्येकाना माझें हें म्हणणें आशावादीपणाच दिसेल, पण मीं श्रद्धेनें ज्या गोष्टी स्वीकारल्या आहेत त्यापैकीं ही एक असून, फक्त अशा प्रकारचा विश्वास आपल्या देशाच्या कल्याणासाठीं सरकारच्या सहकार्यतेनें झटण्याची आम्हास स्फूर्ति होण्यास कारण होतो असें माझें मत आहे

"दुसऱ्या एका गोष्टीचाहि येथें उल्लेख करणें जरूरीचें आहे. माझ्या सहा वर्षांच्या गैरहजेरींत येथील व इग्लडातील इग्रजी पत्रांत, उदाहरणार्थ मि चिरोल याच्या पुस्तकांत, माझे लेख व कृत्यें याचा असा अर्थ करण्याचा प्रयत्न झाल्याचें मला दिसून येतें कीं, त्यामुळें अत्याचाराच्या कृत्याना प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष चिथावणी मिळाली अथवा मीं जीं भाषणें केलीं तीं हिंदुस्थानातील इग्रज सरकारचें राज्य उलथून पाडण्याचे हेतून केलीं मी आपला बचाव करण्यास नागरिक या नात्यानें स्वतंत्र नव्हतो अशा वेळीं हे प्रयत्न करण्यात आले ही शोचनीय गोष्ट होय तथापि या पहिल्याच सार्वजनिक प्रसंगीं मजवरील या घाणेरड्या व सर्वस्वी निराधार अशा आरोपाचा मन पूर्वक तिटकाऱ्यानें निषेध करणें मला जरूर आहे राजकीय चळवळ करणाऱ्या इतर लोकाप्रमाणे काहीं बाबतींत किंबहुना काहीं अशीं अतर्गत राज्यव्यवस्थेसबधानेहि सरकारमध्ये व मजमध्ये विशिष्ट मतभेद आहे. परतु त्यामुळें माझी वृत्ति किंवा माझीं कृत्यें इग्रज सरकाराबद्दल द्वेषभाव व्यक्त करणारीं आहेत असें म्हणणें असमजसपणाचें आहे माझा हेतु अगर इच्छा केव्हाच अशा प्रकारची नव्हती. मी एकदाच व कायमचें असें सागून ठेवितों कीं, आयर्लंडांतील होमरूलपक्षाचे आयरिश लोकाप्रमाणें आमचा प्रयत्नहि चालू राज्यपद्धतींत सुधारणा घडवून आणण्याचा असून राज्य बुडविण्याचा नाहीं आणि मी नि सशयपणें असें म्हणतों कीं, हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागात अत्याचाराचे जे प्रकार घडून आलेले आहेत ते माझ्या स्वभावाला प्रतिकूल आहेत, इतकेंच नव्हे तर अशा कृत्यांच्या योगानं आमच्या राजकीय प्रगतीचें पाऊलहि दुर्दैवानें बरेंचसें माग पडलें असेंहि माझें मत आहे व्यक्तिश किंवा सार्वजनिक यापैकीं कोणत्याहि दृष्टीनं विचार केला तरी अशा प्रकारचीं कृत्यें एकसारखींच दोषार्ह होत व ही गोष्ट मीं पूर्वींहि अनेक वेळा घोषून दाखविली आहे

## योगी अरविंदांचें अस्सल 'राजकीय मृत्युपत्र'

Pondicherry,
Jan. 5, 1920.

Dear Baptista,

Your offer is a tempting one, but I regret that I cannot answer it in the affirmative. It is due to you that I should state explicitly my reasons. In the first place I am not prepared at present to return to British India. This is quite apart from any political obstacle. I understand that up to last September the Government of Bengal (and probably the Government of Madras also) were opposed to my return to British India and that practically this opposition meant that if I went back I should be interned or imprisoned under one or other of the beneficient Acts which are apparently still to subsist as helps in ushering in the new era of trust and co-operation. I do not suppose other Governments could be any more delighted by my appearance in their respective provinces. Perhaps the King's Proclamation may make difference, but that is not certain, since as I read it, it also does not mean an amnesty, but an act of gracious concession and benevolence limited by the discretion of the Viceroy. Now I have too much work on my hand to waste my time in the leisured ease of an involuntary Government guest. But even if I were assured of an entirely free action and movement, I should yet not go just now. I came to Pondicherry in order to have freedom and tranquillity for a fixed object having nothing to do with present politics—in which I have taken no direct part since my coming here, though what I could do for the country in my own way I have constantly done—and until it is accomplished it is not possible for me to resume any kind of public action. But if I were in British India, I should be

obliged to plunge at once into action of different kinds. Pondicherry is my place of retreat, my cave of Tapasya,—not of the ascetic kind, but of a brand of my own invention. I must finish that, I must be internally armed and equipped for my work before I leave it.

Next in the matter of the work itself. I do not at all look down on politics or political action or consider I have got above them. I have always laid a dominant stress and I now lay an entire stress on the spiritual life, but my idea of spirituality has nothing to do with ascetic withdrawal or contempt or disgust of secular things. There is to me nothing secular all human activity is for me a thing to be included in a complete spiritual life, and the importance of politics at the present time is very great. But my line and intention of political activity could differ considerably from anything now current in the field. I entered into political action and continued it from 1903 to 1910 with one aim and one alone, to get into the mind of the people a settled will for freedom and the necessity of a struggle to achieve it in place of the futile rubling Congress methods till then in vogue. That is now done and the Amritsar Congress is the seal upon it. The will is not as practical and compact nor by any means as organised and sustained in action as it should be, but there is the will and plenty of strong and able leaders to guide it. I consider that in spite of the inadequacy of the Reforms the will to self-determination if the country keeps its present temper, as I have no doubt it will, is bound to prevail before long. What pre-occupies me now is the question what it is going to do with its self determination, how will it use its freedom, on what lines is it going to determine its future?

You may ask why not come out and help myself so far as I can in giving a lead? But my mind has a habit of running inconveniently ahead of the times,—some might say, out of tune altogether into the world of the ideal. Your party, you say, is going to be a social democratic party. Now I believe in something which might be called social democracy, but not in any of the forms now current and I am not altogether in love with the European kind, however great an improvement it may be on the past. I hold that India having a spirit of her own and a governing temperament proper to her own civilization, should in politics as in every thing else strike out her own original path and not stumble in the wake of Europe. But this is precisely what she will be obliged to do, if she has to start on the road in her present chaotic and unprepared condition of mind. No doubt people talk of India developing on her own lines, but nobody seems to have very

clear or sufficient ideas as to what those lines are to be In this matter I have formed ideals and certain definite ideas of my own, in which at present very few are likely to follow me, since they are governed by an uncompromising spiritual idealism of an unconventional kind and would be unintelligible to many and an offence and stumbling block to a great number But I have not as yet any clear and full idea of the practical lines, I have no formed programme In a word, I am feeling my way in my mind and am not ready for either propaganda or action Even if I were, it would mean for some time ploughing my lonely furrow or at least freedom to take my own way As the editor of your paper, I shall be bound to voice the opinion of others and reserve my own, and while I have full sympathy with the general ideas of the advanced parties so far as concerns the action of the present moment and, if I were in the field would do all I could to help them, I am almost incapable by nature of limiting myself in that way, at least to the extent that would be requisite

Excuse the length of this screed I thought it necessary to explain fully so as to avoid giving you the impression that I declined your request from any affection or reality of spiritual aloofness or wish to shirk the call of the country or want of sympathy with the work you and others are so admirably doing I repeat my regret that I am compelled to disappoint you

Yours sincerely,
AUROBINDO GHOSE

पॉंडिचेरी,
जानेवारी ५, १९२०

प्रिय बॅप्टिस्टा यास,

तुम्हीं माझेकडून केलेली मागणी खरीच मोह पाडणारी आहे परतु तिला मी होकारार्थी उत्तर देऊ शक्त नाहीं हं लिहिताना अत्यत वाईट वाटतें. त्याचीं कारणे तुम्हाला म्हणून मी स्पष्टपणें सागत आहें पहिली गोष्ट अशी की, ब्रिटिश-हिंदुस्थानात परत येण्याला आज तरी मी तयार नाहीं याचें कारण माझ्यावर घालण्यात आलेला केवळ राजकीय निर्बंधच नव्हे मला असें समजतें कीं, गेल्या सप्टेंबरपर्यंत मी हिंदुस्थानात परत येण्याला बगाल सरकार (आणि कदाचित् मद्रास सरकारसुद्धा) विरुद्ध होतें. याचा जवळजवळ अर्थ असा की, मी परत आलों तर मला स्थानबद्ध करण्यांत येईल

किंवा नवीन विश्वासाचें आणि सहकार्याचें युग सुरू करण्यास मदत व्हावी या दिखाऊ उद्देशानें जे कायदे अस्तित्वांत आहेत त्यापैकी या ना त्या कल्याणकारी (?) कायद्याखालीं मला कारावासात डांबण्यांत येईल. वरील दोन प्रांत सोडून इतर प्रांतांत मी प्रवेश करणें तेथील सरकारांना आवडेल असेंहि मला वाटत नाहीं. कदाचित् राजेसाहेबांच्या घोषणेमुळें सरकारच्या वागणुकींत कांहीं फरक होईलहि परंतु मी जो कयास केला आहे त्यावरून ही गोष्ट निश्चित नाहीं. कारण ही घोषणा म्हणजे एकूण एक राजबंद्याची मुक्तता नव्हे. व्हाइसरॉयांच्या मर्जीवर या कृपेची अंमलबजावणी अवलंबून राहावयाची आहे. माझजवळ सध्यां एवढें मुबलक काम आहे कीं, अनिच्छेनें सरकारचा स्वस्थपणें पाहुणचार खाण्यामध्यें वेळ दवडण्यास मी तयार नाहीं. तथापि मला कृतीचें आणि हालचालीचें संपूर्ण स्वातंत्र्य मिळण्याचें आज आश्वासन देण्यात आलें तरी इतक्यांतच मी तिकडे येऊ नये असें मला वाटतें.

मनात धरलेला निश्चित हेतु सिद्धीस नेण्यासाठीं स्वातन्त्र्य आणि शांतता प्राप्त व्हावी म्हणून पॉंडिचेरी येथें मी येऊन राहिलों. येथें आल्यापासून राजकारणात मीं प्रत्यक्ष भाग घेतलेला नाहीं. तथापि माझ्या स्वत:च्या दृष्टीनें देशासाठीं मला जें जें करणें शक्य होतें तें तें मी वारंवार करीत आलेलों आहे. माझा हेतु सिद्धीस जाईपर्यंत कोणत्याहि प्रकारच्या सार्वजनिक कामात पुन्हा पडणें मला शक्य नाहीं. पण मीं ब्रिटिश हिंदुस्थानात पाऊल टाकलें तर निरनिराळ्या प्रकारच्या कामामध्ये तावडतोब उडी घेणें मला भाग पडेल. तपस्येसाठीं एकांत स्थान म्हणून पॉंडिचेरीची निवड मीं केली आहे. ही तपस्या अर्थातच संन्यासाश्रमाची नव्हे. माझ्या स्वत:च्या विशिष्ट कल्पनेप्रमाणें या तपस्येचें स्वरूप राहील. हें स्थान सोडण्यापूर्वी आध्यात्मिक दृष्टीनें अवश्य ती साधन सामुग्री आपणाजवळ असली पाहिजे असें मला वाटतें

आता तुम्हीं लिहिलेल्या कामाविषयीं लिहितों. राजकारणाकडे–राजकीय चळवळीकडे–मी तुच्छतेनें पाहतों असें मुळीच नव्हे. असलीं कामें करण्याच्या पलीकडे मी गेलों आहें, असाहि अर्थ नव्हे. आध्यात्मिक जीवनावर मी वारंवार जोर देत आलों आहे; आणि आतां तर मी त्यावर सपूर्णच जोर देत आहे परंतु संन्यासाच्या निवृत्तीपेक्षा माझी आध्यात्मिक जीवनाची कल्पना निराळी आहे. त्यामध्यें ऐहिक गोष्टींविषयीं तिरस्काराचाहि अंतर्भाव होत नाहीं. किंबहुना माझ्या दृष्टीनें ऐहिक असें कांहींच नाही. प्रत्येक मानवी कृतीचा संपूर्ण आध्यात्मिक जीवनामध्ये समावेश केला गेला पाहिजे असें मला वाटतें. सध्याच्या काळात राजकारणाचें महत्त्व फार आहे. पण आज चालू असलेल्या राजकारणाहून राजकीय चळवळींविषयींची माझी कल्पना फार निराळी आहे.

इ. स. १९०३ मध्यें मी राजकीय चळवळींत पडलों आणि १९१० पर्यंत राजकारण चालविलें. त्या वेळेपर्यंत कॉंग्रेसनें स्वीकारलेल्या निरर्थक मार्गाऐवजीं जनतेमध्यें स्वातंत्र्याची दृढ लालसा उत्पन्न करणें आणि तें मिळविण्यासाठीं लढा देण्याची

आवश्यकता पटवून देणें हा एकच एक हेतु त्या वेळीं माझ्या डोळ्यासमोर होता तो हेतु आतां सिद्धीस गेलेला आहे. अमृतसरच्या काँग्रेसन या इच्छापूर्तीवर आपले शिक्कामोर्तब केलें आहे. स्वातंत्र्याच्या या लालसेला असावें तेवढें व्यावहारिक आणि एकजीवी स्वरूप अद्यापि आलेलं नाहीं किंवा तिच्या पूर्तीसाठीं करावयाच्या कृतीला असावें तेवढें सघटित आणि चिकाटीचें स्वरूप आलेले नाहीं. पण स्वातन्त्र्याची लालसा उत्पन्न झाली आहे आणि मार्गदर्शनाकरितां पाहिजे तेवढें सामर्थ्य आणि लायक पुढारी लाभलेले आहेत. मला असें वाटतें कीं, मिळालेल्या राजकीय सुधारणा अपुऱ्या असल्या तरी स्वयनिर्णयाविषयींचा आपला निर्धार देशानें कायम ठेवला तर—आणि तो कायम राहील याविषयीं मला सशय वाटत नाहीं—या निर्धाराला अल्प काळांत यश आल्यावाचून राहाणार नाहीं सध्या माझ्या डोक्यामध्यें एकच विचार घोटाळत आहे तो असा कीं, हा स्वयनिर्णयाचा हक्क आम्ही कशा रीतीनं उपयोगात आणू, स्वातन्त्र्याचा उपयोग आम्ही कसा करून घेऊ, आणि आपल्या भवितव्याची रूपरेषा आम्ही कशा तऱ्हेनें निश्चित करूं ?

यावर तुम्ही स्वाभाविकच असा प्रश्न विचाराल कीं, या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं मी माझ्या एकान्त स्थलांतून बाहेर येऊन देशाला मार्गदर्शन का करू नये ? पण काळाच्या पुढें, कोणाची सोय न पहातां, धावण्याची माझ्या मनाला खोड लागलेली आहे कदाचित् कोणी याला व्यवहार सोडून ध्येयसृष्टींतील सचार असेंहि नाव देईल तुम्ही लिहिता कीं, तुमच्या पक्षाचें नाव सोशल डेमोक्रॅटिक पक्ष असें राहणार आहे ज्याला कदाचित् सोशल डेमॉक्रसी म्हणता येईल अशा काहीं तत्त्वावर माझा विश्वास आहे पण सध्या प्रचलित असलेल्या कोणत्याहि राज्यपद्धतीवर माझा विश्वास नाहीं युरोपात चालू असलेल्या तर कोणत्याच राज्यपद्धतीविषयीं मला प्रेम वाटत नाहीं, मग भूतकाळांतील कोणत्याहि पद्धतीची ती सुधारलेली आवृत्ति असो.

आपल्या सस्कृतीला अनुरूप अशी "अस्मिता" आणि प्रकृति असलेल्या हिंदुस्थानानें इतर प्रत्येक गोष्टीप्रमाणें राजकारणात स्वत चा असा स्वतन्त्र मार्ग चोखा ळावा युरोपच्या पाठीमागून पाऊल टाकीत ठेचाळू नये असें मला वाटतें पण सध्याच्या गोंधळलेल्या आणि तयारी नसलेल्या मन स्थितींत या रस्त्यानें पाऊल टाकावयाचें झालें तर नेमकी तीच गोष्ट हिंदुस्थानाला कराबी लागेल हिंदुस्थान आपल्या स्वत च्या मार्गानें जात आहे अशी भाषा काहीं लोक वापरीत असतात यात सशय नाहीं, परतु हा स्वत चा मार्ग म्हणजे काय याची कोणालाच स्पष्ट आणि पुरेशी कल्पना असल्याच दिसत नाहीं या बाबतींत मी स्वत काहीं ध्येयें व कल्पना निश्चित केल्या आहेत पण सध्या फारच थोडे लोक त्यांचा स्वीकार करतील. कारण या कल्पना सध्या रूढ नसलेल्या, आध्यात्मिक ध्येयवादावर आधारलेल्या असून त्या बाबतींत तडजोडीसाठीं कोणाशीहि मिळतें घेण्याइतक्या लवचिक नाहात या कल्पना काहीं लोकाच्या बुद्धीला

माझ्या होणार नाहीत तर विशेषेकरून लोकांना उपमर्दकारक व अडचणीच्याहि वाटतील तथापि व्यावहारिक मार्गाविषयी मला अद्यापि स्पष्ट आणि संपूर्ण कल्पना करता आलेली नाही. माझ्याजवळ तयार असा कार्यक्रम नाही एका शब्दात सांगावयाचे म्हणजे माझ्या मनातल्या मनात मी मार्गाचा शोध घेत आहे आणि प्रचाराला किंवा प्रत्यक्ष कृतीला अद्यापि माझी तयारी नाही. आणि तशी तयारी असली तरी, काही दिवस तरी मला एकट्यानेच त्या मार्गाने जावे लागेल किंवा माझ्या मार्गाचे स्वातंत्र्य मला ठेवावे लागेल तुमच्या पत्राचा संपादक व्हावयाचे म्हणजे मला माझी मते बाजूला ठेवून दुसऱ्याची मते मांडावी लागतील आणि सध्याच्या क्षणी करावयाच्या कार्यासंबंधी *पुढारलेल्या पक्षाच्या सर्वसामान्य कल्पनाशी माझी पूर्ण सहानुभूति असली तरी*— आणि मी प्रत्यक्ष आखाड्यात असतो तर मी त्यांना शक्य ती मदत केली असती तरी—प्रकृतित मी तशा प्रकारे स्वतःला अवश्य ती मर्यादा घालून घेण्यास जवळजवळ असमर्थ आहे

माझे हे बोचक लिखाण घरच लाबल, याबद्दल क्षमा करावी. तुम्ही किंवा दुसरे जे स्तुत्य काम करीत आहा त्याबद्दल मला कसलाच सहानुभूति नाही, देशाच्या हाकेला 'ओ' देण्याची मी टाळाटाळ करीत आहे, किंवा खऱ्या अथवा खोट्या आध्यात्मिक अलिप्ततेमुळे मी आपल्या विनंतीचा अव्हेर करीत आहे, असा तुमचा गैरसमज होऊ नये म्हणून पूर्ण विस्तार करण्याची मला जरूरी वाटली तुमची निराशा करावी लागत आहे याबद्दल पुन्हा मी दुःख व्यक्त करतो.

आपला
अरविंद घोष



# कांही रहस्यमय क्रांतिकारक

[या शब्दचित्रमालेचे लेखक श्री हरिभाऊ जोशी, एक जुने पत्रकार, काँग्रेससेवक आणि महाराष्ट्र सरकारच्या 'स्वातंत्र्य आंदोलन इतिहास लेखन समितीचे' एक संशोधक लेखक आहेत गंगाधरराव देशपांडे, वीर वामनराव जोशी, दादासाहेब खापर्डे, सेनापति बापट इत्यादींचीं चरित्रें वा आत्मचरित्रें, तसेंच अनेक दुर्मिळ ग्रंथ आणि पोलिसदप्तर यांतून मोठ्या परिश्रमपूर्वक मिळविलेली तुटक तुटक माहिती हा या शब्दचित्राचा आधार आहे त्यापैकीं गोविंदराव-गंगाधरराव यांच्याविषयाचा संबंध व उल्लेख असलेला मजकूर साराशरूपानें मीं या ठिकाणीं नवीन माहितीसह उद्धृत केलेला आहे ]

कर्नाटकसिंह गंगाधरराव देशपांडे आणि गोविंदराव याळगी यांना गोंधळांत टाकणारी जे आनासाहेब रामचंद्र नावाची अशीच एक रहस्यमय व्यक्ति गोव्यांत मडगाव येथें एक उद्योगवसाहत थाटून बसली होती ही व्यक्ति इंग्रजविरोधी क्रांतिकारक कीं इंग्रजांचा हेर होती याचा उलगडा गंगाधरराव गोविंदरावांना होत नव्हता

सन १९०८-९ चा सुमार गोव्यामधील मडगाव या मोठ्या शहराजवळील एका ठिकाणीं एक नवी संस्था स्थापन झाली होती तिचें नांव 'उद्योगमंदिर' छोट्या स्वदेशी उद्योगधंद्याच्या शिक्षणार्थ व प्रचारार्थ ही संस्था निर्माण झाली असल्याचें सांगितलें जात होतें सुमारें पाऊणशें विद्यार्थी तेथ साबण, आगपेट्या, चाकूकात्र्या, हातमाग, काच इत्यादि लघुउद्योगधंद्याचें शिक्षण घेत होते गोव्याच्या पोर्तुगीज अधिकाऱ्यांचीहि या संस्थेला सहानुभूति होती असें म्हणतात दहावीस एकर जमिनीच्या विस्तीर्ण क्षेत्रांत ही संस्था व तिचे शिक्षक, विद्यार्थी, इत्यादींचा परिवार एक स्वतंत्र वसाहत करूनच राहिला होता त्या वसाहतीवर एक प्रकारची गुप्तता व रहस्यमयता यांची छाया पसरलेली दिसे याचें कारण काय हें मात्र सांगणें कठिण उद्योगधंद्याचें शिक्षण देण्याच्या संस्थेत गुप्तता कशाला ?

या 'उद्योगमंदिरा'चे निर्माते व शास्ते कोणी जे आबासाहेब रामचंद्र नामें एक गृहस्थ होते त्यांचे सहकारी त्यांना 'महाराज' म्हणत त्यांचा पोषाख व रुबाब थेट शिवाजींचा होता

अगदीं थोर थोर पुढाऱ्यानांहि या 'महाराजानीं' चुचकळ्यात टाकलें होतें त्यापैकींच बेळगावचे गोविंदराव याळगी व कर्नाटकसिंह गंगाधरराव देशपांडे हे दोघे होते चळवळविरोधी, सरकारी कारस्थानपटुता व पाताळयंत्रीपणा याचा आगाऊ वेळेवर थांगपत्ता यथार्थपणें लावून त्यावर मात करण्याच्या कलेंत गोविंदरावाचा हात धरणारा सापडणें कठीण! पण त्यानांहि या 'महाराजा'चें रहस्य उलगडत नव्हतें त्याचा व गंगाधरराव याचा या 'महाराजा'विषयीं खूपदा वाद होई. गंगाधररावाना या जे आबा साहेब रामचंद्र यानीं काहींशी भुरळ घातली होती सदरहू जे आबासाहेब हे कोणी मोठे क्रांतिकारक असून कोणत्या तरी प्रचंड क्रांतिकारक कटाची जुळवाजुळव करण्यासाठीं गोव्यात येऊन राहिले आहेत असें गंगाधररावाना वाटत असावें गोविंदराव याळगींचा या गोष्टीवर विश्वास नव्हता कोणा लफंग्या, बदमाष, मतलबी चोराचा 'उद्योगमंदिर' हा उद्योग आहे असें याळगींना वाटे पण तरीहि याळगींच्या मनात संभ्रम होताच स्वत मडगावला जाऊन प्रत्यक्ष पाहावें व खात्री करून घ्यावी म्हणून गंगाधरराव–गोविंदराव एकदा गोव्यात या 'महाराजा'ना भेटावयासहि गेले त्या वेळचा प्रसंग —

"स्वदेशी नुसत्या व्याख्यानातून नाहीं येणार त्यासाठीं कोठेंतरी बसून रक्त ओकलं पाहिजे" जे आबासाहेब रामचंद्र ऊर्फ महाराज 'उद्योगमंदिरा'तील एका काचेच्या भट्टीपाशीं हातात छडी घेऊन उभे राहून सांगत होते गंगाधररावाना काच कशी तयार करतात याची ते माहिती देत होते

"ते खरंच आहे. आपण ही फार मोठी देशसेवा चालविली आहे, ' गंगाधरराव उत्तरले

"अहो पण तुम्हा मंडळींना तें पटत नाहीं ना? माझीं हीं पोरें खारभातावर येथं राहात आहेत पण कोणाला आहे त्याची पर्वा?" महाराज म्हणाले

"टिळक बाहेर असते तर त्याना खूप आनंद झाला असता तळेगावला त्यानींहि असाच एक प्रयत्न केला होता."–गंगाधरराव

"पण आतां तर ते तुरुंगात अडकून पडले आहेत ना? तथं कुजत पडण्याचा काय उपयोग?"–महाराज

महाराजाचं हें बोलणें ऐकून गंगाधरराव एकदम चिडले, आणि त्यांनीं उलट टोला मारला, "तुमच्या अमल्या शंभर 'उद्योगमंदिरां' पेक्षा लोकमान्यांच्या 'तुरुंगमंदिरां'तील वास्तव्यानं दहापट अधिक काम केलें आहे आणि आज तुम्ही करता ते सर्व टिळक आधींच करून थकले आहेत"

"पण आता सात वर्षं तुम्ही काय करणार? अशीं हजारों पोरं तयार केलीं पाहिजेत आणि त्यांच्या हातात देण्यासाठीं हजारों फुटगोळे (बाँब), काडतुसं बनविलीं पाहिजेत" महाराज म्हणाले

महाराजाचा तो प्रचंड व्याप पाहून गंगाधरराव भारावून गेले गोविंदराव तेथ कांहीं

बोलले नाहींत, पण जे० आबासाहेबांचा स्वभाव, त्यांची गुप्त राहणी, विद्यार्थ्यांना एक शब्दहि बोलण्यास तेथें असलेला प्रतिबंध, या सर्वांमुळे गोविंदराव बुचकळ्यात पडले

मडगांवहून परत येताच या जे आबासाहेब प्रकरणाचा पूर्ण छडा लावण्याचा गोविंदरावांनी चंग बांधला शेवटीं त्यांना एक धागा सापडला कोल्हापूरचे एक क्रांतिकारक आणि त्या काळच्या नेपाळकट इत्यादि अनेक कारस्थानाशीं ज्यांचा संबंध होता ते दामू जोशी यांची व गोविंदरावांची भेट झाली बीडवडातील 'रावसाहेब' म्हणजेच जे आबासाहेब रामचंद्र असें दामू जोशानीं गोविंदरावांना सांगितलें

या माहितीची शहानिशा करण्यासाठीं नंतर एक दिवस गंगाधरराव व गोविंदराव याळगी दामू जोशी यांना घेऊन मडगांवला जे आबासाहेबांना भेटावयाला गेले दामू जोशींना पाहून जे आबासाहेब काहींसे चरकले, असं गंगाधररावांना भासलें, "मी बीडवडात होतों पण मी 'रावसाहेब' नाहीं" असें जे आबासाहेबांनीं स्वतः च स्पष्ट केलें. आपणाला टिळकांनीं तोंडघशी पाडलं, अशी तक्रारहि जे आबासाहेबांनीं या दोघांपाशीं केली या दुसऱ्या भेटीनंतर गंगाधरराव देशपांडे यांच्या जे आबासाहेब यांच्याबद्दलच्या विश्वासाला तडा पडला पण तरीहि त्यांच्या कार्याबद्दलचा आदर गंगाधररावांच्या मनात कायमच राहिला गोविंदराव याळगींचा जे आबासाहेबांच्याबद्दलचा संशय मात्र बळावला

जे आबासाहेब रामचंद्र यांना नंतर पकडण्यात येऊन मुनईस आणण्यात आलें हे जे आबासाहेब खरोखरच कोण होते? खरोखरच कोणी गुप्त क्रांतिकारक होते की इंग्रजांचे हेर होते? अशी शंका यावी, अशीहि माहिती उपलब्ध आहे त्या काळात इंग्रजी सत्तेविरुद्ध दहशतवादी कट कारस्थान करणारे अनेक क्रांतिकारक गोव्यात येऊन राहात त्यांना आपल्या सापळ्यात अडकविण्यासाठींच जे आबासाहेब रामचंद्रनें 'उद्योग मंदिर' उभारलें होतें की काय, असाहि संशय वाटतो गोविंदरावांना हीच शंका आली असावी असें दिसतें पोलिस अधिकाऱ्यांचाहि त्यांच्यावर पूर्ण विश्वास घमू शकत नव्हता

यानंतर सन १९१० च्या सुमारास आनंदराव सुपेकर ऊर्फ 'महाराज' या नावाने आणखी एक रहस्यमय व्यक्ति बडोद्याच चॅ. केशवराव देशपांडे यांच्या संपर्कात वावरत होती सयाजीराव महाराजांच्या दरबारातील बॅ केशवराव हे एक कर्तबगार अधिकारी होते ते एक उच्च कोटीचे सत्पुरुष व देशभक्त होते योगी अरविंदांच्या शिकवणीनुसार शिक्षण देण्यासाठीं त्यांनीं 'गंगानाथ विद्यालय' नांवाची एक शिक्षणसंस्था चालविली होती ब्रिटिश भारतात क्रांतिकारक म्हणून ज्यांचा छळ होई असे अनेक तरुण या विद्यालयात आश्रयासाठीं येत असत त्यामुळें ब्रिटिश गुप्त पोलिस अधिकाऱ्यांची बॅ केशवरावांवर व त्यांच्या 'गंगानाथ विद्यालया'वर सतत नजर असे

बॅ केशवराव देशपांडे यांची आनंदराव सुपेकर या गृहस्थाशीं बिलिमोऱ्यात प्रथम भेट झाली आनंदरावांची तेथ आश्रमासारखी एक संस्था होती या संस्थेतील बहुतेक

विद्यार्थी गोव्यान्या जे आबासाहेब यांच्या 'उद्योगमंदिरा'तीलच होते एकंदरीत हे आनंदराव व त्यांची संस्था म्हणजे गौडबंगालच होते वॅ. केशवरावांचा आनंदरावांवर फारच विश्वास जडला अफाट कर्तृत्वशक्ति, माणसें जमविण्याची ताकद आणि देशप्रेम यांचा असा कांहीं परिचय व थाट आनंदरावांनी करून ठेविला होता कीं, कोणाचाहि त्यांच्यावर विश्वास बसावा कोणी म्हणत आनंदरावांचा हा आश्रम म्हणजे क्रांतिकारकांसाठीं परदेशांतून येणारी हत्यारें उतरून घेण्याचें गुप्त केंद्र होते! आनंदराव म्हणजे क्रांतिकारकांना पैसा पुरविणारा कोणी कर्तबगार नेता असाहि समज पसरवून ठेविला होता!

पण याहून मोठें रहस्य म्हणजे या आनंदराव महाराजांना पोलिसांना चकवून अज्ञातवासात राहिलेल्या सेनापति बापटांना पोलिसांच्या स्वाधीन होण्याचा स्वत च सल्ला दिला, आणि त्याबरोबरच असेंहि सांगितलें कीं, 'मी तुम्हाला लवकरच सोडवूनहि आणतों आणि त्याप्रमाणें सेनापति बापट पकडले गेले व सुटूनहि आले जवळजवळ साडेचार वर्षे सेनापति बापट पोलिसांच्या हातावर तुरी देऊन गुप्तपणे वावरत होते अनेक सहाय्यकांच्या आश्रयानेंच त्यांना तें शक्य झालें होतें पण त्यांच्या सहाय्यकांना पुढे पोलिसांचा फारच जाच होऊं लागला म्हणून पोलिसांच्या स्वाधीन होऊन त्या मित्रांना होणारा पोलिसी त्रास बंद पाडावा असें बापटांनाहि वाटत होतें आपल्या मित्रांशीं व सहाय्यकांशीं त्यांची चारसहा दिवस सल्लामसलत चालू होती हा विचार विनिमय चालू असतानाच एके दिवशीं सेनापति बापटांच्या निवासस्थानाबाहेर पोलिस ऑफिसर वगैरेंना उपस्थित ठेवूनच सेनापति बापट यांना अटक करण्यांत आली ही अटक पोलिस कमिशनर व्हिन्सेंट यांनींच इंदूर येथें केली होती 'बापटांना मी सोडवीन' असें वचन पोलिस कमिशनर व्हिन्सेन्ट यांनीं 'महाराजा'ना दिलेलें होतें

बापटांच्याकडून त्यांच्या इतर सहकारी क्रांतिकारकांच्या कार्याचा ठावठिकाणा काढावयाचा व मगच बापटांना मुक्त करण्याचा व्हिन्सेन्टचा बेत होता सतत दीड महिना बापटांचा त्यानें पिच्छा पुरविला पण बापटांनीं त्याला एक अक्षरहि माहिती दिली नाहीं म्हणून शेवटीं कटाळून व्हिन्सेन्टने बापटांना मुक्त केलें अशा रीतीनें व्हिन्सेंटनेहि आपला शब्द पाळला, व आपलें आश्वासनहि पुरें केलें पोलिस कमिशनरच्या दरबारात आनंदरावांच्या शब्दाला किती मान आहे हें पाहून बापटांच्या सहाय्यकांना मोठा विस्मय वाटला, आणि त्याबरोबरच आनंदरावांबद्दलचा संशयहि दुणावला आनंदरावांवर वारंवार खटले भरले जात व त्यांतून तो नेहमीं सुटेहि!! हाहि चमत्कार म्हणजे सरकारी पाताळयंत्रीपणाच होता हे आनंदराव सन १९१२ मध्यें लंडन मुक्कामीच वारले, अशी पोलिस दप्तरात नोंद आहे सर्व गोष्टींचा व माहितीचा साकल्यानें विचार करितां गोव्याचे जे आबासाहेब रामचंद्र व निलिमोव्याचे श्री आनंदराव सुपेकर या दोन्ही व्यक्ति एकच होत्या अगाच निश्चयें निघतो आणि त्याबरोबरच असेंहि वाटतें कीं, ही व्यक्ति म्हणजे बीड प्रान्तील रावसाहेबांचे सहकारी क्रांतिकारक जयसिंगराव घाटगे ऊर्फ वल्लभ कर्वे हेच होत एर

गोष्ट मात्र मला खात्रीपूर्वक वाटते ती ही की, जे आबासाहेब रामचंद्र व आनंदराव सुपेकर यांच्या हालचाली व वर्तणूक संशयास्पद होती यात शंका नाहीं 'रावसाहेब या क्रांतिकारकाने मात्र शेवटीं मराठवाड्यांतील नादेड किंवा परभणी जिल्ह्यातील नेणा शिवमंदिरात अनुष्ठान आरंभिले आणि तेथेंच मान कापून घेऊन आपला अंत करून घेतला' अशी माहिती वीर वामनराव जोशी यांनी मला सांगितली होती

सेनापति बापट यांना अटक झाल्यानंतर एके दिवशी हे महाराज-म्हणजे आनंदराव सुपेकर-सेनापति बापट यांना भेटावयास आले होते त्या वेळीं सेनापति बापटांनीं त्यांना स्पष्टपणे सांगितलें कीं, "आमचा निर्णय होण्यापूर्वीच, आपण माझ्या अटकेचा घटना—पोलिस अधिकाऱ्यांशीं संगनमत करून—घडवून आणिलीत तेव्हा आपल्याशीं मला इत:पर काहींच बोलावयाचे नाहीं आपण आलात तसेच झटकन् परत जा हें ठीक होईल"

महाराज खालीं मान घालून परत गेले



# नांवांची सूची

दे. भ. गोविंद व्यंकटेश याळगी

## श्री. पुंडलीकजी कातगडे यांनीं लिहिलेलीं पुस्तकें

| | | | किंमत |
|---|---|---|---|
| १. हिंदी शिक्षक अथवा स्वराज्याच्या भापेशीं परिचय पृ. १५० | | | १-५० |
| २. हिंदी-मराठी कोश (शब्दसंख्या) २२००० | | ... | २-०० |
| ३. 'पुंडलीक', जीवनांतील आठवणी. पृ. ४३६ | | ... | ८-०० |
| ४. जोहार (मराठी) पृ. १०० | ... | ... | २-०० |
| ५. जौहार (हिंदी) पृ. १०० | ... | ... | २-०० |
| ६. सत्यनारायण (संपादित) पृ. ६२ | ... | ... | २-०० |
| ७. 'अनुग्रह' (संपादित) पृ. २१२ | ... | ... | ५-०० |
| ८. संस्मरणीय पर्व पृ. २८० | ... | ... | १०-०० |
| ९. मिरज संस्थानांतील सारावाढ आणि रयतांचा सत्याग्रह पृ. २५० | | ... | २-०० |
| १०. हिंडलग्याचा प्रसाद पृ. ३०० (संपादित) | | ... | ०-७५ |
| ११. कै. दे. भ. गोविंदराव याळगी यांचें चरित्र पृ. २७५ | | | १०-०० |

## श्री. पुंडलीकजी कातगडे यांचीं आगामी प्रकाशनें

१. कानडी-मराठी-शब्दकोश (शब्दसंख्या ३६०००)
२. मराठी-कानडी-शब्दकोश („ „ ३६०००)
३. कन्नड-मराठी-भाषाप्रवेश पृ. २५०
४. आजरे तालुक्यांतील सारावाढ आणि रयतांचा सत्याग्रह. पृ. १२५
५. गांधीजींनीं दाखवलेला अमोघ मार्ग. (अनुवादित) पृ. ७५